पानिपतच्या रणांगणावरील मराठ्यांच्या पराक्रमाची शौर्यगाथा

# पानिपतचा संग्राम

## सेतुमाधवराव पगडी



प्राकृत

# समग्र सेतुमाधवराव पगडी
## खंड तिसरा

इतिहास

# पानिपतचा संग्राम

प्रथम प्रकाशन
इतिहास संशोधन मंडळ
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई
१९६१

# अनुक्रम :

# संदर्भग्रंथ-संक्षेपांचा खुलासा

पुद. पुरंदरे दप्तर
राज. राजवाडे (मराठ्यांच्या इतिहासाची साधने)
शिंदे. इ. सा. शिंदेशाहीच्या इतिहासाची साधने
पदे. पेशवेदप्तर
इसं. ऐ. टि. इतिहाससंग्रह-ऐतिहासिक टिपणे.
ऐ. पव्य. ऐतिहासिक पत्रव्यवहार.
काइसं. पत्रें, यादी वगैरे काव्येतिहाससंग्रह पत्रे यादी वगैरे.
संक्षेपापुढील पहिला आकडा ग्रंथाच्या खंड विभागाचा व दुसरा त्यांतील लेखांकाचा आहे.

# १

# मराठी साधने

## कुंजपुरा

पुद. १ ले. ३८९

||श्री||                    शके १६८१ भाद्र. शु. ७, १६ सप्टे. १७६०

चि. रा. धोंडो मल्हार यासी सदाशिव चिमणाजी आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष तुमचे पत्र आले ते पावोन लिहिले वर्तमान सविस्तर कळले यैसेच निरंतर साकल्य पत्री लिहीत जाणे इकडील वर्तमान तरी फौज सरदार सुद्धा दिल्लीत आलो किल्ला घेऊन आत सरकारचा बंदोबस्त केला. सुज्यातदौला व नजिबखान वगैरे रोहिलेसुद्धा आबदाली यमुने पलीकडे येऊन मुकाम करून राहिले आहेत नदीस पाणी फार. सुज्यातदौला व नजीबखान यांचे विचारे सलुखाचा पैगाम लागला. त्याचे मते सरंदेची हद्द अबदालीची करून द्यावी पातशाही बंदोबस्त आपले हवाला करावा वजिरी बक्षिगिरी सुज्यातदौले मागतात. बक्षिगिरी नजीबखान मागतो. नदीमुले उभयता सैन्याचा मोकाबला होत नाही तो पैगामही आहे आमचे मते अटकची हद्द पातशाही बदोबस्त सर्वाखे पूर्वत प्रमाणे राखून चालवावे याप्रमाणे सलूखाचे करावे त्यात काही आमचे जाहलिया शिवाय तह होत नाही. बोलता चालता होईल ते पाहो केवळ आमच्याच चित्तानरूप घडणे अगर त्याचे चित्तानरूप होणे हे कसे होईल यास्तव जसे बनेल तसे करावे लागेल. होईल ते लिहून पाठवू. नदी पायाब जाहालिया लढाई प्राप्त होईल सरदार दोघेही बहूत साफ आहे सर्व पेच पोटाचा बाहेरील कजियामुळे न मिले कर्ज सावकारी बंद दोनी फौजाबा परंतु सरदाराची फौज मोडली यामुले त्याची सलाबत आहे. यंदाचे येणे व बाहेरील मसलत भारीच आहे सर्व आशीर्वादे करून परिणामास जाईल. लढाई न पडता सर्व प्रयत्न आबरू राहून होतील ते करू शेवटी नेटाने सर्व एकत्र जम्हून लढाई करू ईश्वर बरेच करील आपले वर्तमान शरिराचे वगैरे लिहिणे तीर्थरुपाचे शरीर उत्तर जाले म्हणजे सर्व मनसबे उत्तम येविशी वर्तमान लिहित जाणे छ ६ सफर बहूत काय लिहिणे हे आशीर्वाद.

राज. १ ले. २५५                    ||श्री||                    ७ ऑक्टोबर १७६०

चिरंजीव राजश्री गंगाधर यासि: गोविंद बल्लाळ आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणे. विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान साद्यंत कळले. त्यास चिरंजीव सौ|| लक्ष्मी प्रसूत झाली. कन्या झाली. फार उत्तम झाले. आम्ही बिठुराहून कूच करून रीप नदीवर आलो. गुलोलीचे मामलियाकरिता एक दोन मुकाम करून फडशा करून दरमजलीनीं उमरगडी येऊन आतां गुंता नाही. वरकड भेटीनंतर सविस्तर

बोलोन. अबदालीकडील दोन हजार फौज लुटविली, कुंजपुऱ्याजवळ. कुंजपुरा घेरिला आहे. बहुधा घेतला असेल. आम्ही सत्वरच येऊन गुलोलीवाले याने सन १८१६ पैसा न दिल्हा. गडी बांधोन राहिला. जर याजला सोडून आलो तर तसेच राहील. तूर्त ऐवज कांही हाती येणार म्हणून, मुकाम केला. सत्वरच फडशा होईल. मोहनसिंग गुलोलीवाला दमला. रमईपुरी गेला. त्याचे मातबर भले माणूस येऊन भेटून गेले. उदईक सर्व येतील. फडशा करून मी येतो. मित्ती भावो व।। १४. हे आशीर्वाद

**शिंदे इ. सा. ३ ले. २३३** ११ ऑक्टोबर १७६०

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतोकृष्ण (वळे) कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता।। छ १ रोवल मु।। नजीक सोनपत जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. (मधील मजकूर हुंडीच्या देवघेवीचा आहे) यथील वर्तमान तर दिलीहून कूच जाल. कुंजपुऱ्यास जातात. अलीगोहर पातशाह केला. अबदाली वगैरे सर्व यमुनापारच आहेत. जुंज जाल्यावर सर्व गोष्टी होतील. कळले पाहिजे. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

**राज. १ ले. २५७** ।।श्री।। ११ ऑक्टोबर १७६०

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंद बल्लाळ स्वामी गो।। यांस।।

पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष तुम्ही पत्रे पाठविली ती पावली. बुधेल्यांकडे राजश्री गणेश संभाजी याणी कजिया आरंभिला आहे त्यास चहूंकडे पेच नसावे. तजविजीने बुंधेले हाताखाली रहावे, याचा विचार म।। निलेस लिहावा, म्हणोन लिहिले ते कळले. ऐशास हाच म।। गणेश संभाजी यांस लिहिला आहे. त्यांनी कजिया केला नसेल, व हल्लीही कजिया न करणे. त्यास समजावून सांगोन फौजसुद्धा हुजूर घेऊन येणे. म्हणोन लिहून पत्रे रवाना केली आहेत. याप्रमाणे करितील. पारच्या जमीदारांना कजिया मानवला आहे. शेंपन्नास ठाणे रोहिल्यांचे घेतले म्हणोन लिहिले तरी उत्तम आहे. या उपरिही वारंवार पारचें राजकारण ठीक राखून लेहून अतिशय बखेडा करीत ऐसे करणे. तिकडील सूत्र पक्के चांगले तऱ्हेने हाती राखणे, गंगाकिनारा आज्ञेप्रमाणे जातो म्हणोन लिहिले, तरी बहुत दिवस तुम्हास (लिहा) वयाचे समाप्त केले. सीमा झाली. तुम्ही थोर माणूस वारंवार काय म्हणावे. करून दाखवाल या उपर ते खरे. र ।। छ १ र।। लावल. बहुत काय लिहिणे. हे विनंती.

**राज. १ ले. २५८** ।।श्री।। १४ ऑक्टोबर १७६०

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंद बल्लाळ स्वामी गोसावी यांसि :

पो।। सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे. विशेष तुम्हास तिकडे मोठ्या कामास जावयाविषयी वारंवार लिहिले. परंतु अद्याप राजश्री गोपाळराव गणेश व तुम्ही गेला नाही. कोठे किरकोळ जमीदारांची गढी गाव घेत बसला आहा हे ठीक नाही.

या उपरी लौकर तिकडे जाऊन पेशजी लिहिल्याप्रमाणे गडबड करून धुंद उडवणे. या गोष्टीस हयगय एकंदर न करणे. आम्ही यमुनेचे पाणी फार याकरिता दिल्लीवरी बसोन उपयोग नाही. यास्तव कुंजपुऱ्यास जाऊन अबदुल समदखान याचे पारपत्य करावे, या अर्थे दरकुच जात आहो. चिरंजीव राजश्री नाना, आपाजी जाधवराव यास दिल्लीस पाठविले. त्यांनी छ ३० फरी अलीगोहर याचे नावचे गजशिक्के केले. शहरात द्वाही फिरविली. त्याचे पुत्रास बाहेर काढून वलीहद केले. सर्व अलमास खुशाली जाहली. लोकांनी नजरा केल्या. शिक्के चालते जाहले. मोठा समारंभ केला. तुम्हास कळावे म्हणोन लिहिले असे. आम्ही कुंजपुऱ्याकडे गेलो. इकडे अबदालीचे कुच होऊन आलियावरी उत्तमच जाहले दिल्लीकडील मुलूख मागे मोकळा राहिला. इकडेच लढाई पडेल. कदाचित् ते इकडे न येता तिकडे तुमचे रोखे जाहले तरी बरेच आहे. आम्ही पाठीवरी यमुना उतरून अंतरवेदीतोन येऊन पारपत्य करू. कुंजपुरेवाला ठेहरत नाही. डावाडोल होऊन दमवायाच्या मुद्यावरी आहे. ठहरला तरी मोर्चे लावून यथास्थितच पारपत्य करू. तुम्ही तिकडे सत्वर जाऊन पोहोचणे. केवळ छोट्यामोठ्या करमास गुंतोन न राहणे. ऐवज लौकर येऊन पावे ऐसा रवाना करणे. दिरंग न लावणे. तुम्ही पेशजी लिहिलेप्रमाणे गनीमी मेहनत करून रोहिले सुज्यादौला यांचे प्रांतात धामधूम होई असे करणे. किरकोळ गढियांचे कामास न गुंतणे अबदाली आम्हाकडेच येईल. तिकडे आला तरी पाणी आहे तो आहे. चार रोजात कुंजपुरियांचे पारपत्य करून सारंगपुराकडे उतरून नजीबखानाचे विल्हे लावून पुढे अबदालीचे पाठीबर येऊ. रवाना छ ४ र।। लावले. बहूत काय लिहिणे. अलीगोहरचा शिक्का दिल्लीत पडला, त्याची चिठी पाठविली आहे.. त्याप्रमाणे लिहून पातशहाची जरब मोडून याचे नावे करणे हे विनंती.

**पेद. २१ ले. १९२** श्री २०-१०-६०

तीर्थस्वरूप राजश्री नाना वडिलांचे सेवेसी

आपत्य बालकृष्णाने चरनावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम त।। छ १० रबिलोवलपावेतो मु।। कुंजपुरा वर्तमान येथास्थित आसे. विशेष. वडिलाकडील बहुत दिवस आसीरवादपत्र पाठऊन सेवकाचा साभाल करीत असिले पाहिजे. वडिली आसीरवादपत्र पाठविले ते पावोन परम समाधान जाहले. यैसेच निरंतर पत्र पाठऊन संतोषवीत आसिले पाहिजे. हिकडील वर्तमान तरी आबदल समदखान व कुतुबशाहा यैसे दोघेजन मारिले. झुज जाहाले. आपलेही लोक जखमी पाचसातसे जाहाले आहेत. कुंजपुरा लुटून फस्त केला. पैकाही सापडला आहे. पुढी गिलज्याचेही पारपत्य करावयासी उमेदवार जाहले आहेत. तोही लुटून घेतील. काही चिंता नाही. श्रीमंतांचे पुन्य समर्थ आहे. समंधखानाचीही फौज दाहा हजारपावेतो होती परंतु एकदाच हला केला. त्याची फऊज दाहा हजार कापून काढिली. घोडेही च्यार पाच हजार आली. निदानप्रमाणे वर्तमान जाहले आहे. पैका कोणाकडील वसूल जाहला नाही. याउपरी लोकास पैका देतीलसे दिसते. देतील तेव्ह आमच्या हातास येई. आपणास कलावे म्हणऊन लिहिले आहे. माहादाजी बारवकर यास देवआज्ञा जाहली. आपणास कळावे म्हणून लिहिले आहे हे विज्ञापना.

सेवेसी गंगाधर बाबाजी जोशाचे कृतानेक सं।। नमस्कार विज्ञापना. आपण कृपा करून स्मरण करून पत्र प।। ते पावले. नित्य नित्य हमेशा पत्रे सेवेसी लिहित असतो. पावत नाही त्यास अन्याय काये? वरचेवर सांभाळ करावया आपण वडीलच आहेत. आश्रा दुसरा कोणाचा? असो. वरकड वर्तमान राजश्री बालकृष्णपंती लि।। आहे. केलेले. कुंजपुऱ्यास समनखान वगैरे मारले. द्रव्यही दाहापावेतो सापडले. मोजदाद चारपावेतो जाली. हे विज्ञापना.

**पेद. २१ ले. १९३** श्री २०-१०-१७६०

तीर्थस्वरूप राजश्री नाना व तथा राजश्री आणा वडिलांचे सेवेसी

आपत्ये बाळकृष्णाने च्यरनावरी मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार. विनंती. येथील क्षेत्र ताा छ १० रबिलोवल पावेतो मुाा कुंजपुरा वर्तमान येथास्थित असे विशेष. वडिलांकडून बहुत दिवस आसीर्वाद पत्र येऊन वर्तमान कलत नवते. त्यास हाली छ १९ मोहरमचे पत्र पाठविले ते पावोन परम समाधान जाहाले. येसेच निरंतर आसीर्वाद पत्र पाठवून सेवकाचा सांभाळ करीत आसिले पाहिजे. हिकडील वर्तमान तरी लोकाकडील येवज आद्यप येक पैसा वसूल जाहाला नाही. फोजेस रोजमुरा तीन महिने मिलत नाही याप्रमाणे लोकांची हलाकी. याप्रमाणे हलाकी जाहाली आहे येथे कुंजपुरे यावर आज चार रोज आलो. त्यापासून दाणा लुटीचा मिलो लागला. त्याउपरी समंधखान येथे दाहा हजार फउजेनिसी होता तो युद्ध करून लुटिला. त्याचे सीर कापून भाल्यावर लाऊन लष्करात फिरविले व कुतुबशा त्याचा सरदार होता तोही त्याप्रमाणेच मारिला. त्याची लूट लोकास सापडली व घोडीही दोन चार हजार पावेतो होती तितकीही लोकाणी आणिली. आपल्याकडील लोक जखमी फार जाहाले. परंतु ठार कोणी मातबर जाहाला नाही. खंडेराव दरेकर व हैबतराव जाधव भुईंजकर या दोघाजनास गोलीची जखम जाली आहे. पेकाही दाहा पंधरा पावेतो सापडला. लोकाणी पाच लक्षेपर्यंत हल्याचे दिवशी लुटिला. आता पेका सापडला आहे. याउपरी लोकास काही दिल्हे तरी आमच्या हातात येईल. माझी खर्चाविसी बहुत हलाकी आहे. दाणा महर्ग बहुत जाहाला. रुपयाचे दीड पायेली दाणा झाला आहे. दोनशे रुपये घोड्यास व मानसास आजपावेतो लागले. गिलज्याची लडाई पुढे होनारच आहे. याप्रमाणे वर्तमान आहे. आपणास कलावे म्हणून लिहिले आहे. घरी कोकणात खर्चाविसी हलाकी जाहाली आसेल ती ईश्वर जाणतच असेल. हिकडे आलो परंतु एक पेशाची मिलखत दिस(त) नाही. कर्जदार (व्हावे) असे दिसते. वडिलास कलावे म्हणून लिहिले आहे हे विज्ञापना. राजश्री बालकृष्णपंत दाजीस व केसोपंत दाजीस साष्टांग नमस्कार सांगणे. लोभ करीत जाणे हे विनंती.

वेदमूर्ति राजश्री बापू भटजीस साष्टांग नमस्कार सांगणे. राजश्री माहादाजीपंत दाजी जोसी यासी साष्टांग नमस्कार सांगणे. लोभ करीत आसिले पाहिजे.

**पेद. २१. ले. १९४** ।। श्री।। २०-१०-१७६०.

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री

अंतोबा नाइक थथे स्वामीचे सेवेसी

सेवक विसाजी बलाल पाटणकर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल त।। आस्विन सुध ऐकादसी मु।। कुंजपुरा जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. आपणाकडील बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नव्हते. त्यांस आमच्या जासुदासमागमे पत्रे अधिक मासची पाठविली ती पावली. लि।। वर्तमान कलले. परम संतोष जाहला. घरचे वर्तमान सविस्तर लिहिले नाही. त्यास श्रावणमासी तीर्थस्वरूप दादा आले असतील, त्यांस सविस्तर वर्तमान पुसोन आपण लेहून पाठवावे. माहागांवी गाय घेऊन दिल्ही म्हणोन लिहिले, उत्तम केले. जे लागेल ते देत जावे. आबाल कोणे गोष्टीची होऊ न द्यावी. आपण वडील आहेत, काही न्युनता पडो देणार नाही. आम्हाविसी काही चिंता न करावी. हा कालपरियंत सुखरूप आहे. ईश्वर कृपेकरून पुढे जेष्ठ आखाडमासी घरास येऊ. आमचे घरची माणसे श्रमी बहुत होत असतील. तीन वर्से घरास गेलो नाही. परभारेच निघोन दुसाला छावणीस

आलो. लग्न जाहल्यावरी घरास जावे हा बेत होता, परंतु ऋणानुबंधे जाणे न जाहले. हे समयी ह्याचा व आपला ऋणानुबंध असेल ते दिवसी भेट होईल. वरकड राजकी वर्तमान तरी आबदाली यमुने पलीकडे आहे. आपल्या फौजा आल्याड आहेत. यमुनेस उतार जाहल्यावरी काय होणे ते होऊन येईल. मु।। मजकुरावरीहून कुरुक्षेत्र सोळा कोस आहे. एका दोहो सेजी येथून कूच करून कुरुक्षेत्रास जाऊन येथे तीर्थविध करून, पुनरपि दिलीस जाणार. येथे आबदाली आहे. परम संकटाचे दिवस आले आहेत. ईश्वर काय करील ते न कळे. बरे असो. ×××× असेल तर, माहागावी पाठऊन ×××××× पत्र लेहून पाठवावे. बहुत का ×××××××.

**राज. १ ले. २५९**

हित असतां अद्याप न गेलां हे काय? याउपरि लौकर जाऊन पेशजी लिहिल्या अन्वये सर्व कामे यथास्थित करणे. याउपरि दिरंगावरी न घालणे. ऐवजाची तर्तूद कली आहे. निसूर बसलो नाही. वरिचेवरी ऐवज रवाना करीन याच पत्राचे पाठोपाठ ऐवज येऊ न पावेल. विलंब लागत नाही. म्हणोन भरंवशाने लिहिले ते कळले. ऐशास पत्र तो येऊन पावले. ऐवज पाठोपाठ यावयाचा तो कधी येऊन पावेल हे मात्र कळत नाही. येथे खर्चाची निकड आहे. हे वारंवार लिहित असता तपशील मात्र लिहिता. ऐवज येत नाही. हे कामाचे नसे. याउपरी दिरंग न लावितां ग्वालेर, आगरे, मथुरेवरून ऐवज दिल्लीस येई ते करणे. विलंब न लावणे. जाट बलमगडास आहेत. तिकडून रसदेचा वगैरे पेच पडावयाचा नाही. त्याची फौज पुत्र हुजूर येणार. ते येथे राहून पलिकडे पायबंद द्यावा. तिकडून तुम्ही फौज सुद्धा शहावरी असावे. इकडे यमुनेचे पाणी हलके होताच अबदालीचे पारपत्य यथास्थित करावे, असा डौल आहे. त्याजकडून तहाचे राजकारण अद्याप आहे. परंतु मळमळीत आहे. ठीक नाही. येथील मर्जीनरूप जाहल्याशिवाय तह होणार नाही. प्रस्तुत आम्ही दिल्लीहून कुच करून दोनमजली ललेऱ्यास कुंजपुऱ्याचे सुमारे आलो. पुढे जाऊ. अलीगोहर याचे पुत्र बाहेर काढून वलीहद्दी करावी, हा निश्चय होऊन शुक्रवारचा मुहूर्त करार केला आहे. होईल ते मागाहून लिहिले जाईल. ऐवज लौकर पाठविणे. सारी कामे लिहिल्याप्रमाणे यथास्थित करणे अलीगोहरचे पुत्रास वलीआहद शुक्रवारी केले. गजशिक्का अलीगोहरचा केला. आपले तालुकियातही शाहा आलमाचा गजशिक्का चालवणे. महिनाभर फौजा उतराया जोगे पाणी होत नाही.

कुंजपुरियास समदखान आहे. आम्ही कुच करून. (हे पत्र असेच अर्धेमुर्धे सापडले. ह्या पत्राचा पहिला व तिसरा बंद नाही) त्याचे पारपत्य करितो. अबदाली तिकडे आला तर उत्तम न आलिया फिरोन येऊ. तुम्ही लिहिल्याप्रमाणे शह देणे. जाट आपलाच आहे. वसवास नाही. ऐवज सत्वर खबरदारीने दिल्लीस सत्वर पोहोचेसा करणे. पुढे सोईने घेऊन ऐवजाविषयी आम्ही लिहा.

**राज. ६ ले. ४०५** ।। श्री।। २४ ऑक्टोबर १७६०

शके १६८२ अश्विन शु. १४

चिरंजीव राजश्री बजू व गोविंद, बापू यासी त्रिंबक सदाशिव आशिर्वाद उपरि

येथील कुशल त।। आश्विन शु।। चतोर्दशी गुरुवार मुक्काम कुंजपुरा यमुना दक्षिण तीर यथास्थित असे. विशेष दिल्लीचा बंदोबस्त करून श्रीमंत कुंजपुरास आले. अबदालीकडील दहा हजार फौज, समेदखान, कुतबखान होते. याजवर हल्ला करून जुंज झाले. मोडले. गोट लुटला. तसेच हल्ला करून गाव घेतला. लोकांस लूट पुर्ती घोडा उंटे वगैरे मिळाले. श्रीमतांस पाच सात लाख रुपये मिळाले. दाणादुणा लष्करास मिळाला. आपल्याकडील सर्व ब्राह्मण

मराठे मंडळी खुशाल आहे. तुम्ही जुंजाच्या खबरी भलत्या ऐकाल, घाबरे वहाल, मातोश्री चिंता करतील, यास्तव लिहिले आहे. सांगणे........

**राज. १ ले. २६०** ||श्री|| २५ ऑक्टोबर १७६०

राजश्रियाविराजितराजमान्यराजश्री गोविंद बल्लाळ स्वामी गोसावी यांसि:

पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष तुम्हास दोनचार पत्रे पाठविली की तुम्ही व गोपाळराव गणेश एकत्र होऊन जलदीने सुजातदौलाचे मुलकात हंगामा करणे व रसद न चाले ते करणे. शेंपन्नास राऊत प्यादे येतील जातील, त्यास लुटून मारून टाकीत जाणे. असे लिहीतच गेलो परंतु तुम्ही गड घेत बसला हे काय? तरी याउपर पत्रदर्शनी सुजातदौलाचे मुलकात हंगामा करणे व अलीकडील रसद वगैरे मारीत जाणे. नेहमी मुलकात फिरावे. कोठे रसद मारावी. कोठे गाव लुटावा. वाटा मारावी. माणसे मारून टाकावी. दहशत बसवावी. हेच नित्य करावे. मुलूक अंतरवेदीतील व गंगापारचा लुटीत जावा. वाटेचे गाव व रस्ते असतील त्यास दहशत पडोन बेचिराख होय ते करावे. वारंवार लिहिणे ते लिहिले, परंतु तुमचेकडून त्यास उपसर्ग करावा हे होत नाही. पायबंद बसत नाही. तरी याउपरी या गोष्टीस उशीर न लावणे. वरचेवर वर्तमान लिहित जाणे, जाणिजे, छ. १५ रबिलावल सु|| इहिदे सितेन मया व अलफ. हे विनंती. कुंजपुरा व पाच सात हजार फौज, पाचसा हजार प्यादा लुटला. यामुळे अबदालीचे लष्करात दहशत पडली. कितेक लोक उठून जातात. अबदाली कुच करून बागपतेवर चार कोस काही फौजही उतरू लागली. लौकरच त्याचे पारपत्य होईल. तुम्ही तिकडून गनीमी तऱ्हेनें उगळा लावावा. अबदाली अलीकडे आला. तुम्ही पुढे येऊन वाटा त्याच्या माराव्या. काहीच होऊन येत नाही. उत्तम नाही. सत्वर लिहिलेप्रमाणे करणे. हे विनंति.

## पानीपत

**राज. १ ले. २६१** श्री १ नोव्हेंबर १७६०

राजश्री गोविंद बल्लाळ स्वामी गो||:

विनंती उपरि. अबदाली यमुना बागपताजवळ उतरला आणि गणोरास आला. खासा स्वारी कुंजपुरीयाहून पाणिपतास आली. त्याजवर तीन दिवस गणोरास होते. तेथून भालकियास आले. तेथून दोन अडीच कोस आजी आले. फार आवळून चालतात. कही लांबवू देत नाही. चाळीस कोस, पन्नास कोस धावतात ते नाही! अंतर थोडके आहे. त्याचे आमचे बातमीची गोळागोळी होती. याप्रमाणे तीन दिवस होते. दाणा दोन अडीच शेर गिलज्याचे लष्करात आहे. हिंमत फार आहे. तरी यास गिळणार. त्यास, लढाई लौकरीच होऊन येईल. परंतु तुम्ही जलदीने यमुनेपलीकडून येऊन बागपतेपर्यंत धुमामा चालवून यास रसच न पोहचे, फौजेस शह पडे, ऐसे करावे. आता गिलज्याचा पेंच तिकडे नाही. तुमच्यापाशी सिही या पेंचामुळे लागणार नाही. यास्तव लांब लांब मजलीने येणे. सुज्याअतदौलाचे मुलकांतही जमीदारांजवळून धुंद करवणे. या कामास दिरंग न लावणे. हे काम मागेच करावे ऐसें होते. याउपरि तपशील न लावणे. जाणिजे. छ.२२ रविलोवल बुंधेले वगैरे त्यास पत्रे पाठवणे. त्याचीही खबर लिहिणे. जाणिजे. छ मजकूर. दोनचार हजार फौज सडी निवडून बागपतेजवळ यमुना पारून यावे. रसद मारावी, गडमुक्तेश्वर, शामळी, वगैरे नजीबखानाचे प्रांत जाळावे. अबदालीस मागे रसद बंद होऊन मुलुकाचा बोभाट होय

असे जरूर करणे. वारंवार लिहिले जाऊन अजून तुम्ही उमरगडीच आहां हे अपूर्व आहे! आताही लिहिलेप्रमाणे न आले तरी मर्दुमीचें काम होत नाहीसेच जाले! ईरे धरून तडकून येऊन काम करणे. र।। छ २२ र।। लावल हे विनंति.

**राज.१. ले. २६२** ।।श्री।। ३ नोव्हेंबर १७६०

श्रीमंत राजश्री पंत स्वामीचे सेवेसी: विनंति सेवक करद्वय जोडून साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना स्वामींची आज्ञा घेऊन जसवंतनगरापाशी आलो तो राजश्री लक्ष्मणपंत यांजकडून लष्करचे वर्तमानाचे पत्र आले तेचं बजिन्नस सेवेसी पाठविले आहे. त्याजवरून विदित होईल. मऱ्हाटी फौज शेर आली. याउपरि अबदालीचे पारपत्य सत्वरच होईलसे दिसते. मी आज रातोरात सकुराबादेस आज्ञेप्रमाणे जातो. तेथून सविस्तर वर्तमान सेवेसी लिहिन. कृपा करावी. हे विज्ञापना. पे।। मित्ती कार्तिक सुध ७ शनिवार मु।। इटावे.

**राज. १ ले २६४** ।।श्री।। ४ नोव्हेंबर १७६०

राजश्रियाविराजित राजमान्यराजश्री गोविंद बल्लाळ स्वामी गोसावी यांस:

पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष येथील खर्चाचे ओढीकरिता ऐवजाविशी तुम्हास वारंवार फारच लिहित गेलो. परंतु ह्या गोष्टी तुमच्या चित्तांत किमपी न येतां चालढकलीवरी या कालपर्यंत नेले. धातुपोषणार्थ मात्र लिहिता की मजला ऐवजाचे तर्तुदीशिवाय दुसरा अर्थ नाही. तर्तुद केली. करतो, एका दो दिवशी रवानगीही करितो, येतो, कार्यावरी आज्ञेप्रमाणे जातो. ऐशा गोष्टी रिकाम्या लिहिता. मात्र निदर्शनास यातील एकही येत नाही. यामुळे तुमच्या कर्तृत्वाची तारीफ वाटते! ते कोठपर्यंत लिहावी? लिहिता लिहिता भागलो! हे तुमच्या कर्तृत्वास उत्तम नाही. याउपरी पत्र पावताच रसदेचा व बाकीचा ऐवज मातबर भरणा करून अविलंबे रवाना करणे. दिरंग एकंदर न लावणे. कदाचित् अबदाली यमुनेच्या दक्षिणतीरी आल्यामुळे मार्ग सुद्धा नाही. ऐवज कसा रवाना करावा, हे निमित्य ठेवाल. आणि हा तपशील लिहांवा तरी असे न करणे. अबदालीची आमची गाठ पाणीपताजवळ पडली आहे. तोफखान्याचा आराबा रचून लढाई करावयास तयारी केली आहे. त्याच्याने इकडे तिकडे जावत नाही व काही करवत नाही. पावणेदोन कोस दीड कोसाची तफावत आहे. पेंढारी व लुंगारे राऊत वगैरे नित्य उंटे, घोडी, तट्टे, बैल आघाडी पिछाडीवरी जाऊन गोटापासून घेऊन येतात. त्याचे कोणी पाठीवरही निघत नाही. याप्रमाणे आहे. तुम्ही या गोष्टी भयाच्या कोण्हेविशी चित्तांत न आणितां सत्वर ऐवज दिल्लीस रवाना करणे. तेथे आलियावरी आम्ही हरतर्तुदेने घेऊन येऊ. विलंब न लावणे. जलद जलद ऐवज दिल्लीस येऊन पोहोचेत करणे, तुम्हीही पत्र पावताच अंतरवेदीतून पठपठगंजावरी यांच्या पछाडीस येऊन पोहोचणे. सावकास याल तरी ठीक नाही. लांब लांब मजलीने येणे. रसद त्याजकडे जावयाची आढळेल ते लुटणे, दबाव पाडणे, म्हणजे चहूंकडून घाबरा होईल. हेहि युक्त तुम्हांस बहुत वेळ लिहिली. परंतु तुम्ही येत नाही. सारीच डोळे झांक करिता. परंतु असा समय चाकरी करून दाखवावयाचा पुढे कदापि येणे नाही. या हंगामी जो आपले शक्तीपेक्षा चाकरी आधीक करून दाखवील त्याचे रूप आहे. हे दूरदेशी ध्यानात आणून सर्व गोष्टी लिहिल्याप्रमाणे करणे. ऐवज पाठवणे. तुम्ही येणे. लहान सहान गढ्यामुळे गुंतोन मोठ्या कामाच्या उपयोगातून जाल असे करून न घेणे. तुम्ही दरमजल बागपतचे सुमारे अंतरवेदीतून येऊन रसद मारणे. नजीबखानाचा मुलूक जाऊन लुटून फस्त करणे. ऐवज रसदेचा पाच सातशे राऊत देऊन आगरियावरून जलदीने दिल्लीस येऊन पोहोचेसा करणे. जाटाच्याने अटकाव होत नाही. वेडेवाकडे तो करणार नाही. मातबर एकदाच द्यावा. त्यात दोन तीन लाख एकेकदा उटे चांगले

राऊत देऊन रवाना करावे. दिल्लीस पावलियावर जसे दिसेल तसे पुढे आणून घेऊ. दोन चार हजार चांगली निवडक फौज लांब लांब मजली करून लिहिलेप्रमाणे रोहिलियांच्या मुलुकात दंगा व रसद बंद करणे. काहीच न झाले तर परिछिन्न तुम्हावर शब्द येईल. वारंवार लिहिलीयाची, आपले अबरूची इरे धरून काम बजावून आणणे. या दिवसात तुम्ही येऊन लिहिलेप्रमाणे पावला असतां तर किती काम होते! अजून तरी करून दाखवणे. गंगापार जमीदारांकडून दंगा करवणे. गोपाळराव गणेश फौजसुद्धा गंगापार उतरून जमीदार सामील करून सुजादौला रोहिले यांचा अंमल उठवावा. याप्रमाणे करणे मसलत मोठी. या दिवसात ज्यास जे लिहावे त्याप्रमाणे होऊन न येई मग तुम्ही आमचे कामाचे काय? याउपरि आज्ञेची व चाकरी करून दाखववयाची सीमा झाली! लिहिलेप्रमाणे सत्वर करणे. रवाना छ २५ र।। विल बहुत काय लिहिणे. हे विनंति.

**राज. १. ले. २६५** ।।श्री।। ५ नोव्हेंबर १७६०

चिरंजीव राजश्री दिवाकर जोशी यासि प्रती कृष्ण जोशी आशिर्वाद उपरि येथील कुशल तागाईत अश्विन वद्य १३ बुधवारपर्यंत मु।। फणीपत येथे सुखरूप असो. विशेष. वर्तमान तरी श्रीमंतांही महाष्टमीस समधखान व कुतुबशहा मारून, दहा हजार सेना लुटून, कुंजपुरा घेऊन लुटिला. गढी खणून जमीनीबरोबर केली. लोक आभर जाहले. श्रीमंतास भूमीगत सात लक्ष रुपये सापडले. तेथून कूच करून कुरुक्षेत्रास चालले होते. इतकियांत अबदाली बागपतापाशी यमुनापायाब उतरून सोनपथास आला. हे वर्तमान श्रीमंती ऐकताच माघारे फिरोन यवनाचे सन्मुख दरमजल फणिपथास आले. यवन येथून दोन कोसावर राहिला आहे. नित्य थोडेथोडे युद्ध होत आहे. श्रीमंतांही चोहोकडे तोफखाना पसरला आहे. यवनास थोर भय जाहले आहे. पुढे येववत नाही. आमचे सैनिक यवनाचे समक्ष उभे राहून, नित्य शेंपन्नास यवन मारून उंट, व घोडी आणितात. दोन हत्ती पेंढारी यांनी काल आणिले. यवनाच्या सैन्यात रसद बंद जाहली. यामुले पीठ 66३ व चणे 66४ तूप 66।। याप्रमाणे महर्ग जाहले आहे. आमचे सैन्यात गहूं 6।६ व चणे 6।२ व तू 66२ ।। याप्रमाणे सवंगाई आहे. आणखी दोनचार दिवसात यवन चालोन तोफावरी येईल तरी क्षणमात्र बुडेल. न ये तर आमचे लोक जाऊन युद्ध करणार. वरकड सर्व प्रकारे करून शुभचिन्हे होतात व स्वप्ने उत्तम श्रीमंतांस होतात. याजवरून सर्व सैन्यास उत्साह आहे, की अबदाली व नजीबखान व सुज्यातदौला आठ चौ दिवसात क्षयास जातील ऐसे दिसते. अबदाली शाहानशाहा म्हणवीत होता. त्याने युद्धे बहुत केली आहेत, परंतु तो दो कोसांवरी येऊन आठ दिवस बसोन काही पराक्रम होत नाही. याजमुळे आमची फौज बहुत शेर आहे. अबदालीने स्वदेशास जावे तरी मार्ग नाही; युद्ध करावे तरी परिणाम नाही, उगेच बसावे तरी भक्षावयास नाही. याप्रमाणे विचारात पडला आहे. मागाहून युद्ध जाहल्यावरी सविस्तर होईल ते लिहू. बहुत काय लिहिणे. हे आशिर्वाद.

**शिंदे इ. सा. ३ ले २३४** ८ नवंबर १७६०

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालबा (गुलगुले) स्वामीचे से।।

सेवक चिंतो कृष्ण (वळे) कृतानेक सा नमस्कार विनंती उपर. येथील कुशल छ. २९ रोवल मु।। पाणीपत जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. (येथून पुढे काही ओळी पैशाच्या देवघेवीच्या आहेत) येथील वर्तमानाचे विसी लिहिले तर शाहजहा पातशाह कैद करून अलीगोहर पातशाह नवा केला. त्याच्या पुत्रास छ ६० सफरी (१० ऑक्टोबर १७६०) वलीआहादी दिल्ही. तेथून कूच करून कुंजपुऱ्यावर

गेलो. अबदुलसमधखान मोमिनखान गिलज्याकडील व कुतुबशहा नजीक (ब) खानाचा यैसे जमावसुधा राहिले होते. कदक खाणून भिंताडे घालून मजबुतीने राहिले होते. त्याजवर छ ७ र।। वली (१७ - १० - १७६०) हला केली. चढे घोडे त्यास लुटले. तत्क्षणीच कुंजपुऱ्यावर हला करून किल्ला घेतला. मोमिनखान गोलीने लढाईत कामास आला. अबदुलसमधखान व कुतुबशाह यासी धरून सिरच्छेद केला. निजाबतखान कुंजपुरेकर कबिल्यासुद्धा कैद केला. पाचसहा हजार माणूस मारले व सासात हजार माणूस जखमी केले. वरकड मुखी तृण धरून तुम्हारी गौ यैसे म्हणोन निघोन गेले. दाहा हजार घोडे पांचसहा हती उंटे डेरेदांडे वगैरे वस्तभाव आणिली. सरकारचा हती जवाहिरगज पूर्वी गेला होता तो यजमानाकडे आला. वीस हजार माणूस हत्यारबंद होते. ईश्वरे फते केली. अबदाली रोहिले यासी लढाई होत असे. त्यासी श्रीमंतासी कोसाचा तफावत आहे. नित्यानी गोलागोली तोफाचा मार होत आसे. श्रीभगवंत कृपेकरून धर्माची स्थापना करून शत्रुचा नाश करून श्रीमंतास यश देईल. चिंता नाही. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

**शिंदे. इ. सा. ३ ले. ३९१** श्रीशंकर संवत १८१७ कार्तिक शुद्ध १
८ नवंबर १७६०

चिरंजीव राजश्री लालाजी यांसि प्रति नारो विठल आशिर्वाद उपर. यथील क्षेम ता। कातिक सुध १ प्रतिपदा मु।। पानपत सुखरूप आसो विशेष. तुम्ही पत्रे दोनतीन पाठविली ती पावली. त्याचे उत्तरे मागा पाठविली ती पावलीच असतील. (येथून पुढे थोडा मजकूर खासगी स्वरूपाचा आहे) मोगलाचा प्रकार तर यका कोशाचे अंतराने दोनी फौजात राहिल्या आहेत. मधे येक काश मैदान राहिले आहे. आपली फौज पानपतगाव पाठीशी देऊन मधे बुलगे पुढे तोफखाना देहून फौज उतरली आहे मोगल (अबदाली) रोज यहून तोफा आणून कटकट करितो. आजी इा बुधवार षष्ठी ता। आजी सनवार प्रतिपदापावेतो युद्ध होतच आहे. पुढा काय होईल ते पाहावे. उभयतो पक्षभारी फौजा आहेत. श्री करील ते होईल. तूर्त तोफाचा मुख्य होत आहेत. निकड होईल ते दिवशी श्री करील ते होईल. गोस्टी संकटाच्या आहेत. कासिदास दोनच्यार रोज राहा म्हणत होतो परंतु सोबतीकरिता निघोन आला. मागाहून होईल वर्तमान ते लिहोन पाठउ परंतु तुम्ही आणखी कासिदाची जोडी वरचेवर पाठवणे खबर लेहून पाठउन देउ. बहुत काय लिहिणे लोभ कीजे. राजश्री नारोबास आशिर्वाद चिरंजीवास लि।। वरून कळेल. संकटाचे आहे. श्री निवारण करील. चिता न कीजे. हे विनंती

**शिंदे. इ. सा. ३ ले. ३९२** ।।श्री।। संवत १८१७ कार्तिक शुद्ध २
९ नवंबर १७६०

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालाजी स्वामीचे सेवेसी

(खासगी मजकूर आहे) वरकड यथील वर्तमान सर्व सेना कुली दिलीवर होती. त्यास बातमी आली जे सरहद्देकडे अबदुल समदखान व कुतुबशाहा व मोमिनखान गिलज्याकडील फौज दाहापंधरा हजार अमल करीत होते ते आवघे मिळोन अंतरवेदीत जावया गिलज्याकडे आले. ते कुंजपुऱ्याजवळ आहेत आण कुंजपुरेवाला निजाबतखान रोहिला याचाही आसस्करा होता. याबद्दल वर्तमान यैकतच तिथून दिलीस आलीगोराचा पुत्र स्छापून प्रतिनिधित्व त्याकडे आण पातशाह गजसिका अलीगोराच्या नावे ठहराउन तो बाहिर बंगालास आहे या करिता यैसे करून कूच

केले. ते पनास कोस पाचवे दिवशी कुंजपुऱ्यास पोहचलो तेच क्षणी भोवती फौज राहिली होती ते तुडवून कुंजपुराही घेतला. तिथे सरदार गिलज्याकडील धरून मारिले. निजावतखान कुंजपुरेवाला त्याला कबिलासुधा धरिला. जखीम लागल्या. द्रव्यही काही त्याने दाविले. सुखी प्राणी आणि जखमाही लागिल्या होत्या. त्यामुळे तो मेला. वरकड बंदीस आहे. आम्ही कुंजपुऱ्यावरी लांबलो मागा गिलज्या व नजीबखान रोहिला व सुजातदौला यैसे यमुने आलीकडे सोनपथाच्या सुमारे उतरले. हे वर्तमान कुंजपुऱ्यावरी असता यैकिले. मग तेथून कूच केले ते पाणिपथावरी माघारे दोन मजली घेऊन मुकाम केला. गाव पाठीसी देउ (न) तोफखाना व गारदी वगैरे पुंढा रचून झुंझाची तरतूद येथेच केली. तो गिलज्या यथून सोनपत दक्षणेस वीस कोस तिथे होता. तो चौ रोजी यथे दीडा कोसावर येउन राहिला आहे. रोजबरोज आपली फौज तयार पुढा होती. त्याची फौज तयार होऊन पुढा होती. इकडील तिकडील गोळे सुटतात. साईकाली माघारे सरोन स्वस्त राहतात. यैसे दाहा अकरा रोज दीपावली प्रतिपदा साईकालपर्यंत यैसेच होत आले आहे. पुढा जे होणे ते श्री इच्छा प्रमाण. बहुत काय लिहिणे कृपा निरंतर असो दीजे हे विनंती.

**पुद. १ ले. ३९१** ।।श्री।। श. १६८२ कार्तिक शु. ६.

इ. स. १४ नोव्हे. १७६०

चिरंजीव राजश्री बजू व गोविंदे बापू यांसि त्रीबक सदाशिव कृतानेक आशीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ ४ रबिलाखर पावेतो मो। का। पाणिपत येथे सुखरूप असो विशेष तुम्ही पाच साहा पत्रे पाठविली. ती पावोन लिहिले वर्तमान कलोन बहूत संतोष जाहला याउपरी घरास वर्तमान वरिचेवरी तपसीलवार बारीक मोठे कचे पके वर्तमान लिहित जाणे इकडील वर्तमान तरी श्रीमंत दिलीहून कुंजपुऱ्यास दरमजल जाऊन अबदुल समंद खान व कुतुब शाहा बारा हजार फौजसुधा अबदालींच्या साहित्यास होते त्याजवरी चढे घोड्यानसी हला करून मारून लुटून पस्त केले तीन चार हजार गिलजी कापून काढिला त्याच लगटाने कुंजपुराहि फते जाहला नज्यावत खान कबिलासुधा धरला आबदुल समंदखान व कुतुबशाहा दोघे मारून टाकिले तेथील बंदोबस्त केला तो आबदाली सुज्याउदौला नजिबखान रोहिले सुधा येमुना उतरून आलीकडे आला हे वर्तमान ऐकोन तेथून आबदालीवरी फिरोन दर मजल येऊन पाणिपताजवळ गाठून सड्या फौजा करून मागे बुनगें गावच्या आश्रयास व पुढे तोफाचा आरबा देऊन मजबुदीने आहो अबदालीस अंतर कोसा दिढा कोसाचे आहे. नित्य त्यांची घोडी उंटे बैले आपले लोक पाडून आणितात लढाया होतात परंतु त्याच्याने चालून येवत नाही महागाई त्याचे लस्करांत रुपयाचे सेर पीठ जाहाले तेही मिलत नाही त्याणे चालून यावे ही वाट पाहातो आल्या नंतर एकदाच लगटाने मारून बुडवावा ऐसे आहे परंतु तो पनास साठा कोसाच्या दौडी करणार असा अबदाली त्याच्याने कोसावरून पुढे येवना असे जाहाले आहे श्रीमंताचे पुण्य समर्थ आहे लौकरी मोगलाचे पारपत्य येथास्थित होईल पुढे होईल ते लिहिले जाईल तुम्ही सर्व वरिचेवरी लिहीत जाणे राजगोपाल आबदुलाचे हवाली करणे आपली मंडळी तीर्थरूप आन्या भाऊ दाजीबा बलवंतराऊ समस्त सुखरूप आहेत ख़डोजीबाबा गंगाजीबाबा चिमाजीबावा व आणखी सर्व खुशाल आहेत हे आसीर्वाद

पै।। छ १५ जमखर पलसीकराच्या जासुदाजवल आले.

**पेद. २७ ले. २५९** १४-११-१७६०

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री अंताजीपंत सिधये स्वामीचे सेवेसी

पोष्य बापूजी वामन साठे कृतानेक साा नमस्कार विनंती उपरी, येथील क्षेम ताा छ ५ राा खर पावतो मुकाम पाणिपत श्रीमंताच्या लस्करात राा संभाजी कदम याच्या पथकात यथास्थित असो विशेष. आपणाकडील बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नाही तर ऐसे न करावे. हरघडी पत्र पाठवून सांभाल करीत जावे. इकडील वर्तमान तरी अबदालीची याची गाठ पडली. लढाईस आज पंधरा दिवस प्रारंभ जाहाला. त्याजकडील तोफा व आपणाकडील गोलागोली होत असते. दररोज घोडे पाच च्यार जाया होतात. माणूस आजपर्यंत पाच सात पर्यंत जाया जाहाली. मातबर कोणी जाहाले नाहीत. ईश्वर आजपर्यंत खैर केली आहे. आबदालीची फौज चालीस हजार पर्यंत आहे. आपली उभयेता सरदार मिलोन साठ हजारपर्यंत आहे. सिवाय गोविंदपंत व मामलतदार वगैरे आले नाहीत. पत्रे गेली आहेत. शह भारीच आहे. ईश्वर निवारण करील तेव्हा खरे. श्रीमंताचे पुण्यप्रतापेकरून सर्व येथास्थित होईल. आमची फौज उत्तरेकडे, रोख दक्षणेकडे, आबदालीची फौज दक्षिणेकडे रोख उत्तरेकडे आम्हावर, येणे प्राा फौजा आहेत. शह भारीच आहे. राा विनायकपंत वगैरे मंडळी सर्व सुखरूप आहेत. राा बाबूराव ग्वालरीस आले म्हणोन वर्तमान बाजारी आहे. आम्हास आद्यापी पत्र आले नाही. आबदालीच्या गडबडीमुळे वाटा बंद जाहल्या आहेत. कलावे आमचे घरचे व आपले सविस्तर वर्तमान लिहून आलिया जासुदासमागमे लिहून पाठवावे. बहुत काय लिहिणे? कृपा केली पाहिजे हे विनंती.

**राज. १. ले. २६८** ||श्री|| १५ नोव्हेंबर १७६०

राजश्रियाविराजितराजमान्यराजश्री गोविंद बल्लाळ स्वामी गो|| यांसि:

पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. सरकारांत दारूचे प्रयोजन आहे, तरी तुम्हाकडून दारू चारखंडी पाचखंडी असेल ते ताबडतोब रवाना करून दिल्लीस येऊन पोहोचे ते गोष्ट करणे या कामास दिरंग एकंदर न लावणे. जलदीने रवाना करणे × जाणिजे छ ६ रबिलाखर सु|| इहिदे सितैन मया व अलफ. बहूत काय लिहिणे येथे काम मोठे आहे. वीस खंडी दारू, पाच खंडी शिसे तयार करणे. त्यात तयार जे असेल ते पत्रदर्शनी रवाना करणे की दिल्लीस लौकर येऊन पोहोचेशी करणे. फौज सुद्धा लौकर येणे. ऐवज रवाना करणे. हे लिहिलेप्रमाणे एकही काम होऊन न आले. फार दिवस खावंदाने लहानाचे थोर केले, वाढविले, त्याचे सार्थक केले! अजून तरी सावध होऊन लिहिलेप्रमाणे येऊन पोहोचणे. दारू, शिसे व ऐवज दिल्लीस सत्वर पावेसा करणे, दारू फारच लौकर आली पाहिजे. बहुत काय लिहिणे. हे विनंती.

**पेद. २१ ले. १९५** ||श्री|| १५-११-१७६०

चिरंजीव राजश्री राघोपंत यासी

नारो गंगाधर आसीर्वाद उपरी. येथील कुशल ताा छ ६ रबिलाखर मुाा दाड वर्तमान येथास्थित असे विशेष. माहादजी जासूद याजबरोबर तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वर्तमान कलो आले. दोला वाणी याजबरोबरचा मजकूर लि|| तो सविस्तर कलला. त्यास माहादू जासूद असे दोघेजण त्याजकडे पाठविले आहेत त्याजला घेऊन पुण्यास जा म्हणोन सांगितले आहे. तेथे आल्यावर त्याचा प्रकार जसा करावयाचा तसा करावा अथवा लस्करात आला तर मनात आणीतच आहो. वरकड वर्तमान तर हिंदुस्थानातून कागद आले. समदखान सरहिंदवाला वगैरे दोनच्यार एकून दाहा - पंधरा हजार फौजसुधा कुंजपुऱ्यास येऊन जमा जाहले होते. त्याजवर श्रीमंत राजश्री भाऊसाहेब लागले. लडाई झाली. समदखान व आणखी येक दोघे सरदार मारले गेले. दोघेजण धरिले गेले आहेत. कुंजपुऱ्याचे

ठाणे फते जाहाले. त्याठिकाणी काही द्रव्यही हस्तगत झाले असे वर्तमान आहे. राजश्री नारो शंकर व जयनगरच्या वकीलाची पत्रे आली.

**इसं. ऐ. टि. भाग १** ता. २३ नोव्हेंबर १७६०

राजश्रिया विराजित रा. रा. बाबूराव बाबा स्वामींचे सेवेसी :-

पो।। बळवंतराव गणपत साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल स्वकीय जाणून लिहीत गेले पाहिजे. विशेष: बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाही. तर लिहित जावे इकडून पत्रे पाच सात पाठविली, परंतु उत्तर येतच नाही. तर ऐसे नसावे. आम्हाविसी नेम केला असेल तर मोडावा. इकडील वर्तमान तर, आश्विन शुद्ध प्रतिपदेस अल्लीगोहर याचे लेकास वलीहद दिल्लीत करून बसविले. गजशिक्का अल्ली गोहराचा करून, दिल्लीचा बंदोबस्त करून, नारोशंकर यास तेथे ठेविले; आणि कुंजपुऱ्यास अबदुल समधखान वगैरे पाच सात हजार फौज आहे, याजवर जाण्यास पाणपतपावेतो येऊन पोहोचले; व लोकांस तफावत आहे. पुढे होईल ते लिहून पाठवू. नदीस पाणी, आठ चार दिवस उतरावयास पाहिजेत. गिलच्यांची फौज दिल्लीजवळ पलीकडे ये काठीच आहे. कूच करून पलीकडले तीराने येणार होते. प्रस्तुत लष्करात खर्चाची निकड फारच आहे. रसदेचा पैसा अद्यापि एक न आला! तीही महिन्यांत फौजेस दोन रोजमरे पावले. आम्हा सारिख्यांनी वस्ता मोडून खादल्या. सर्वही पेच ईश्वरइच्छेने श्रीमंतांचे प्रतापे वारतील. एक भाऊसाहेबांची हिंमत व लोकांवर उत्तम दृष्टी आहे. येणेंकरून फत्तेच आहे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे ही विनंती.

**पेद. भाग २१ ले. १९७** श्रीराम २७-११-१७६०

तीर्थरूप राजश्री नाना स्वामी वडिलांचे
सेवेसी

अपत्ये लक्ष्मणाने व कृष्णाने कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल छ., १८ रा।। खर मु।। पानिप(त) वडिलांचे कृपे यथास्थित जाणून स्वकुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. वडिली निबाजी व विठोजी जासुदांसमागमे पत्रे पाठविली होती ती दिली आलीकडे जासूद लुटले गेले पत्रे गेली. जासूद आले. कुशलतेचे वर्तमान जबानी जासुदानी सांगितले. त्याआलीकडे सरकारच्या कासिदासमागमे वडिलांचे पुण्याचे मुकामचे पत्र आले ते ह्याच मुकामी पावले. लिहिले वर्तमान कळले. इकडील वर्तमान तर श्रीमंत दिलीहून उभयता सरदार सुधा निघाले. दिलीस र।। नारो शंकर ठेवले. अलीगोहराचा लेक वलीहद केला. आणि दरमजल कुंजपुऱ्यास आले. दुसरे दिवशी प्रात:काली हला केली. तेथे कुतुबशा अबदुल समदखान वगैरे वीस हजार स्वार प्यादा गिलज्यांकडील होता. किंचित हत्यार धरिले उपरांतिक मोडिले. तमाम लुटले. सरदार सारे मारले गेले. त्याच हल्याने ठाणे कुंजपुराहि सर जाहाला. आतील नजाबतखान कुटुंबसहवर्तमान धरला गेला. त्याची चीजवस्त काही लुटली गेली. काही हस्तगत जाहली. काही भूमिगत द्रव्य त्याचे व वरील मिलून साहा साडे साहा लक्ष नख्त दोन लक्षांचा गला हातास लागला. नज्याबतखान गोली लागली होती. मेला वरकड कैदेत आहेत. तेथून पुढे कुरुक्षेत्रावरून सरहिंदेकडे जाऊन तो प्रांत काबीज करून तिकडील जमीदार सीख जाट सामील करून फौज तवाना करावी हा मनसबा करून पुढे एक मजल चालिलो तो गिलज्यास कुंजपुऱ्याचे वर्तमान कल (ले), तोच दिली आलीकडे बागपतच्या घाटास ते येऊन

आलीकडे उतरावयास लागले. काही नावा काही दांडग्या उतारा (ने) तडका उतारावयास लागले. हे वर्तमान येताच श्रीमंत माघारे फिरले. मजल दरमजल मुकाम मजकुरास आले. तो तेही सारे उतरून आलीकडे पाच कोस आले. दुसऱ्या तिसऱ्या दिवशी येथे आले. त्यांची श्रीमंतांची दोहो कोसांची तफावत आहे. तेही तोफखाना पसरून उतरले आहेत. श्रीमंतही गाव पाठीसी देऊन पुढे तोफखाना देऊन (बसले) ले. नित्य त्यांच्या आमच्या फौजेसी जुजे होतात. आजपावेतो कहीवालियानी व जुजात मिलून हजार बाराशे घोडी तीन च्यारसे उंट व च्यार हती त्याकडील आली. महिना त्याचे याचे गाठी पडून जाहाले, छ १३ मिनहूस (२२।११।६०) ते सरदारांकडे उजवी बाजूस चालून आले. हेही बाहीर निघाले. जूज मातबर जाहाले. त्यास मोडून गोटात घातले. तीन च्यारसे मारले. पाच सातशे जखमी जाहले. सेदीडसे घोडे आले. आपले तीस चालीस ठार से दीडशे जखमी या प्राा जाहाले. संध्याकाल जाहला, नाही तर तेच दिवशी पारपत्य उत्तम होते. त्यानी गोट सोडून पळ काढिला होता. परंतु संध्याकालामुळे फौजा फिरल्या. परंतु ते म्हणत होते की मराठ्याशी आमची गाठ पडताच पडतील, ते महिना गाठ पडली व जुजेही जाहाली, परंतु त्याचाच रेच मोडला या प्राा जाहाले. पुढेही जे होईल ते लिहू. इकडील राजेरजवाडे दुलग, दोहीकडे येत नाहीत. आमच्या फौजेस येक मात्र वोड. पैका तूर्त नाही. वरकड उत्तमच आहे. श्रीमंत भाऊसारखा अवसानाचा सरदार दुसरा कोणी नसेल. गिलज्याचे पारिपत्य सत्वरीच करतील. आम्ही मंडलीसहवर्तमान कुशल असो कुंजपुऱ्यापैकी दोन घोडे आम्हाकडे आले. चिरंजीव नारायेणराव मंडलीसह सुखी आहेत. राजश्री त्रिंबकपंत नाना कुशल आहेत. पत्रे येतात. घनबादादांची पत्रे येतात. कुशल आहेत. वडिली तिकडील वर्तमान वरचेवर लिहित जावे. बहुत काय लिहिणे ? कृष्ण जोसी संगमेश्वरकर मोर्च्यात मुदबखाजवळ बसले होते. गोला लागून मृत्यू पावले. मस्तकी लागला. मोठे वाईट जाहाले. मोठा माणूस गेला. कलावे कृपा कीजे हे विज्ञप्ति.

चिरंजीव राजश्री सदोबास आसीर्वाद. सर्व वडिलास लिहिल्यावरून कलेल. तिकडील सविस्तर वर्तमान लिहून पाठवणे हे आसीर्वाद.

**पेद. २१ ले. १९८** ।।श्री।। १-१२-१७६०

पै।। छ २४ रबिलाखर मुकाम नागतळे

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
महादाजीपंत दाजी स्वामीचे सेवेसी

पोष्य लक्ष्मण नारायण साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागाईत छ २२ रबिलाखर मुकाम करमेले सुखरूप असो विशेष. येथे छ २० रबिलाखरी आलो. आणखी येथे एक दोन मुकाम आहेत. उपरात कोणीकडे जातील ते पाहावे. दिलीकडील मजकूर तरी कुंजपुऱ्याहून पत्रे आश्विन सुद्ध त्रयोदशीची आली. कुंजपुरा छ ७ रबिलौवली (१७ - १० - १७६०) घेतला, मोर्चे लाविले होते. दुसरे दिवशी हल्ला करून घेतला. दाहा हजार फौज त्यांची लुटून पस्त केली. लूट फार जाहाली. आपणाकडील शे दोनशे माणूस सरदारासुद्धा ठार जाले व हजारपावेतो जखमी झाले. मातबर कोणी पडिला नाही. दादु माहात आढळाचा मात्र पडला. तीन च्यार लाख रुपये सापडले, आणखी सापडतील. खणत्या लावल्या आहेत. गहू दाहा हजार खंडी सापडला. रोजमरा गेल्याचा देऊ लागले. समनखान व कुतुबशाहा या दोघांस धरून आणून डोकी कापून भाल्यास लाऊन फिरविली. मोठी फत्ते जाली. काल जयनगराहून वकीलाची पत्रे बाविसा रोजाची आली. त्यात मजकूर दिलीचे खाली वीस कोसावर पठाण

उतरला. याप्रमाणे वकिली वर्तमान आहे. पुण्याहून राजश्री गणेशपंत पेठ्ये याणी पत्रे पाठविली ती आपणांकडे पाठविली आहेत, त्याजवरून सविस्तर कलेल, लोभ कीजे हे विनंती.

**शिंदे. इ. सा. ३ ले. ३९३** ||श्री|| संवत १८१७ कार्तिक वद्य १३

५ दिसंबर १७६०

श्रियासह चिरंजीव राजश्री लालाजीस व राजश्री नारोबास प्रति नारो विठ्ठल आशीर्वाद उपरी. ताा २६ राखर मुाा पाणपत जाणून स्वकीय लि|| विशेष. तुमची दोन तीन पत्रे झाली. त्याचे उत्तरे पाठविली असतील. अलीकडे वर्तमान तर इ|| ताा छ मजकूर पावेतो दीड मास मोगलाचे आमचे युद्ध होत आहे. हाली छ २२ रोजी जवळ कोशावर डेरे होते तेथून माघारे कूच करून पाच सहा कोशावर गेले. तेथून स्वारी यती. इतका प्रकार आहे. तुम्हास कळावे म्हणून लिाा आसे. त्याचा जोरा आम्हावर नाही माघारा सरला. बहुत काय लिहिणे.

**पेद. २ ले. १३४** श्रीगजानन ६-१२-६०

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

गोपाळराव गणेश स्वामी गोसावी यासी,

पो|| सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणे विशेष. तुम्ही छ १३ रबिलाखरचे पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान सविस्तर कळले. आज्ञेप्रमाणे आपले फौजा सुधा पार उतरतो, सरकार काम यथास्थित करून लिहितो, जमीदार आदीकरून सिधच आहेत म्हणून लिहिले ते कळले. यैसेयासी उत्तम आहे. सत्वर पार उतरोन सारे जमीदार हाती घेऊन लिहिल्याप्रमाणे कार्य करून दाखविल्याने तुमचे चाकरीचा मजुरा आहे. नाहीतर बोलावे फार, होऊन काहीच न ये, असे जाहल्याने आहे विचार तो कलतच आहे. तरी जपून सर्व येथास्थित सत्वर बज्याऊन दाखवणे. तुमची फौज राजश्री गोविंद बलालाबरोबर होती, ती तुम्हाकडे येईलच, व राजश्री गणेश संभाजी याजलाही तुम्हाकडे यावे अगर फौज पाठऊन कुमक करणे म्हणोन पत्र पाठविले आहे. त्याकडे पाठऊन फौज आणवणे. तुम्ही याउपरी येकंदर दिरंग न लावणे. इकडे आबदालीचाही आवभाव कलोन गेला. येक दोन लडायाही सरदारांकडील किरकोळ फौजेसी जाहल्या. त्याचा मोड करून गोटात सारून घात (त) ले याउपरी त्याचा दम चालून येऊन लढाई करावयाचा राहिला नाही. सरकारच्या मोर्च्यास त्यांच्या मोरच्यास बाणाबाणाची तफावत होती. ते सरकारच्या मोर्च्यापुढे जेजालेच्या गोळीवर धमधमा बांधून त्यावरी तोफा ठेऊन मार दिल्हा. तो त्याच्या डेऱ्या पावेतो लस्करात लागू होऊन माणसे घोडी मरू लागली. त्या भयाने त्याणी तेथून कूच करून दोन कोस मागे सरून गेले. आपले मोरचे देखील उठऊन नेले, हे त्याची हिमत आहे. लौकरीच पुर्ते पारपत्य येथास्थित होईल. दिवसेंदिवस कम हिमती होत चालले. सत्वरीच चांगले पारपत्य होईल. तुम्ही लिहिल्या गोष्टी करून दाखवाल, तेव्हाच फौज ठेविल्याचे, पैका खर्च केल्याचे, व उमदगी मनात आणून लांबलांब लिहिता व बोलत होता त्याचे सार्थक आहे. ही संध फिरून येणार नाही. सर्व हाती घ्यावे. त्याचा अमल उठवून आपला अमल करावा, हे खबर पाठवणे. जाणिजे. छ १९ राा खर पार जमीदारानी दंगा केला होता. त्या दिवसात आपली फौज न गेली. आता जमीदार सुजातदौलाचे मातुश्रीने बेणीबाहादराने समजावले. असो जमीदारांस हालामानी पाहिजेच. तुम्ही पार जाऊन दमाने जमीदार हाती घेऊन आपण तूट सोसून जमीदार न दुखाविता कार्य करणे. सर्व सामील होतील. ज्यास पत्रे पाहिजेत ते लिहिणे. पाठऊन देऊ. मोगलाची फौजही सुभ्यात जमीदार तुम्हासी बिघडले तरी

पेच पडेल. सारा बंदोबस्त जालियावर बारिक बंदोबस्त होईल. तूत सर्वास सुखलगाम रजावंदी उमेदवार करून भारी जमाव करणे. सामील होतील त्यावर कारकुनी तूर्त न काढणे. जागीर मनसबाविस उमेदवार करणे. दिलीपर्यंत डाक बसवणे. आजुरा पडेल तो खर्च करणे. प्रतापगडवाले व बलवंतसिंग वगैरे सर्व हाती घेणे. कासीमधे अमल होऊन जमीदारांमुळे उठला तसे न करणे. आपण उपास करून त्यास रजावंद करून मोठे काम करून दाखवणे. मेहनतीनेच सर्व थोर जाहले. ईस्वरे थोर यश दिल्हे तर थोरपणही होईल. सत्वर जाऊन काम करणे. रा छ २७ राखर हे विनंती. गंगापारचे रोहिले त्यांचे मुलकांतही दंगा जमीदारांपासून होई हे जरूर करणे. जमीदार उमेदवार करावे तेव्हा सर्व होईल हे विनंती.

**राज. ३ ले. २१०** २१ दिसंबर १७६०

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबूराव कोनेरे स्वामी गोसावी यासी: पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. चिरंजीव राजश्री भाऊसाहेबांचे पत्र छ ५ रबिलाखर पानिपतच्या मुक्कामीचे आले की, आपली व अबदालीची सन्निधता जाली. दो कोसांची तफावत राहिली आहे. रोज लहान लहान झुंजे होतात. ऐशियास, फौज मातब्बर, समीपता जाली असता खबर न यावयास कारण काय? युद्ध जाहाले किंवा सलूख जाहाला, काय मजकुर जाहाला? अलीकडे वर्तमान तहकीक आले असिले तर पत्रदर्शनी लिहिणे. राजश्री नारो शंकर यांस पत्र पाठविले असे. ते दिलीस रवाना करून उत्तर पाठवणे. खासा स्वारी हिंदुस्थानास येते. राक्षसभुवनावर मुक्काम आहे. दरमजल हिंदुस्थानास येतो. चिरंजीव राजश्री दादा निजामअलीस आणावयास गेले आहेत. दिल्लीकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणे. जाणिजे. छ १२ जमादिलावल बहुत काय लिहिणे. हे विनंति.

## गोविंदपंताच्या मृत्यूची बातमी

**राज. १ ले. २७२** ।।श्री।। २३ डिसेंबर १७६०

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर गोविंदस्वामी गोसावी यासि:

पोष्य सदाशिव चिमणाजी - विनति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. गोविंद बल्लाळ दिल्लीकडे फौजसुद्धा आले. गाजुद्दीनगरानजीक त्यांचा व गिलज्याचे फौजेचा मोकाबला होऊन गोविंदपंतांच्या फौजेने शिकस्त खाऊन पळाली. मशारनिल्हे झुंजांत राहिले म्हणोन वर्तमान येथे आले. बाळाजी गोविंद फौजसमागमे गेले. ते व सारी फौज कोठे एके जागा होईल ते लिहिले आलियानंतर कळले ते एके जागा होऊन दिल्लीत येतील. त्यास गोविंदपंत राहिले हे वर्तमान तिकडे कळल्यानंतर मामल्यात जमीनदार वगैरे फिसाद करतील. तर तुम्ही सावधपणे राहून शिबंदी अधिक उणी लागली तर ठेवून, कोठे फिसाद न होतां, पूर्ववत् प्रमाणे बंदोबस्त राहे ते करणे. मशारनिल्हेचे पदरी मातबर शिवराम गोविंद वगैरे आहेत, त्यांचे समाधान राखोन सर्वा गोष्टींचा बंदोबस्त करणे. मोगलाकडील कोणी दहा पाच हजार फौज घेऊन येऊन तीकडील अमल करितो असे नाही. परंतु इकडील गोविंदपंताच्या वर्तमानाने तीकडील जमीदार चार आहेत ते तूर्त डोई उचलतील, दंगा करितील, ठाण्यास दगा करितील. यास्तव मजबुदीने राहून ठाणियात जे जे आहेत, त्याचा पुस्तपन्हा वरचेवर करून ठाणी मजबूत रहात ते करणे. कदाचित् वसुलास जमीदारांनी चार दिवस खलेल केलिया पुढे सर्व नीट केले जाईल. परंतु

ठाण्यास दगा जालियाने वाईट. यास्तव ठाणी सर्व फार हिमतीने राखणे. तुम्ही तिकडे आहा. गोविंदपंतांनी मातबर शिवराम गोविंदासारखे पदरी बाळगले आहेत. त्यास हिमत धरून अशा समयात गेली गोष्ट सुधारून दाखवावी. झाले गोष्टीचा खेद न करावा. ईश्वर इच्छेस उपाय नाही. तुम्ही आपले सर्व प्रकार समाधान असो देणे. बंदोबस्त उत्तम प्रकारे करणे. इकडील फौज शिकस्त खाऊन तिकडे गेलियाने फार वाईट दिसते. यास्तव त्यास तिकडे जाणे उत्तम नाही. त्यानी जमा होऊन मागती दिल्लीस यावे. याप्रमाणे येथून त्यास लिहिले आहे. तुम्ही त्यास याप्रमाणे लिहून ते दिल्लीसच येत ते करणे. त्यामागे तुम्ही सर्वांनी हिमत धरावी. मामल्यात बंदोबस्त उत्तम ठाणीठुणी मजबूद असावी, यातच सरकारचेहि काम व तुमचेही स्वरूप आहे. तुम्ही मामलियात आहा. सर्वांचा दिलासा करून बंदोबस्त करणे, घाबरे झालिया जमीदारच वाखा करतील. दिलात चिंता न करणे. आम्ही आहो. सर्व नीट करू. ठाणी जतन राखणे. मुलकाचा बंदोबस्त करणे. जाणिजे. छ १४ जमादिलावल. बहुत काय लिहिणे हे विनंति.

**इसं. ऐ. टि. भाग ३ पान ५५** ता. २४ डिसेंबर १७६०

श्रीमंत राजश्री रावसाहेब स्वामीचे सेवेसी : -

विनंति सेवक रामाजी अनंत साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत चंद्र १५ जमादिलावल मुकाम पानिपत स्वामींचे कृपेकरून सुखरूप असो. विशेष: बहुत दिवस स्वामीकडून पत्र येऊन सांभाळ होत नाही. तेणेकरून चित्त सापेक्षित आहे तरी सदैव कृपापत्र पाठवून सांभाळ करीत असले पाहिजे. इकडील वर्तमान तरी, आज दोन मास मोगलांसी लढाई होत आहे. दोन लढाया उत्तम जाहाल्या ; ते समयी मोगलांचा मोड जाहला. श्रीमंतांची फत्ते जाहली. एक बळवंतराव गणपत स्वामींच्यावरी खर्चले एवढी गोष्ट ईश्वरे वाईट केली. त्यांचे स्त्रीने आपले सार्थक केले. राजश्री गोविंद बल्लाळ यांस अंतर्वेदीतून नजीबखानाच्या मुलकात रसद बंद करावयानिमित्य बोलाविले होते. ते येऊन मेरटेस पावले. रसद बंद काहीसी केली. हे वर्तमान गिलज्यास कळताच पाच सात हजार फौज यमुना उतरोन पाठविली. ते फौज गाजदीनगराजवळ गोविंदपंताजवळ पावली. काहीसे युद्ध जाहाले, तेव्हा सोसेनासे पाहिले मग निघाले. गोविंदपंत्राचा पुत्र व पाराजीपंत वगैरे दिल्लीस येऊन दाखल जाहाले. गोविंदपतांची ठिकाण अद्याप लागले नाही. पळाले की कामास आले. हे ठीक नाही. ठीक खबर आलियावरी लेहून पाठवू. श्रीमंत राजश्री नाना सहकुटुंब सुखरूप आहेद. शरीर फार बारीक आहे. आपणास वरचेवर त्याची पत्रे येतच असतात. आम्ही ल्याहावेसे काय आहे? बहुत काय लिहिणे, कृपा केली पाहिजे ही विनंती.

**ऐ. पव्य. लेख ९७** ।।श्री।। मार्गशीर्ष वा. ७ शके १६८२

ता. २८-१२-१७६०

चिरंजीव राजमान्य राजश्री मोरोबादादा यांप्रति बाळाजी जनार्दन आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागाईत छ. १९ जमादिलावल पावेतो मुक्काम पाणिपत येथे सुखरूप असो विशेष. बहुद दिवस जाहले, आपणाबद्दल पत्र येऊन काहीच वर्तमान कळत नाही, तरी निरंतर पत्री संतोषवीत जावे. इकडील मजकूर: पूर्वी कुंजपुऱ्यास लढाई जाहली. अबदुल समदखान वगैरे मारले, त्याजवर अबदालीची गांठ पडली. कृष्ण जोशी संगमेश्वरकर यास गोळा लागून देवआज्ञा झाली. इतके वर्तमान तपशीलवार लेहून पाठविले होते. त्यावरून साकल्य कळलेच असेल. त्या अलीकडील मजकूर तरी याणी तोपखान्याचा अरबा पसरून खंदक खणून पाणिपत गांव आपल्या पाठीशी घालून सड्या फौजा तोफांचे मागे उभ्या या प्रमाणे बंदोबस्ताने राहिले आहेत. बुणगे गावाचे पुढे फौजेचे मागे ठेविले आहेत.

त्यापाशीही चालीस पन्नास तोफ चांगली आहे. साठ हजारापर्यंत फौज आहे. एके दिवशी सरदाराकडील बाजुकडे त्यांची फौज वाढून आली. त्याची याची लढाई चांगली झाली. शिंद्याकडील लोकांनी त्याना गोटात नेऊन घातले. सहाशे पावेतो माणूस जखमी व ठार त्याजकडील जाहाले. याजकडीलही दोन अडीचशेपर्यंत ठार व जखमी झाले. अस्तमान झाले, यास्तव लढाई राहिली. त्यानंतर पंधरा दिवशी छ २८ रविलाखरी श्रीमंताकडील मोर्चावर चालून चार पाच हजार आले. वरकड फौज त्यांची पाठीमागेच उभी होती. त्यांची याची लढाई होऊ लागली. लढाईस आरंभ होताच अस्तमान झाले, ते दिवशी बळवंतराव गणपत यास छातीत गोळी लागली. तसेच घोड्याखाली पडले. तो त्याजकडील माणसे धावली. त्यातील एकाने तोंडावर तरवारीचा वार केला. दुसऱ्याने गळा कापून ते शीर नेऊ लागले तो पाचसात राऊत धावून सोडविले. गळा अर्धा कापला होता, तसेच आणून दहन केले. समागमे स्त्री अग्निप्रवेश केली. त्या दिवशी त्याजकडील दीड हजार माणूस ठार आपल्या आराब्यापुढे पडले होते. त्यांचेपुढे किती होते हे कळलेच नाही. औशीची तीन घटका रात्र पावतो लढाई झाली. आपल्याकडील दिडशे पावेतो ठार व पाचशे सातशे पावतो जखमी झाले. ही लढाई फार चांगली झाली होती; परंतु बळवंतराव यांचा प्रकार असा झाला त्यामुळे ते सर झाले. त्यावर गोविंद बल्लाळ यांस पूर्वीपासून पत्रे जात होती की, अंतर वेदींत उतरून अबदालिचा रस्ता बंद करणे. या वरून ते दरमजल दिल्लीच्या सुमारे आले. तेथील नारो शंकर याचीही काही फौज मदतीस घेतली व पुढे रस्त मारावी तो अबदालीने दहा हजार फौज निवडक पाठवून दगा केला. कोणी लढले कोणी पळाले. गोविंद बल्लाळ यांचे शीर कापून श्रीमंताकडे आणून दिले, मग दहन झाले. गोविंदपंताकडील वगैरे तीन चारशे फौज ठार झाली. गोविंदपंताचे चिरंजीव बाळाजी गोविंद समागमे होते, ते पळून नारो शंकर याजजवळ दिल्लीस आले. कोणी कोणी पळालेले लोक येत. याप्रमाणे झाले. मोठे दगेबाज याजकरताच अरबा पसरून खंदक खणून मोगलाई रीतीने राहिले आहेत. दोन महिने याची त्यांची लढाई होते; अद्यापी लढावे हाच निश्चय उभयतां पक्षी झाला आहे. ईश्वर काय परिणाम लावील तो खरा. मनसबा भारी पडला आहे. पैसा नाही, महागाई फार; यामुळे लष्कर गलबलले आहे. याप्रमाणे वर्तमान आहे. आपले बुणग्यात गोळे जातात. त्याची बहुत पत्रे मी पाठविली, परंतु आपणास एकहि लिहावयास अनुकूल न पडले! बरे असो बहुत काय लिहिणे? लोभ कीजे हे आशीर्वाद. हे वर्तमान तीर्थस्वरूप र।। बाबांस लिहून पाठवावे हे आशीर्वाद. पेटाफुलभरी येथील फडनविशी महादजीपंत कुंटे यांस दिल्ही आहे. त्यास त्यांचे वेतन उत्तम प्रकारे होय अशी विनंती श्रीमंतास करून घ्यावे. मी आपणास लिहावे असे नाही. असामी आपले घरचा, परंतु महादजीपंत यांची पत्रे येताता त्यावरून लिहिले आहे. हे आशीर्वाद.

**शिंदे इ. सा. १ ले. २२२** ।।श्री।। संवत् १८१७ मार्गशीर्ष वद्य १३

शिक्का ४ जनवरी १७६१

राजश्री लालाजी बलाल कमाविसदार प्रा।। कोटे गोसावी यांसी,

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने।। जनकोजी सिंदे रामराम सुभा इहिदे सितेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. कोटेकराचे व प।। पाटण येथील वर्तमान लिहिले ते सविस्तर कळले. त्यास सेत्रुचे पारपत्य जाल्यानंतर कोटेकर वगैरे रजवाडे सर्व पादाक्रांत होतील. चिंता न कीजे. प।। पाटण येथील वर्तमान लिहिले. त्यास गारागेरवा ह्याच परगण्यावरी पडल्या असा अर्थ नाही. ज्याप्रमाणे वरकड परगण्याची वाढ होईल त्याजप्रमाणे ह्या परगण्याचीही केली जाईल. इकडील वर्तमानाविसी लिहिले. त्यास दोन वेला अबदालीसी व आम्हासी जुझ जाले.

पाच सात हजार रोहिले जिवेच मारिले. तीन हजार पर्यंत जखमी केले. तीन च्यारसे निशाणे आणिले. हती चार आले. छ. २१ मारे जमादिलौवली (३० दिसंबर १७६०) मोगल कूच करून दिलीच्या मार्गावरी आमच्या समोर राहिला आहे. तुम्हास कळावे यास्तव लिहिले आहे. जाणिजे छ २६ माहे जमादिलौवल. सारांश गोष्ट की तोटा नफा तुमचा तुम्ही सांभालावा. करारा प्र।। रुपये सरकारात द्यावे हेच उत्तम आहे. बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

पैवस्ता पौष सुध द्वितीया छ १६ जमादिलाखर (८ जनवरी १७६१)

**राज. ६ ले. ४०६** ।।श्री।। शके १६८२ माघ शु. १.

१९ जाने. १७६१

श्रियासह राजश्री सुभानबा यासी -

सखोजी जाधवराव आशीर्वाद उपरि. येथील वर्तमान ताा माघ शुद्ध १ मुक्काम कुंभेर यथास्थित असे विशेष. पाणिपतावरी अडीच महिने मोर्चेबंदी करून राहिलो होते. गिलजाचा आमचा दो कोसांचा तफावत होता. सड्या फौजा पुढे, मागे बुणगे, याप्रमाणे मोर्चे बांधून, तोफा पसरून राहिलो होतो. एक लढाई कार्तिक शुद्ध १५ स जाली. व दुसरी लढाई आमावाशेस जाली. दोही लढायात दोही कडील फौजा कायेमच होत्या. गिलजा आमच्या लष्कराभोवता फिरोन रस्त बंद केली. वैरण जाळली, यामुळे लष्करात काळ पडला. दोन अडीच शेर दाणे जाले. लोकास अन्न न मिळे, ऐसा प्रसंग जाला. घोडी तो बहुत लोकांची मेलीच होती, राहिली तीही पोटामुळे तुटली होती. निदान प्रसंग जाणोन, पौष शुद्ध अष्टमी बुधवारी हल्ला केला. पुढे फौजा त्यापुढे तोफखाना, बुणगे पाठीवर समागमे घेऊन, निघोन मोगलावर चालोन जाऊन, जुंज उत्तम प्रकारे केले. अडीच तीन प्रहरपर्यंत युद्ध चांगलेच जाले. राजश्री विश्वासराव यास गोळी लागोन ठार जाले. इभ्रामखान गारदी यास गोळ्या लागोन ठार जाले. वरकडही कितेक मातबर लोक कामास आले. आपले फौजेने शिकस्त खादली. ज्यास जिकडे सोय पडली तिकडे निघाले. कोणी कोणास मिळाले नाही. राजश्री मल्हारबाबा हजार दोन हजार फौजेनशी निघाले. राा नारो शंकर दिल्लीस होते. त्याजपाशी पाच सात हजार होती. तितक्यानशी निघोन सौभाग्यवती पार्वतीबाई दोन चारशे स्वारानशी निघाली होती. त्याची राजश्री मलारबाची गाठ वाटेत पडली. त्याजला ते सांभाळून घेऊन चमेलीपार भदावरच्या मुलकांत गेले. वरकड फौज बाळोच्याच्या मुलकातून ज्यास जिकडे वाट फुटली तिकडून निघाली. वाटेने गाव मातबर गावोगाव रावतांचा भरणा. जाबीगार फार. दोन दिवस रात्रं दिवस गवारांचे जुंज पुरवले. घोडी थकोन राहिली. कोणाचे घोडे निभावले नाही. तमाम फौजा पाय उतारा जाली. आमचीही घोडी तमाम थकली. आम्ही मागाहून डोल्यात व गाड्यात बसून हळुहळू कुंभेरीस आलो. तेथून भरतपुरास जात होतो तो ठाकूर सुरजमल्ल यांनी सामोरे येऊन भेटले. फिरोन ते व आम्ही समागमे कुंभेरी आलो. तेथून राा मल्हारजी बाबाकडे पत्रे लिहून पाठविली आहेत. त्याचे प्रतिउत्तराची मार्गप्रतीक्षा करीत असो. दो चौ रोजांनी त्यांचे उत्तर आले म्हणजे येथून स्वार होऊन आपल्या परगण्यात सिपरी व कुलारसास जाऊ. तेथून सविस्तर वर्तमान तुम्हास लिहून पाठवू. सिपरी येथून चौ रोजाची वाट आहे. लौकरीच जाऊ सौ।। पार्वतीबाई व राा मल्हारजी होळकर जिवानिशी मात्र गेली. राा भाऊसाहेब कोणीकडे गेले त्याचे अद्याप ठिकाण नाही. राा जनकोजी शिंदे यांचेही ठिकाण नाही. वरकड सरदार, कोणी पुढे गेले, कोणी अद्याप मागेच आहेत. सारांश आपले फौजेचा विध्वंस जाला तो लिहितां पुरवत नाही. ईश्वरी सत्तेने होणार ते जाले.

सिपरीस गेलियावर सर्व सरंजाम नवा केला पाहिजे. ईश्वरी कृपेने होऊन येईल. तुम्ही कोणेविशी काळजी न करणे. तुम्ही आपले ठाई सावध राहणे. आपले वर्तमान लिहून पाठविणे. ब. का. लि. आशी.

पुद. ३ ले. २०९

शके १६८२ पौष व. ९
इ. स. १७६१ जानेवारी

नाना पुरंदरे यानी आपल्या मातुश्रीस पत्र लिहिले असे.

तीर्थरूप मातुश्री आबई वडिलाचे शेवेसी -

आपल्या नानाने चेरणावरी मस्तक ठेऊन सिर साा नमस्कार विनंती येथील वर्तमान ताा पौश वद्य ९ (२९ जानेवारी १७६१) मु।। भिंड चमेल दक्षिणातीर येथे ग्वालेरी पंधरा कोसपर्यंत वडिलाचे आसीर्वादे करून सुखरूप आसो विशेष पाणिपती होतो तेथे सविस्तर जासुदाबरोबर लेहून पाठविले ते कासीद पावले आसतील त्यास पौश शुाा ८ आष्टमीस श्रीमंतानी गिलज्याचे फौजेसी जाऊन युध्ये मोठे मातबर केले त्यास श्रीमंताचे फौजेने सिकस्त खादली तोफखाना बुनगे हाती घोडे बाजार गिलज्याने लुटिला वीस पचवीस हजार माणूस गिलज्याने धरून नेले फौजा चहूकडे पळाल्या आम्ही व मल्हारबा होलकर येकीकडे निघालो भऊसाहेब येकीकडे गेले चौघे चहूकडे गेले श्रीमंत राजश्री विस्वासराव गोली लागोन ठार पडिले गिलज्याने मुडदा नेला वरकड मोठे मोठे लोक राहिले बाजी हरी त्याचा पुत्र दादा व बालाजीपंत त्याचा जावई हे राहिले आताजी माणकेस्वर राहिले आमची वस्तभाव घोडी उटे सर्व गेली. सखोबा बाल्या कृष्णा महादेव दोघे आचार्ये कोनेरी ब्राह्मण व आबाजी दादाजी व जिवाजीपंत वाघोलकर सर्व राहिले मारले गेले किंवा पळ येत आहे त्यात आहेत हे कलत नाही पाहावे खिजमतगार भोई खासबरदार सर्व राहिले कुणबिणी राहिल्या या प्रो सर्व लस्कराचे जाहाले बाकी राहिली नाही. कोणापासी येक तांब्या राहिला नाही. तीन चार उपोशणे सर्वास जाली दांडगियानी लस्कराचे लोक फार लुटिले गगोबा बलवंतरायाचे लेक आपा राहिले होते परंतु पलोन आले जिवानसी सुखरूप आहेत मैरालभाऊ खंडोबा आन्या आबा व गंगाजीबावा व चिमाजीबावा आले सुखे आहेत वरकड रामचंद्र जगथाप आबा व जानराव दुर्गोजीचा रामजी हे सर्व राहिले खोरकर बालाही राहिले मोठा अनर्थ जाहाला. आपले आसीर्वाद व मार्तंडाचे आसीर्वादे जिवानसी येथपर्यंत आलो पुढे आपले पाय द्रिष्टीस पडतीस तो सुदीन आहे सखा राहिला होता तो आला वरकड कोणीयेक नाही आता मल्हारबा व आम्ही येका जागा आहो सरकारची फौज दाहा हजार आम्हाबरोबर आहे सौ पार्वतीबाई राहिली होती परंतु येक खिजमतगार व पिराजी राउत याणी पाठीस बांधून पलउन आम्हापासी आणली मोठी विपत्य जाली प्रस्तुत येथे आहेत. बहिणाबाई व तिची सून नाना फडणीस ऐसी तिथे राहिली काये गत जाली असेल ती असो वरकड कित्येकाच्या बायका धरून नेल्या व मारल्या याप्रो गत जाली तुम्ही तिकडे खबरदार रात्रंदिवस राहाणे तिकडे मोगलाने दंगा केला तरी सावध राहाणे पुरंधरचे घर झाडून सारऊन ठेवणे काही गला पाठवावा रात्रंदिवस खबरदार राहणे वर्तमान वरचेवर लेहून पाठवावे भाऊसाहेबाचा थाग जयेनगराकडे लागला आहे कासीद खबरीस पाठविला आहेत ईश्वरकृपेने येतील जनकोजी सिंदे याचा थाग ठीक नाही लस्कर फार बुडाले बाकी राहिली नाही आम्ही ग्वालेरीजवळ फौजसुद्धा राहिलो श्रीमत राजश्री नानासाहेब फौजसुद्धा इकडे येवेतील मग आज्ञा मागोन वडिलाचे दर्शनास येऊ जिवेकरून खुशाल आहो वरकड गेले ईश्वर देता समर्थ आहे माणिक घोडा व सर्व गेली जरदी मोहनीमात्र मजखाले राहिली आहे वरकड दोन चार तटे रहिली आहेत

सर्व घोड्या घोडे गेले खंडु जाधव राहिला हरी सिवराम गोविंद सिवराम याचे भाऊ राहिले बाजी भिवराव याचे नातू नारायेणराव राहिला आपाजी जाधव व समशेर बाहादर दाडग्यांनी लुटले पायेउतारा येत आहेत येतील तेव्हा खरे कळले पाा हे विज्ञापना आता आपल्या मुलकात आलो चिता नाही सरकारचे सारे हाती गेले आमचा नागसुंदर गेला कलले पाा हे विज्ञापना.

**पुद. १ ले. ३९७** ॥श्री॥ श. १६८२ माघ शु. ९

इ. १३ फेब्रुवारी १७६१

तीर्थरूप मातुश्री आबई वडिलाचे शेवेसी

आपत्ये नानाने कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येतील वर्तमान ताा माघ शुध नवमी मुाा ग्वालेर वडिलाचे आसीर्वादे करू सुखरूप आसो विशेष कितेका प्रकारचे लोक जुजाचे वर्तमान वडिलास सांगतील त्यास न ऐकावे जुज जाहले श्रीमंताची फौज निघाली बुनगे हती घोडे सर्व लस्करचे गेले श्रीमंताचे गेले तोफखाना गेला चौघडे चौघे गेले आम्ही मलहारजी व सौा पार्वतीबाई भाऊसाहेबाची बायको ऐसी दाहा हजार फौजेनसी चमेल उतरून ग्वालेरीस अलो येथे आहो पहिले पत्र एक कासिदा बाो पाठविले ते पावले असेल त्यास आपली माणसे पलून लुटली वाटेने वस्त्रविरहत आम्हापासी आली सखोबा सुभाना सुर्वा जानू खिजामत गा(र) राणू सिंदा खिजमतगार इतके पाठीमागून येतात ऐकतो येतील तेव्हा लेहून पाठऊ वरकड खिजमतगार व घोडके बारगीर खंडू जाधव हवालदार व माहादेव वलणकर कृष्ण + + वेकू आच्यारी कोनरी कुसी बटीक व बहिरा हिरीचा ही सर्व येऊन पोहचली घोडी उंटे अगदी गेली मोहनी व शाहाजादी व तुरकी व करडी व दोन तटे व देवपुजी इतकी मात्र घोडी वाचली वरकड गेली या प्राो सर्व कटकाची गत जाहाली श्रीमंताचे काही राहिले नाही सर्व गेले आसो होणारास इलाज नाही ईश्वरी कृपेने सर्व आनकूल होईल बाला खोरकरहि आला घोडी विकत घेऊन दिल्ही चिरगूट पांघरुण दिल्हे आम्हापासीच आहे हातास बरछीची जखम होती बरा जाहला चिंता नाही मातुश्री गंगा मावसीस सांगावे सुपेकर बापाहि आले आम्हापासी आहे सुप्यास केसो भिवराव याजला सागून पाठवावे आन्याभाऊ दाजीबा आबा बाजी नारायेण जगोत्रा हेहि सुखरूप आहेत बाजी काकाचा लेक गोविद मागून येत आहे आसी खबर आहे येईल परंतु वाटेने जो पल येतो त्यास अंन मिलत नाही उघडी येतात आसे हाल जाहले आहेत येतील बाजी हरि सुभेदार व त्याचा पुत्र दादा व जावाई बालोबा गोपाळ रामाचे पुतणे तिघेहि नाहीत थाक लागलियावर लेहून पाठऊ बलवंतरावचा लेक आपा आम्हापासी आला आहे मातुश्री बाईस सागणे चिमाजी गागाजी खडोजी व जानोजी व पराणजी व आबा मानाजी देशमुखाचा हे आले रामचंद्र जगनाथ मागून येत आहे आम्ही ग्वाल्हेरीस आल्यावर राहुट्या डेरे उंटे घोडी पालखी घेतली भाडेकुडे घेतले सर्व मिळाले चिता कालजी न करणे याउपरी वडिलाचे दर्शन पाय पाहावे ही इच्छा आहे मार्तंड भैरव पूर्ण करील तो सुदीन आहे संतु कापशा मागून येत आहे लस्करचे मोठे हाल जाहले बरे काये करावे गोविद बापूस आम्हाकडे पाठवणे हे विज्ञापना.

चिरंजी बजू व बापू यासी आशीर्वाद बापू तुम्ही लोटमाल घोडी चागदेवी आहे ती व गिरजा घेऊन येणे सिराजा बजूला बसायासी ठेवणे हे असिर्वाद जानोजी बंगाल्यास आसीर्वाद हे पत्र दाखविणे हे विनंति.

राघो निबाजी व चिरंजीव माणकोबा व खडोळा चितोबा यासी नमस्कार व आसीर्वाद

सेवेसी जगनाथ रघुनाथ नमस्कार सर्व मंडळीस नमस्कार दया निरतर करीत जावी हे विनंति

पो छ १५ सावान ईहिदे

राज.६ ले. ४०९ | श्री | शके १६८२ फाल्गुन शुद्ध ४

२० फेब्रु. १७६१

पौ छ १६ रमजान चैत्र वद्य ३ सह
चतोर्थी बाा कासीद जोडी धनसिंग
प्रीतिराज याजबाा आली. अजुर्दार रामचंद्र
सामराज यांजकील कासीद ते प्रांतीचे

श्रियासह चिरंजीव राजश्री सुभानबा यास सखोजी जाधवराव कृतानेक आशीर्वाद उपरि येथील कुशल ताा फालगुण शुद्ध ४ चतुर्थी मुकाम ग्वालियेर यथास्थित असे. विशेष. आम्हाकडील वर्तमान तरी: पूर्वी तुम्हास भरतपुराहून पत्र पाठविले आहे. काा पाणिपतावरील अबदालीसी व आपल्या फौजांसी मुकाबला अडीच तीन महिने पडला होता. पौश शुध अष्टमीस श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांणी आपल्या फौजानिसी अबदालीवरी चालोन घेतले. बुनगे पाठीवरी घेऊन, पुढे तोफखाना देऊन, मजबुदीने चालोन गेले. गिलज्या गनीम भारी आणि कटा. तथापि आपले फौजांनी बरीच शर्त केली. निदान आपल्या फौजांनी सिकस्त खादली. मोड जाला. ज्यास जिकडे सोय फावली त्या मार्गे तो निघाला. बहुत लोक आपले फौजचे मारले गेले. ज्यास सोय फावली ते निघाले. आपले लस्करचे पन्नास हजार घोडे गिलज्यांनी व गाववाले गंवारांनी घेतली. ऐसी कधीही जाली नव्हती. अतैव, ईस्वरी क्षोभ, हे खरे. देशीही दु:श्चिन्हे जाली होती, ती तुम्हास ठाउकीच होती. व इकडेही तारा थोर पडला. व भूमिकंप दोनदा जाला, त्याचा फलादेश जाला. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब व सिंदे हेहि कुण्हीकडे गेले त्याचे काही ठिकाण (राा विश्वासराव श्रीमंत राजश्री नानासाहेबाचे पुत्र ठार जाले गोळी लागोन) नाही. त्यांची काय गत आहे नकळे. वरकड लोक पाय उतारा, आंगावरी पांघरुण नाही ऐसे, विपत्तीने आले. राा नारो शंकर व बाळोजी पलांडे दिल्लीत होते. दोन चार हजार फौज होती. ते पुढील पुढे निघाली. मागोन राजश्री मल्हारजी होळकर आले. हे लढाईतून अगोधरीच निघाले होते. याजवळी प्रस्तुत आठ दाहा हजार फौज आहे. आमची घोडी अवघी दिल्लीच्या वरले सुमारे राहिली. तेव्हा कठीण प्रसंग येऊन पडला! मग डोल्या करून, रात बिरात करून, श्रीपांडुरंगाच्या प्रतापे व वडिलांच्या पुण्ये करून कुंभेर भरतपुरास आलो. तेथे सुरजमल्ल जाट यांनी फार संगोपन केले. पंधरावीस रोज तेथे राहिलो. सुरजमल्ल यांनी आम्हाजवळी येऊन खबर घ्यावी. बहुतच त्याणी आदर केला की, मी तुमचे घरचा, तुमचा चाकर, हे राज्य तुमचे. ऐसे प्रकारे हात जोडून बोलावे! ऐसे प्रकारचे थोर माणूस! त्यांणी आपले राउत व मातबर सरदार देऊन लष्करास ग्वालेरीस पोहोचविले. आमचे खासा पथकातील अवघे पागा सिलेदार मिळोन (१००) शंभरेक राऊत आले. वरकड पाय उतारे आले. कुण्ही मागाहून येतात. माणसाचे हाल मोठे जाले! हत्ती, घोडे, पालख्या, डेरे, कुलसरंजाम अवघे लस्कराचा गेला. तेथे आम्ही आपले निवडून काय ल्याहावे? सारांश श्री कृपेने व वडिलांचे पुण्ये करून जिवानिसी शाबूत आलो! राजश्री मल्हारजी होळकर व आम्ही येके जागा आहो. मुलकातील तमाम जमीदार बदलले आहेत. दुंदी जाली आहे. श्रीमंत राजश्री पंत प्रधान सिरोंजेवरी आले. आम्हास पत्रे आली की, तुम्ही व राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री नाना पुरंदरे ऐसे मिळोन गोहदवाल्याचा बंदोबस्त करणे, त्यावरून मागती राजश्री मल्हारजी बाबा व नाना पुरंदरे, आम्ही ऐसे कूच करून गोहदेकडे शह देऊन राहिलो आहो. अबदालीकडूनही सल्याचे राजकारण मागती आले आहे. पाहावे. जे होईल ते वर्तमान मागाहून लेहून पाठवून. पूर्वीही सल्याचे राजकारण हमेशा येतच

होते. राजश्री मल्हारजी होळकर आदिकरून अवघ्याचे मते होते की सला करावा. परंतु राजश्री भाऊ कोण्हाचेही ऐकेनात. मोठे दुराभिमानास प्रवर्तले. गिलज्या गनीम भारी. त्याणे रस्त बंद केली. घासलकडी बंद केली. आपल्या लष्करात माहागाई जाली. रुपयाचा शेर अन दोन शेर. माणसे घोडी खायाविण उठली. तेव्हा श्रीमंतांनी दुराभिमानेकरून गिलज्यावरी चालोन घेतले. त्याचा हा प्रकार जाला. तो पत्री कोठवरी ल्याहावा? ईश्वरास ऐसेच करणे होते! आम्हाविसी काही चिंता न करणे आम्ही सुखरुप आहो. आम्हीच सलामत असल्याने सर्व गोष्टी मिळतील. चिंता नाही. या वर्तनामुळे कदाचित् देशात दक्षणचा मोगल उपद्वाप करील. तरी तुम्ही आपले ठिकाणी सावध राहाणे. वर्तमान कोण्हास प्रगट न करिता वाडीची सावधानी करणे. तुम्हास इशारत मात्र लिहिली आहे वरकड वर्तमान होईल ते मागाहून लेहून पाठवून बहुत काय लिहिणे? हे आसीर्वाद.

**राज. ६ ले. ४०७** श्रीरामनाम शके १६८२ माघ वद्य २

२१ फेब्रु. १७६१

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री नाना यासी: प्रति अनुपगीर जय सदाशिव उपरि येथील क्षेम जाणून आपले क्षेम छ १५ रजब पा कुशल वृत्त लेखन करून चित्त प्रमोदवीत गेले पाहिजे. विशेष बहुत दिवस जाहाले, आपणाकडून पत्रार्थ अवगत होत न होत. तेणे करून फार चिंतावस्थ निर्माण जाहले. तितक्यात रा॥ गणेश वेदांतीचा पत्रावरून साकल्ये कळो आले. युद्धप्रसंगी, छ ६ जमादिलाखर, पुशे शुद्ध ८ बुधवारी माहायौवनासी झुंजात रणमंडळातून श्रीमंत रायासी दुरानी घेऊन आले. त्या समागमे रा॥ बापू हिंगणे होते. ते दुसरे दिवशी तृतीय प्रहरी नबाब सुजात दौलाकडे वर्तमान आले. त्यासी नबाब सुजात दौला समाचार ऐकोन रायांचे लोथ आपणाजवळ आणविले. तेव्हा आम्हासी आज्ञा केले की येथासांग याचे सार्थक करणे. रजा दिले. तेव्हा आपले डेऱ्यासी घेऊन आलो. रा॥ गणेश वेदांती, रा॥ गणेश शंकर उज्जनकर, रा॥ कासीराज वकील, वेणीप्रसाद या समागमे गेलो. इतक्यात महायौवनाचे नशेकची येऊन लोथ परतोन नेले. दुसरे दिवशी महाप्रयत्न करावा लागलिया उपरात माहायौवनाचे शैन्यांतच होते. तिसरे दिवशी शुक्रवारी वर्तमान ऐकवले की, रणभूमीत स्वामीकार्यनिमित्य थोर थोर सरदार कार्येसी आले आहे. म्हणोन वर्तमान ऐकिले. ह्यासी नबाब साहेबासी सांगून रणभूमिका शोध केलो. त्यामध्ये एका शेरीरासी मस्तक न होते. ते शेरीरासी पाहोन, कोणाचे आहे म्हणोन शोध केला. त्या शेरीराखाली सात मोती सापडले. त्याचे चिन्हे उजवे पायावर केश नव्हते. दुसरे कटारीचे जखम कमरेसी होते. ते पाहोन, सरकारचे खिजमतगार रविवारी येथ आले होते, त्यांचे नावे बलराम, वाघोजी नाईक, रा॥ गणेश वेदांती, वरकड आपले कारकून मंडळी जे आले होते, सर्वांनी पाहिले. तेव्हा संताजी वाघ याणी उभयतांसी हस्तीवर घालून आणिले. मग चेंदनादिक विधी करविले. मग अस्थी ब्राह्मणद्वारेकडून रा॥ गणेश वेदांतीने भागीरथीसी पाठविले. या उपरि आपणाशी संदेह निर्माण जाहले असले तर आला जाठाकडे काही फौजा गेल्या आहेत त्याची बातमी आणून वकिलाचे पत्रावरून विदित केला पाहिजे. विशेष.

सो॥सी गणेश शेंकर उज्जनकर सा॥ नमस्कार विनंति उपरि: येथील वर्तमान सविस्तर पत्री लिहिले आहे, त्याजवरून विदित होईल. बहुत काय लिहिणे? हे विनंति.

ता. २१ फेब्रुवारी १७६१

**इसं. ऐ. टि. भाग १ पान २०-२१**

श्रीमंत राजश्री बाबूराव फडणीस स्वामींचे सेवेसी :

सेवक जिबाजी नाईक येवलेकर मुक्काम उज्जनी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागाईत माघ वद्य २ रविवार मुक्काम उज्जनी, येथे आपले आशीर्वादेकरून सुखरूप असो. विशेष. इकडील वर्तमान तर : श्रीमंत थोरले भाऊसाहेब व श्रीमंत राजश्री जनकोजी शिंदे हे दोघे मात्र व काही फौज थोडीशी घेऊन जे समयी लढाई जाहाली, ते समयी झुंज मातबर जाहाले. गिलच्याकडील माणूस मारले गेले चाळीस हजार, व गिलच्याकडील सरदार दोन मातबर पडले. सावकारी खबर तो ऐशी आहे की, मुख्य गिलच्याचा लेक उंबरशाहा, मलकाजमानीचा जावई, तो झुंजात ठार जाहाला. तोफेचे लढाईत गोळा लागला तो खराखुरा मारला गेला. दुसरे नजीबखान तोही मारला म्हणतात; परंतु त्याची खबर ठीक नाही. कोणी म्हणतो मारला गेला; कोणी म्हणतो नाही. परंतु नजीबखान यास जखम भारी आहे. एक भुज उडोन गेली, हेच तो खरे. वरकड आणखी सरदार मेले, ते कोणी वळखत नाही. नावाच सरदार दोनच. सुजातदौल्लाही जिवंत आहे. जे समयी लढाई जाहाली, ते समयी लढाई जाली. ते समयी यांनी तो त्यांचा मोड कछाच होता. परंतु थोरले भाऊसाहेब हत्तीवरून उतरले ते समयी आपल्याकडील सरदार यांनी मागे पाहिले. तो सरदार दिसेना! आणखी यांनी गिलच्याकडील फौज काही रुसून आली होती, ते दोन तीन हजार ठैविली. जे समयी इश्राम गाडदी याजकडील पडला, ते समयी गिलच्यांकडील जे चाकर ठेविले होते, ते त्यांनी माघारा पळोन बुणग्यात आले. बुणग्यास भास पडला की, गिलच्यांच जय जाहाला. यामुळे बुणगे लुठले गेले. आणखी, श्रीमंत, जे समयी विश्वासराव दिसेनात म्हणोन हत्तीवरून उतरले, इतकाच फेर पडला. त्यामुळे यांनी मोड खाल्ली. नाही तर फत्ते जाहाली होती. आता सर्व सरदार तो कायम आहेत. श्रीमंत विश्वासराव कोठे दिसत नाहीत. व भाऊसाहेब थोरले व राजश्री जनकोजी शिंदे हे जेथे लढाई जाली, तेथून विसा कोसांवर एक जमीनदार याची गढी तेथे होते. मग जमीनदार मिळोन आलां. जाट याच्या मुलखात गेलेत. तिकडून मथुरेस, जेथे मल्हारजी होळकर व राजश्री विठ्ठल शिवदेव व नारो शंकर व जे मोडले व सर्व एका जागा झाले. परंतु श्रीमंत भाऊ थोरले व श्रीमंत जनकोजी शिंदे ये जागा आहेत, हे कायम आहेत. त्यांची काही हातची पत्रे तो आली नाहीत! परंतु सरदार कायम आहेत. पुढे मथुरेस फौजेत एका जागा होणार. उपर श्रीमंत रामाजी भाऊ तो रेवाडीमध्ये उज्जनेचा मोड आला त्याजला भेटलेत. पायी चालत आलेत. गळ्यात कफनी, हाती स्मरणी, ऐसे सुखरूप आलेत. मथुरेस सुखरूप फौजेत गेलेत. चिंता नाही. त्यास श्रीमंत नानासाहेब सुरंजेस दर मजल गेलेत कळावे. आता आम्ही लष्करात जोड्या दोन पाठविल्यात. आलियावर जे वर्तमान येईल ते लवकरच लेहून पाठवून देऊ. कृपा लोभ असो दीजे हे विज्ञानपना. मिति माहे वद्य २ शनवार. याजपाशी पत्र देणे, लष्करात रवाना करू. सेवक पदरचा आहे.

२४-२-१७६१

**पेद. २ ले. १४८**

श्रीसांब शिव प्रांा

श्रीमंत रा पंत प्रधान स्वामीचे सेवेसी.

पो काशीराज शिवदेव दिा नबाब शुजाउदवला कृतानेक सांा नमस्कार विज्ञापना यैसीजे : येथील कुशल जाणून स्वामीही निजानंदवैभवलेखनास आज्ञा करित असले पाहिजे विशेष. येथील प्रसंग आपले सैन्यांचा व गिलज्यांचा मुकाबिला होता. कालचक्रानुसार विपरीतार्थ निदर्शनास आला तो परस्परे सौ विनंती जाली असेल.

येजमानांचा आपला स्नेह अविछिन आक्रित्रीम आहे तोच आहे. अगतिकत्वे येणे जाले. यशाशक्य सोरस्यास मनोदये होता, परंतु भगवतसत्ता येसीच होती. त्यास उपाये काये. जुंज मोडलियां माहायेवनेछा विपरीतभावे होती. त्यास आम्ही ब्राह्मण व आपले सेवक असता असा अर्थ व्हावा हे अनुचित जाणून येजमानास बोध करून महतायासे श्रीमंत भाऊसौ व श्रीमंत रावसौबांची शवे रणांगणीहून आणून ब्राह्मणमंडळीचे सहित चंदनादि उपचारे संस्कार केला हेहि त्याचेच पुण्यसहाये जाले की यैसा योग जाला असता संस्कार येथाविधि जाला. जे शर्तमर्दीची ते केली का नसे आपले आंश होते. येजमानास या प्रसंगामुळे बहूत खेदावह जाले. स्वामीराजांसहि परम दुखावह होईल. परंतु भगवत इच्छेस उपाये काये. स्वामी सर्वज्ञ आहेत. विज्ञापना करावी यैसा अर्थ नाही. सेवकास दासवर्गात जाणून सदैव आज्ञापत्री सनाथ करित जावे. बहूत काये लिहिणे. कृपा निरंतर आसो दीजे हे विज्ञापना. माघ कृष्ण १२ मुा दिली.

**राज. ६ ले. ४०८** श्रीसांबशिव शके १६८२ माघ वद्य १२

३ मार्च १७६१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री त्रिंबकराव नाना स्वामीचे सेवेसी :-

पाो काशीराजशिव कृतानेक साां नमस्कार विनंति उपरि येथील क्षेम माघ बहुल १२ जाणून स्वकीयलेखनी हर्षवीत जावे. विशेष. बहुता दिवसात कृपा करून पत्र पाठविले ते पाऊन लेखनाभिप्राय कळला. आनंद जाला. येथील वर्तमान तो आपणास क्लृप्तच आहे. श्रीमंत भाऊसाहेब व श्रीमंत रावजीचे साहित्य केले म्हणून लिहिले. त्यास, त्याही तो उभय लोक साधन केले. खेरीज, पुण्य की ऐसा योग जाला असता चंदनादि संस्कार ब्राह्मणहस्ते जाला! आम्ही असता न होय तर कोणे कार्यास यावे? आणिक सेवा न घडली. ईश्वरे हाच वाटा आम्हांस नेमिला होता! भगवत् इच्छेस उपाय काय? ग्रहस्त मंडळीचे साहित्यास लिहिले. त्यास, आपणाकडील राा सखोपंत व खंडोपंत वैगरे होते व आणीकही ग्रहस्थ मंडळी पाच चार शत व पाच सात हजार मनुष्य आपले सैन्याची होती. नवाबसास उत्तम प्रकारे विनंती करून जे साहित्य व आपले दास्य ते करून फतुदाबादेपुढे जटवाड्याकडे मार्गस्त केले. सुखरूप सेवेसी पावलिया सविस्तर सांगतील. नवाबखानास या प्रसंगामुळे बहुत खेदावह जाले. परंतु उपाय काय? भगवत्सत्ता खरी. श्रीमंताचा व नवाबसाहेबांचा स्नेह अविछिन्न अकृत्रिम आहे तोच आहे. या कलेवरास पोष्यवर्गात जाणून सदैव कृपापत्री सांभाळ करीत जावा. बहुत काय लिहिणे? कृपालोभ असो दिजे. हे विनंति.

**पुद. १ ले. ४१७** श्री श. १६८२ फाल्गून वाा १०

३१ मार्च १७६१

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री हरीपंत तात्या स्वामीचे शेवेसी.

पाो बालाजी जनार्दन साा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ताा छ २३ साबान पावेतो मुाा नजीक शिरोंदे येथे असो विशेष तुम्ही पत्र छ ११ रजबचे बेदरच्या मुकामचे पाठविले ते पावले लिहिलेत की हिंदुस्थान प्रांतीचे वर्तमान श्रवण करून दुख जाहाले ते गजानन जाणे परंतु श्रीमंत राजश्री भाऊसाहेब मंडलीसहवर्तमान आहेत म्हणून अईकिले याजवरून संतोष जाहला तर याचे तपशीलवार वर्तमान लिहून पाठवावे म्हणून लिहिले त्यास पूर्वी गुजरात अजुरदार जोडी करून लिहून सविस्तर वर्तमान पाठविले आहे परंतु दूरचा पंथ पत्र पावेल न पावेल याजकरता

लिहिले असे पौष शुद्ध अष्टमीस श्रीमंताची व आबदालीची लढाई जाली प्रहरभर लडले मग पल सुटला श्रीमंत विश्वासराव यास गोली लागून देवआज्ञा जाली मोठे मोठे सरदार असे पलाले खासा भाऊ मात्र पनास रावतानशी लडत होते तावत्काल मी समीप होतो पुढे गर्दी जाली ज्याला जिकडे ईश्वरे वाट दिल्ही तिकडे तो गेला त्यापासून भाऊचे ठिकाण नाही तो हा काल पावेतो नाही व मातुश्रीचेही ठिकाण नाही शोधास माणसे पाठविली आहेत ईश्वरी इच्छा प्रमाण प्रारब्धी असलियास चरण दृष्टीस पडतील वरकड आपले पंडळी पाो **पत्र दाखवू नये** (जाड टायपाचा मजकूर नानांनी तिरक्या टाकाने बारीक लिहिला आहे.)

आले जखमा बऱ्या जाहाल्या

(१) पुराणीक तीन जखमा तीन
(२) गोविंदभट उपाध्ये
(१) कृष्णभट
(१) आपाजीपत गोंधलेकर
(१) गंगाधर बावाजी जखमा (?)
(१) धोडोपंत लेले
(१) खंडोपंत नवे उमेदवार
(१) रामचंद्र नातू दिलीहू (तू) न

—

(१) पांडुरंगपंत बेडेकर

आले नाही

(१) बापुजीपंत येक जखम हातावर आहे पाठीमागून येतात ही खबर लागली मग माणसे शोधास पाठविली. येतील चिंता नाही.
(१) हरीपंत केलकर
(१) बाजीपंत जोशी
(१) बाळाजीपंत आठवले कारकून
(१) रामचंद्रपंत आगाशे
(१) कासीपंत नवे उमेदवार
(१) बाळकृष्णपंत दि।। नारोपंत पालद्ये
(१) नारोपंत दिवेकर
(१) श्रीधरपंत घाणेकर

—

९

या खेरीज ब्राह्मण जन व मराठी माणसे कितेक आली कितेक नाही. रामाजीपंत भाऊ व लक्षुमण बलाल व हरी शिवराम नारायण राव बापुजी गंगाधर नाईक ओंकार भवानी शंकर बाबाजी व बाजी हरी पितापुत्र व बगाजीपंत पारसनीस मल्हारपंत मुजमदार व कृष्णाजी अनंत बिनी (वाले?) याचे पुत्र व जनकोजी शिदे, सोनजी भापकर, तुकोजी शिंदे, मानाजी पायगुडे, येसवंतराव पवार अंताजी माणकेश्वर इतकियांचे ठिकाण नाही पनास हजार माणुस मारले गेले घोडी उटे नगारे निशाणे दप्तर कुल दौलत बुडाली पन्नास साठ हजार फौज पाो पाच सा हजार घोडी निभावली बाकी घोडी गेली पाय उतारा लोक लंगोट्या लावून आले भक्षावयास नाही पंधरा पंधरा उपवास ते हकीकत लढाईची वगैरे लिहिता पुरवत नाही कदाचित भेट जाली तर कलेल स्त्रीची गाठ सत्वरच पडली वीरशिगराव बारावकर याणी सभाळून आणिली फार केली श्रीमंत पार्वतीबाई यासही खिजमतगाराने सांभाळून आणिली मोठा वाखा जाहला याप्राो हे वर्तमान आहे श्रीमंत भाऊचे वर्तमान तर मी सुरजलमल जाटा (कडी)ल कुंभेरीस पंचवीस दिवस होतो तेथे नजीबखान सुज्यातदौला यांचे वकील तेथे आले होते त्यांची माझी भेटी जाली श्नेहसंपादन केले तदनंतर त्यांनी सर्व (यु)द्धाचे प्रकार सांगितले त्यात भाऊचे वर्तमान खुणामुद्रा (द्या?) नशी विपरीत सांगितले वरकड वकिलांनी कोठून पत्रे येतात त्यात लिहितात की भिकानेराकडे आहेत कोणी अला जाटाकडे आहेत असे लिहितात ईश्वरी इच्छा प्रमाण तात्या असी गत का (क) धीही जाली नाही व पुढेही होणार नाही शिकस्तीचे वर्तमान

आईकताच दिलीत नारो शंकर वगैरे सात आठ हजार फौज किल्ल्यात दोन महिन्याचा सरंजाम खजाना सात आठ लक्ष रुपये वगैरे टाकुन पलाले तेही दिलीहून लुच्यानी काही लुटले काही अले असे जाहाले मल्हारजी होलकर बाबूजी नाईक सदाशिव रामचंद्र वगैरे नवी फौज ग्वालेरीस राहिली पार्वतीबाई धाकटे नाना वगैरे आम्ही दरमजल थोरले श्रीमंताकडे येत आहो गोपाळराव भोसले वगैरे येथे ठेविले याणी च्यार दिवस राहून घेतले पुढे येऊ अत:पर चाकरी करणे नाही टोक्यास राहाणे हाच कृतसकल्प आहे पत्राचे उतर पाठविणे सविस्तर पूर्वील पत्रावरून कलेल बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे ही विनंती अबदाली दिलीस फौजसहवर्तमान आहे परंतु आपले देशास जाणार हे वर्तमान फार दाट आहे डेरही जाले श्रीमंत माघारे फिरले ही गोष्ट फार वाईट जाली बरे आपल्यास चाकरी करणे नाही मग मनसबा कशास पाहिजे हे विनंती.

* * *

## नाना फडणीसाच्या 'आत्मवृत्तां'तील पानीपत

**काइसं. पत्रे, यादी वगैरे ले. १९२** श्रीकृष्णप्रसन्न १७६१ जुलै नंतर

पुढे उत्तरेकडील यवन शत्रुत्वे करून यमुना पैलतीरी पाऊण लक्ष सेनेसहवर्तमान येऊन उतरला. परंतु यमुना भरपूर चालली तेणे करून उभयपक्षी स्तब्धताच जाहाली. पुढे कुंजपुरा श्रीमंतांनी शौर्येकरून घेतला. मीही युद्धात होतो. ईश्वरे रक्षिले. तो इत्कियात यवन अलीकडे आला. श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले. गाठ पडली, तेव्हा मी तर लहान श्रीमंताचे बुद्धीस महानबुद्धी (?). परंतु भावी अर्थ तेणेकरून विपर्यास पडला. आप्त होते बळवंतराव मातुल व नाना पुरंदरे वगैरे ते अनाप्त झाले. जे अनाप्त शहानवाजखानी, भवानीशंकर वगैरे ते आप्त जाहले. त्यांचे वाक्याचे ठायी विश्वास, तेणेकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची रीत धरिली. परस्परे युद्ध होत असे. गोळे प्रत्यही शत्रूचे राहुटीवरून जात. मातोश्री व स्त्री भयभीत होत. की कसे होईल? ते ते समयी मातोश्रीस विनंती करीत गेलो, की मी विनंती करितो. एक ईश्वरी लक्ष असावे. त्यात मातुल युद्धात होते ते पडले. तेच दिवशी सर्व सैन्य नाशास पावावे. परंतु रात्र जाहली यामुळे राहिले. त्या दोन महिन्यात मनुष्ये, पशु बहुत मेले. अन्नाची महर्गता. दुर्गंधी एकेच ठिकाणी. असे श्रम पाहिले. पुढे मातुळाची स्त्री समागमे गेली. मातोश्रीस श्रम फार जाहले. होणार आवश्यक होते. यदर्थी संदेह धरूच नये. हा माझा निश्चय. पुढे थोरले युद्ध उदयीक होणार तो पूर्व दिवशी संकेत की, पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हाती श्रीमंताचे कुटुंब व आपले लागू नये. आपणच नाश करवावा. आपण तर वाचत नाही असा सिद्धान्त करून श्रीमंतांनी याची ही योजना केली. दुसरे दिवशी तयार होऊन प्रात:कालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला. श्रीमंत अति बुद्धिवान्, धैर्यवान्, शूर कृतकर्मे गर्व मात्र विशिष्ट, परंतु तर्तूद फारच सैन्याची वगैरे केली. शेवटी निशाणाजवळील तर्तुद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्य स्थानीच गाठ पडली. मी श्रीमंतासन्निध ईश्वरस्मरण किंचित करून असे. तो विश्वासराव यास गोळी लागली, पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनी घालून उभेच राहिले. तो पठाण पायउतारा आत येऊन मिसळले. तोडातोडी होऊ लागली आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघड्याचे धनी देखील, पूर्वीच पळाले. उजवे बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघाले. दोन तीन शत पायदळ होते. श्रीमंत दिसेनातसे जहाले. तेव्हा ईश्वरे बुद्धी दिली. माघारे फिरलो. पूर्वी बापूजीपंती बोध केला, माघारे फिरावे. त्यास उत्तर केले की, अशा समयी श्रीमंतास सोडणे ठीक

नाही. परंतु पुढे याप्रमाणे जहाले. लक्ष सैन्य त्यात मोठेमोठे सरदार असता एकही ह्यासमयी श्रीमंतांस आप्त न जहाला. बहुत दिवस अन्न भक्षिले, कृपा पुत्रवत् केली. तितके चांगला काळ होता तेव्हा केशास ढका लागल्यास प्राण देऊ अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वर घटित विपरीत काळ त्यात सोबती कोण होतो? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरे करून करावे. वस्त्रे, जवाहीर, जागिरा द्याव्या. निदानी इतके असून ज्यांचे देहाचे ठिकाण कोणास ठाऊक नाही. सर्व वाताहत जहाले. मी सायंकाळचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतात आलो त्या देशाचा मार्ग अगदी ठाऊक नाही. तेथे परमेश्वरे वाट दाखवावयापुरते रामजीपंत उभे होते. सांगू लागले घोडे वस्त्रे टाकून द्यावी. त्यावरून सर्व टाकून शुद्ध लंगोटी लावून बसलो. रात्र जहाल्यावर चाललो. तो एका कोसात तीन चार वेळ शरीरास हात लावून टोपीवाल्यांनी झाडा घेतला. दरखेपेस समागमेचे दहावीस तोडून टाकीत. त्यात मी राहिलो, हे ईश्वराची सत्ता.

■

२

# फार्सी साधने

---

### होळकराची थैली

(राजवाडे खंड तिसरा पान १८१ यावर 'होळकराची थैली' हा मजकूर छापला आहे. त्या पानावरील तळ टीपेत नमूद आहे की

"येथे विसाव्या पानापासून पुढील सर्व हकीकत छापली आहे. शेवटली एक दोन पृष्ठे गहाळ झाली असून, उपसंहाराच्या काही ओळी शाबूत आहेत. पुढे जर पहिली एकोणीस पाने सापडली तर तीहि छापू."

सुदैवाने वरील 'होळकराची थैली' याचा संपूर्ण फारसी अनुवाद उपलब्ध झाला आहे. लक्ष्मी नारायण शफीफ औरंगबादी हा विद्वान साहित्यिक आणि इतिहासकार (इ. स. १७५० ते १८१४) हा औरंगाबाद येथे होऊन गेला. त्याने इतिहासावर तीन आणि उर्दू व फार्सी कवी आणि त्यांचे निवडक काव्य यावर दोन ग्रंथ फार्सी भाषेत लिहिले आहेत. निजाम घराण्याच्या इतिहासावर त्याचा मासिरे आसफी हा ग्रंथ असून तो अद्याप हस्तलिखिताच्या अवस्थेत आहे. कलकत्त्याच्या एशियाटिक सोसायटीतून तो ग्रंथ मागविला. त्यांत पान ६०८ वर तो म्हणतो,

"मल्हारराव होळकर या युद्धांतून सुरक्षित बाहेर पडला. त्याने या युद्धाची तपशीलवार हकीकत देणारे एक पत्र माळव्याहून बाळाजीरावाला पाठविले होते. तो मजकूर १० जमादिलारवर ११८० हिज्री रोजी (तेरा नोव्हेंबर सतराशे सहासष्ट) माझ्या हाती पडला. पत्र उद्बोधक आहे. म्हणून त्याचा मी फारसी अनुवाद देत आहे."

राजवाडे खंडांत न आलेला तेवढा मजकूर फारसी वरून मराठीत अनुवाद करून खाली दिला आहे. बाकीचा फार्सी मजकूर मूळ मराठीशी पूर्णपणे जुळतो याची खात्री करून घेतली आहे.)

### होळकराचे नानासाहेबांस पत्र

दंडवत विनंति उपरी. तिकडील कुशल कळवीत असो इकडील परिस्थिति अत्यंत शोचनीय आहे. पण परमेश्वरी इच्छेला जे येते तसेच घडते. त्याला इलाज नाही. लहान शोकसागरांतून मी बाहेर निघून आलो आहे. विज्ञापना की

आज्ञेप्रमाणे गंगा आणि अटकेपर्यंत दौलतीच्या शत्रूचा बीमोड केला. मन्सूरअलीखानाचा मुलगा (शुजाउद्दौला) मलिकाजमानी, गाजिउद्दीनखान बहादुर आणि बादशहा आलमगीर यांच्या प्रकरणात गुंतलो होतो. तो आपल्याकडून आज्ञा झाली की अंतर्वेदी सोडून इकडे यावे. इकडे बखेडा उपस्थित झाला. रोहिल्यांची पन्नास हजार फौज उभी राहिली. आणि ती इकडील सैन्याला मिळाली. स्वत: यांनी एक लाख पन्नास हजार फौज उभी करून दिल्लीवर चाल करून आले. ही भयंकर बातमी आली. डेरेदाखल होऊन आम्ही आणि राजेश्री जयाप्पा पन्नास हजार फौजेनिशी तयार होऊन वाट पाहात राहिलो. म्हणजे जेथे जेथे गडबड माजेल तिकडे लक्ष देता येईल. आणि मराठी फौज

मोहिमेत गुंतवता येईल. नंतर आम्ही यमुना ओलांडली आणि पन्नास कोस पुढे जाऊन लढाई केली. पण त्यांची फौज भारी आहे असे दिसून आले म्हणून आम्ही चाळीस कोस मागे आलो. आणि मदतीसाठी जाट आणि रजपूत यांना पत्रे लिहिली. शत्रूच्या सैन्यात आणि आमच्यात आता तीन चार दिवसांच्या मजलांचे अंतर राहिले होते म्हणून आम्ही तेथे मुक्काम करून राहिलो. इतक्यात अवचित पाऊस पडावा त्याप्रमाणे शत्रूने मजला मारीत आमच्या जवळ येऊन छापा घातला. अनेक लोक मारले गेले. फौजेची बहुत नासाडी झाली. राजेश्री जयाप्पा पाच हजार स्वारानिशी आघाडीला होते. ते आणि इतर सरदार मारले गेले. बरेच लोक कैद झाले. मी आपल्या परीने बरेच प्रयत्न केले. दुसऱ्या दिवशी फौज गोळा करून मी लढाई केली. आमची फौज लहान आणि शत्रूची फौज मोठी. तरी पण अफगाण (रोहिले) पळून गेले. मग मी तेथून निघून दिल्लीस आलो. शत्रू पण दिल्लीच्या जवळ आला. तेथे त्यांचा प्रतिकार करणे आवाक्याबाहेर जाणून मी दिल्लीहून निघून आलो. रजपूत आणि जाट यांचा ओढा त्यांच्याकडे (शत्रू) असल्याचे दिसून आले. शत्रूचे बळ वाढत होते. देश उध्वस्त झाला होता. त्या प्रांतांतील राजे राजवाड्यांनी शत्रूला निरोप धाडला की मराठ्यांची फौज दक्षिणेतून येईल. त्यांच्याशी तहाची बोलणी करावी हे बरे. दिल्लीत तुमचा अंमल राहू नये. असा निरोप आम्हालाहि आला मग त्यांनी (शत्रूने) दिल्लीचा बंदोबस्त केला आणि यमुना ओलांडली.

त्यानंतरची हकीकत म्हणजे स्वामींनी निजामअलीखानाशी युद्ध केले. त्यानंतर भाऊसाहेब, विश्वासराव यांना त्यांच्याबरोबर इब्राहीमखान गार्दीला देऊन लष्कर इकडे रवाना केले. हे सैन्य ग्वाल्हेरच्या सरहद्दीवर पोहोचले. हा सेवक त्वरा करून सैन्यात रुजू झाला. इकडील राजेरजवाड्यांनी फौज पाहून खंडण्या दाखल केल्या आणि सेवकत्व पत्करले. या भूमीवर आता प्रबळ लष्कर जमले. तेथून हे सैन्य दिल्लीस पोहोचले. तेथे शत्रुपक्षातील दहा हजार अफगाण होते. त्यांची कत्तल करून आम्ही दिल्लीचा ताबा घेतला. श्रीमंत राजेश्री विश्वासराव यांना बादशाही तक्तावर बसविण्यात आले. आणि सर्वांनी त्यांची आज्ञा मानावी असे बजावण्यात आले.

काही विरोधकांनी शुजाउद्दौला आणि अब्दाली यांना लिहिले की बादशाहीवर ब्राह्मणांची स्थापना होणे बरे नव्हे. हिंदूंचे राज्य झाले तर मुसलमानांचा काय परिणाम होणार हे दिसतच आहे. याप्रमाणे पत्रे लिहून क्षोभयुक्त पत्रे लिहून पाठविली ती उघडकीस आली.

सैन्यात एकलक्ष पन्नास हजार स्वार, चाळीस हजार गार्दी (इब्राहीम खानाच्या हाताखाली) व चवदाशे तोफा होत्या. हे सैन्य दिल्लीहून बाहेर पडले. यमुनेला भयंकर पूर होता. नदी पार होण्याची योजना करता आली नाही. उभय पक्षांना हीच अडचण होती. मग तोफा वगैरे घेऊन हे सैन्य कुंजपुऱ्यावर चाल करून गेले. कुंजपुरा फत्ते करून तेथील अफगाणांची कत्तल केली. दोन्ही सैन्यांच्या आपसात चकमकी सुरू झाल्या. अशा रीतीने दीड महिना लोटला. मग त्यांना (शत्रूला) दिसून आले की मराठ्यांची फौज जंगी आणि प्रबळ आहे. तेव्हा त्यांनी निरोप पाठविला की यमुनेच्या पलीकडचा मुलूख तुमचा आणि अलीकडचा आमचा असा करार झाल्यास उत्तम आहे. यावर आमच्याकडे सरदारात सल्लामसलत झाली. तोपर्यंत यमुनेचा पूर कमी झाला होता. भाऊसाहेब आणि विश्वासराव हे म्हणाले की परमेश्वर कृपेने आमच्या फौजेचा दबदबा आणि तेज ही शत्रूला दिसली आहेत. आपण त्यांचे म्हणणे कबूल करू. हे वर्ष या प्रांतात काढू. त्यांच्या फौजेची काही दिवसांनी उपासमार होईल. मग त्यांना लढणे कठीण होईल. याचा जो शेवट होईल त्याचे परिणाम पुष्कळ दिवस राहतील. यावेळी हिंदुस्थानात काय किंवा दक्षिणेत काय आमचा मुकाबला करील असा कोण आहे. फक्त हेच लोक (अफगाण) आहेत. म्हणून वर योजलेल्या

मसलतीपेक्षा आणखी काय पाहिजे. मग सरदारांनी शुजाउद्दौला आणि अबदाली यांना सांगून पाठविले की तुमचे म्हणणे मंजूर नाही. तुम्हाला लढण्याची हिंमत नाही. अशा परिस्थितीत तुम्ही तीन कोटि रुपये देऊन परत जावे. म्हणजे आम्ही कबूल करू.

हे ऐकून त्यांना (अफगाणांना) त्वेष झाला. आणि त्यांनी लढण्याचे ठरविले. त्याच दिवशी त्यांनी नदी ओलांडली. तोफखानाहि नदीपार करण्यात त्यांची दोन हजार माणसे कामास आली. त्यांच्यापाशी तोफखाना लहान होता. उभय पक्षाचे सैन्य दोन लाख पन्नास हजार होते. त्यावर नजर ठरत नव्हती. सैन्यात भाऊसाहेब, विश्वासराव, दमाजी गायकवाड, दत्ताजी शिंदे (जनकोजी पाहिजे), गोविंद पंडित बुंदेले, बळवंतराव, घाटगे, शिर्के, महाडीक, साळुंके, खंडागळे, काळे, पांढरे, सुळे, धुमाळे, कदम, माने वगैरे सरदार होते. त्याच्याबरोबर चाळीस हजार निवडक स्वार होते. आम्ही सैन्यांतून निघून बाजार बुणगे मागे सोडून परमेश्वराचे नाव घेऊन शत्रूवर तुटून पडलो. चाळीस हजार तलवारीची खणाखणी चालू झाली. ती पूर्ण एक प्रहर चालू होती. त्यावेळच्या प्रसंगाचे वर्णन काय करावे. प्रत्येकजण निर्धाराने लढत होता. एकानेही पाठ फिरविली नाही. आमच्या सैन्याने विचार केला की पुढे होऊन शुजाउदौला आणि अब्दालीचे इतर सरदार असतील तेथे जाऊन पोहोचावे. तोच बळवंतराव हे गोळी लागून पडले. त्यामुळे आमच्या फौजेत खळबळ उडाली. आणि पुढे कूच करून जाणे जमले नाही. मृतांना आणि जखमी लोकाना मैदानातून काढून छावणीत आणण्यात आले. दुसऱ्या दिवशीही युद्ध झाले. नंतर रोज दोन दोनदा चकमकी होऊ लागल्या. पुराणातील गोष्टी प्रमाणे घडत होते. चकमकीनंतर उभय पक्षातील छावणीत लोकांची येजा चालू राहात असे. अशा प्रकारे दीड महिने गुजरले. उभय दलातून बावीस हजार माणसे ठार झाली. बळवंतरावाच्या मृत्यूने भाऊसाहेब शोकग्रस्त होते. आमच्या फौजेतील लोक पूर्वीप्रमाणे निर्धाराने लढेनात. कुचराई करू लागले. पण चकमकींना प्रारंभ नेहमी आमच्याकडून होई. याचा परिणाम शत्रु सैन्यावर होई. भाऊसाहेबांनी दरबार भरवून सरदारांना सांगितले की लढाईत कसूर होऊ नये आणि अधैर्य दाखवू नये.

इब्राहीमखान गार्दीने या प्रसंगी म्हटले की एक महिना झाला, लढाया होत आहेत पण कामगिरी होत नाही. हे काम माझ्याकडे सोपविण्यात यावे. भाऊंनी हे कबूल केले. कुरुक्षेत्रावर कौरव पांडव लढले होते. आता तेथे आपण लढाई द्यावी असे ठरविले. कुरुक्षेत्रावर रणखांब उभा करण्यात आला. अफगाणांना सांगण्यात आले की तेथे तुम्ही लढण्यास येणे.

मराठे आपल्या भोवती तोफा वगैरे ठेवून बंदोबस्तात राहिले. अब्दालीने पाहिले की मराठ्यांचा तोफखाना जबरदस्त आहे. त्यांच्या समोर टिकणे कठीण आहे. त्याने चहूबाजूने रसद बंद करण्यास सुरवात केली. रोज सुमारे दहाहजार तोफखान्यापर्यंत येत आणि अनेकांना मारीत. इब्राहीमखान गार्दी आणि त्याच्या तोफखान्याच्या लोकांनी त्यांची चार पाच हजार माणसे मारून काढली. पाचसहाशे गार्दी मारले गेले. गार्द्यांनी मर्दुमकी चांगलीच गाजविली. पण या सैन्याची स्थिति दिवसेंदिवस अशी होत चालली की शक्ति राहिली नाही. शेवटी असे ठरले की निवडक सैन्य बाहेर काढून लढाई करावी. नाहीतर अब्रू धुळीत मिळेल. इब्राहीमखान गार्दीला असे वाटले की यांचा पराजय झाला तर हे लोक पळून जातील आणि माझ्या गार्दी दळाचा सर्वनाश ओढवेल. त्याने भाऊसाहेबांना सांगितले की आपण सैन्य बाहेर काढून लढाई करू नये. आपण ऐकिले नाहीत तर माझा तोफखाना आपल्यावर रोखण्यात येईल. हे पाहून भाऊसाहेब आपल्या जागीच राहिले. आपसातील मतभेदाची बातमी शत्रूलाही कळली. त्यांनी लढाईची

तयारी केली. हे पाहून इब्राहीमखानाने भाऊंना आश्वासन दिले की आपण काळजी करू नये. माझ्यावर पूर्ण विश्वास ठेवावा. असे म्हणून त्याने कुराणावर हात ठेवून शपथ घेतली. भाऊसाहेबांनीही बेलभंडार उचलून इब्राहीमखानाला आश्वासन दिले. त्यावेळेपासून भाऊसाहेब इब्राहीमखानाचाच सल्ला मानू लागले. तो म्हणेल त्याप्रमाणे वागणूक होऊ लागली.

दुसरे दिवशी अबदाली दीड लाख सैन्य आणि दीडशे सरदार घेऊन मैदानात येऊन ठेपला. इब्राहीमखानापाशी चवदाशे तोफा तीन हजार जेजालेवाले आणि तीस हजार गार्दी होते. तितकेच बाण टाकणारे होते. अब्दालीची फौज येताच इब्राहीमखानाने तोफांची सरबत्ती केली. मोठ्या तोफांतून एकोणीसशे सत्तर गोळे शत्रूवर टाकण्यात आले. अब्दालीचे पन्नास सरदार आणि बावीस हजार स्वार मारले गेले. बाकीचे पळून गेले. शुजाउद्दौल्याला गोळ्याच्या जखमा लागल्या. भाऊसाहेब इब्राहीमखानाजवळ आले. आणि त्याची प्रशंसा केली. त्याने सांगितले. की शत्रूचा धीर सुटला आहे. आपण असेच पुढे चाल करून जाऊ. भाऊसाहेबांनी हे कबूल केले. शहाजणे वाजविण्याची आज्ञा केली. आणि शत्रुसैन्याजवळ ते सर्व पोहोचले. हे पाहून अब्दालीचे सैन्य तीन कोस मागे हटले. त्यांनी टाकून दिलेल्या जागेवरच मराठी सैन्याने तळ दिला. विश्वासरावाची तोफखान्यावरील मुख्य म्हणून नेमणूक करण्यात आली. इब्राहीमखान आणि विश्वासराव हे घोड्यावर स्वार झाले. सैन्यात धीर आला. ठिकठिकाणी बंदोबस्त करण्यात आला. पण परमेश्वरी इच्छा वेगळी होती. कुंजपुऱ्याला पाठीशी घेऊन आम्ही राहिलो. लढाईचा प्रसंग घडला. कोठूनही आधार मिळाला नाही.

(येथून 'होळकराची थैली' राजवाडे खंड तिसरा पान १८१ च्या खालील मजकूर सुरू होतो.

''पठाण यांणी दुसरे दिवशी सावर घेऊन, कुंजपुरा घेऊन आमचे फौजे भोवती घेरा दिल्हा''

यानंतर पान १९१ ओळ तेवीस वर लिहिले आहे की ''या पुढे किती पाने गेली आहेत नकळे''

फारसी अनुवाद पाहता दीड पाने गहाळ झाली असावीत. तो मजकूर पुढे दिला आहे.)

''त्यांनी निकर केली आणि आमच्या लष्करात दाखल झाले. इकडून जेजले बाण इत्यादींच्या चालविण्यात कसूर झाली नाही. विश्वासरावांनी चिलखतधारी अशा पाच हजार स्वारांनिशी मर्दुमीची शर्थ केली. ते स्वत: सारखे तीर चालवीत होते. इतक्यात एक बाण त्यांना लागला आणि ते मृत्यु पावले. हे पाहून सैन्यात भयंकर हलकल्लोळ झाला. सैन्याचे पाय डळमळले. भाऊसाहेब म्हणू लागले की नानासाहेबांनी विश्वासरावाला माझ्या हवाली केले होते. मी त्यांना काय तोंड दाखवू आणि त्यांना काय उत्तर देऊ. आता हे जीवन आम्हाला संकट वाटते. आणि नकोसे झाले आहे. आता विश्वासरावांच्या पायावर पाय ठेवून मृत्यू गाठावा हेच बरे. मग त्यांनी आम्हाला त्वरेने निरोप पाठविला की आमच्या कुटुंबाला युद्धभूमीतून सत्वर घेऊन जावे. मग भाऊसाहेब हत्तीवरून खाली उतरले आणि बसवंत नावाच्या घोडीवर स्वार झाले. नंतर त्यांनी शत्रूवर चाल केली. आपणही लढावे आणि रणांगणांत जीव द्यावा हेच आम्हाला इमानीपणाचे वाटले पण भाऊसाहेबांनी दिलेली आज्ञा आठवली. तिचे पालन करणेच श्रेयस्कर होय असे आम्ही जाणिले. निरुपाय होऊन भाऊसाहेबांचे कुटुंब बरोबर घेऊन आम्ही लष्करातून निघालो. आणि सतत मजला मारीत काही दिवसांनी ग्वाल्हेरीस पोहोचलो. जे घडले ते घडले. परमेश्वरी इच्छेस उपाय नाही.''

(येथे फारसी मजकूर संपला. राजवाडेखंडात पान १९१ वर जी शेवटची ''राव व भाऊसाहेब याणी आपला पुण्यप्रताप'' वगैरे चार पाच वाक्ये दिली आहेत ती फारसी मजकुरात नाहीत.)

## अहमदशहा अबदालीचे पत्र

(पाटण्याचे सय्यद हसन अस्करी यांच्या प्रयत्नाने अहमदशहा अबदाली आणि जयपुरचा राजा सवाई माधवसिंह यांच्यातील पत्रव्यवहार उपलब्ध झाला आहे. इ. स. १९४५ च्या इंडियन हिस्ट्री कॉंग्रेसच्या अधिवेशनात त्यांनी दुराणीरजपूत वाटाघाटी या विषयावर निबंध वाचला. तो अधिवेशनाच्या इतिवृत्तात प्रसिद्ध झाला आहे. पानीपतचे युद्ध झाल्यानंतर लवकरच अहमदशहाने सवाई माधवसिंह यास पत्र पाठवून युद्धाची हकीकत कळविली आहे. पत्राचा इंग्रजी अनुवाद सय्यद हसन यांनी दिला आहे. त्याचाच मराठी अनुवाद खाली दिला आहे. सर जदुनाथ सरकार यांनीही त्या पत्राचा इंग्रजी अनुवाद माडर्न रिव्ह्यूच्या मे १९४६ च्या अंकांत प्रसिद्ध केला आहे.)

पानीपतची हकीकत देतांना अबदाली लिहितो ''पावसाळा होता. आणि नदीला पूर आला होता. यामुळे नदी ओलांडून पानीपत आणि कर्नालला पोहचणे कठीण होते. शत्रूंनी कुंजपुरा येथे अब्दुस्समखान आणि इतर सरदारांवर या पूर्वीच हल्ला केला होता. यामुळे आमचे विजयी सैन्य शत्रूंचा समाचार घेण्यासाठी शहादऱ्यातून बाहेर पडले. आम्ही यमुना ओलांडली आणि कूच करीत खरोड्याला पोहोचलो. तेथे शत्रूंनी आपले ठाणे बसविले होते. आमच्या सैन्याने ते सहज काबीज केले आणि शत्रू पक्षातील सर्वांची कतल केली. तेथून आमचे सैन्य पानीपतला पोहोचले. दक्षिण्यांनी त्या ठिकाणी मजबूत छावणी कायम केली होती. जवळ जवळ रोज त्यांच्यात आणि आमच्या गाजी सैन्यात चकमकी होऊ लागल्या. गाजीउद्दीन नगरच्या बाहेर गोविंद पंडित आपल्या सात हजार सैन्यासहित मारला गेला. नंतर आम्ही चहूकडून शत्रूचा कोंडमारा केला. आम्ही त्यांचा रोज पराजय करीत होतो. त्यांच्या छावण्यावर आगीचा वर्षाव करीत होतो आणि कित्येकांना यमलोकी पाठवीत होतो. आणि त्याचा तपशील तुम्हाला कळलाच असेल.

अखेरीस, बुधवार रोजी तोफखाना, घोडदळ आणि पायदळ यांनी युक्त असलेले काफराचे सैन्य छावणीतून बाहेर पडले. गाजीना मारण्याचा त्यांनी निर्धार केला होता. त्यांनी अत्यंत निकराने आमच्या सैन्यावर पुन्हा पुन्हा हल्ले केले. माझ्या दूतांनी मला ही बातमी सांगितली. गेले दोन तीन महिने आमची आणि शत्रूची सैन्ये समोरासमोर छावणी करून उभी होती. या काळात शत्रूची सैन्ये रोज आपल्या छावणीतून बाहेर पडत आणि आमच्यावर हल्ला करीत. आमच्यात प्रखर युद्धे होत. आणि स्वत:ची अनेक माणसे मृत्युमुखी पडल्यावर शत्रू पराजित होऊन आपल्या छावणीत परत जात असे. असे आतापर्यंत घडत आल्यामुळे आजही तसाच प्रकार असावा असे मला वाटले.

पण त्यांच्या हल्ल्याची बातमी कळताच, त्यांचा मोड करण्याकरिता मी घोड्यावर स्वार झालो आणि मैदानात पोहोचलो. तेथे पोहोचून मी परिस्थितीचे निरीक्षण केले. मला खात्री पटली की आमचा प्रबळ शत्रू दोन लाख स्वार आणि पायदळ, जंगी तोफखाना आणि तीरंदाज याचे सैन्य घेऊन चाल करून येत होता. त्यांच्या रांगा एका मागे एक अशा सहा कोसापर्यंत पसरल्या होत्या. पुढे चाल करून, बंदुकी आणि बाणांनी हल्ला करण्यात ते अगदी उतावीळ झाले होते. ते पाहून मी पण आपल्या सैन्याची युद्धरचना केली. सैन्याच्या मी उजवी आणि डावी अशा दोन फळ्या केल्या आणि रांगामागे रांगा उभ्या केल्या. मग मी आपल्या पायदळ बंदूकधाऱ्यांना सरकारी तोफखान्याबरोबर राहून हल्ला करण्यास आज्ञा केली. माझा वजीर शहावलीखान याने आपले दळ घेऊन माझ्या तोफखान्याच्या पाठीशी ठाण मांडून उभे राहावे असा मी त्याला हुकूम केला. वजीर तोफखान्यापाशी येऊन दाखल होताच युद्धाच्या ज्वाळा भडकल्या. रणभेरी आणि रणशिंगे यांच्या ध्वनीने वीरांच्या अंगात स्फुरण संचारले. हा हा

म्हणता सिंहासारखे शूर वीर आणि शक्तिशाली शिपाई विजेप्रमाणे एकमेकावर तुटून पडले. त्यांनी गाजविलेले शौर्य यापूर्वी कधीच दृष्टीस पडले नाही. रुसतुम आणि इस्फिंदारसारख्या वीरांनी हे युद्ध पाहिले असते तर त्यांनी आश्चर्याने आपली बोटे चावली असती. शत्रूंनी इतके शौर्य दाखविले आणि लढण्याची इतकी शर्थ केली की इतरांकडून होणे अशक्य होय. उभयपक्षातील वीरांचे हात रक्तबंबाळ झाले.

युद्धाची सुरवात तोफा आणि जंबूरकांनी झाली पण लवकरच ती शस्त्रे मागे पडून तल्वारी आणि तीर यांचा मारा सुरू झाला. ती पण मागे पडून शूरवीर बरछ्या, खंजिरी आणि सुरे यांचा उपयोग करू लागले. पुढे पुढे तर उभय पक्षातील वीरांनी हातांनी शत्रूला धरून मारण्याची पराकाष्टा केली. शूर आणि क्रूर शत्रूने (मराठ्यांनी) शौर्याने लढण्यात कोणतीच कसूर केली नाही.

पण परमेश्वराची कृपा माझ्यावर असल्यामुळे, एकाएकी विजयसूचक वारे माझ्या दिशेने वाहू लागले. परमेश्वराच्या इच्छेने दक्षिण्यांचा दणदणीत पराजय झाला. नानाचा मुलगा विश्वासराव आणि भाऊ हे वजीराच्या दळासमोर लढत होते. ते मारले गेले. त्यांच्या बरोबर कित्येक सरदार मृत्युमुखी पडले. इब्राहीमखान गार्दी आणि त्याचा भाऊ हे जखमी अवस्थेत पाडाव झाले. बापू पंडित (हिंगणे) हाही कैदी झाला. शत्रूचे चाळीस ते पन्नास हजार स्वार आणि शिपाई आमच्या तलवारींना बळी पडले. उरलेल्यांनी पळ काढला. त्यांच्या पाठलागावर मी आपली पथके पाठविली. त्यात शत्रूची पंधरा ते वीस हजार माणसे मारली गेली. मल्हारराव आणि जनकोजी यांचे काय झाले ते कळले नाही. शत्रूचा तोफखाना, हत्ती, घोडे आणि इतर सगळी मालमत्ता आमच्या हाती सापडली आहे. जवळ जवळ सगळे हिंदुस्थान माझ्या ताब्यात आले आहे. आणि परमेश्वराने मला दिलेल्या राज्याच्या शत्रूंना आपल्या कर्माची चांगलीच शिक्षा झाली आहे. परमेश्वरकृपेने माझ्या हितचिंतकांच्या आशा फलद्रूप होऊ लागल्या आहेत. माझ्या राज्याचे एकनिष्ठ स्नेही यांनी माझ्या कृपेचा लाभ घेण्याची आता वेळ आली आहे. तुम्ही एकनिष्ठ आहात हे वृत्त माझ्या वजीराने मला अनेकदा कळविले आहे. तुम्ही आता माझ्याकडे लवकर आले पाहिजे. या देशाची व्यवस्था करण्याचे मी ठरविले आहे. त्या हेतूने मी राजेरजवाडे आणि अमीर उमराव यांना पाचारण केले आहे. तुम्ही पण आले पाहिजे. परमेश्वर करील तर तुम्ही पूर्वीपेक्षाही अधिक मानसन्मान आणि वैभव पावाल."

## पानीपत नंतर अहमदशाहाने काढलेला विजयाचा जाहीरनामा

(अठराव्या शतकात हैद्राबाद येथे गिरिधारीलाल नावाचा इतिहासकार होऊन गेला. त्याने इ. स. १७७१ मध्ये तारीखे जफरा या नावाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यात निजाम घराण्याचा इतिहास देण्यात आला आहे. हा ग्रंथ इ. स. १९२७ मध्ये मुद्रित झाला आहे.

या ग्रंथाच्या १४३ आणि १४४ या पानावर गिरिधारीलालने पानीपत नंतरचा अबदालीच्या विजयाचा जाहीरनामा दिला आहे. खजानाये आमिराचा लेखक गुलाम अली आजाद बिलग्रामी (इ. स. १७०४ ते १७८६) याने इ. स. १७६३ मधे खजानाये आमिरात पानिपतचा वृत्तांत दिला आहे त्यात सदर जाहीरनाम्याची वाक्ये जशीच्या तशी आढळतात. जाहीरनाम्याचा मराठी अनुवाद खाली दिला आहे.)

शहादुराणी अब्दाली याच्या वजीराचा शिक्का असलेला फत्तेनामा-शहाजहानाबाद राजधानी आणि राज्याच्या तमाम भागातील जनतेने सम्राटांच्या न्यायाचे आणि कृपेचे उमेदवार होऊन जाणावे की यापूर्वी कुटिल असा गोविंद बुंदेला हा विजयी सैन्याच्या तलवारीच्या आघाताने नर्काला गेला. कोपाला बळी पडलेला भाऊ याचे सगळे उपाय

बंद पडले. त्याचे पाय डगमगले आणि शक्तीचा लगाम त्याच्या हातातून सुटला. कोल्ह्याप्रमाणे तो अरुंद अशा बिळात घुसला. आणि हजार उपायांनी तो आपली स्वत:ची काळजी घेऊ लागला. या अवधीत रुस्तुमचे धैर्य असलेले, आणि अजगराची चिकाटी असलेले शूर वीर, यांनी शिकारी, सावज आपण होऊन टप्प्यात येईपर्यंत त्यांच्यावर नजर ठेवितात त्याप्रमाणे काफरांना घेरून त्या जनावरांचे अन्नपाणी बंद केले. फुटक्या कपाळांच्या त्या लोकांची संख्या कुत्री आणि डुकरे यापेक्षाही अधिक होती. त्यांच्या सैन्यात धान्याचा भयंकर दुष्काळ पडला. निरुपाय होऊन त्यांनी मृत्यूवर आपले लक्ष ठेविले. आणि पतंगाने दिव्यावर जाऊन पडावे किंवा पांखराने रात्रीच्या अंधारात आपल्याला अग्नीत लोटावे त्याप्रमाणे बुधवार सहा जमादिसानी हिज्री ११७४ रोजी, भयंकर आग असणाऱ्या तोफा आणि तोफखाना आपल्या समोर घेऊन ते आपल्या छावणी बाहेर पडले. आणि मुंगी आणि टोळ यासारखे असंख्य असलेले ते, विजयी सैन्यासमोर उभे ठाकले. विजयी सैन्याचे जवानमर्द वीर यांच्या समोर दर्यातील मगरी किंवा वडवानल काहीच नव्हत. परमेश्वरावर निष्ठा आणि इस्लामचे वैभव वाढविण्याची इच्छा यांनी ते प्रेरित झाले. शत्रूला आपल्या छावणीच्या बाहेर येण्यापुरता त्यांनी अवधी दिला. नंतर त्यांनी परमेश्वरावर भार टाकून आणि हातात तलवारी घेऊन काफरावर हल्ला केला. आणि डोळ्याचे पाते लवते न लवते तोच त्यांनी शत्रूरूपी धान्याची रास जाळून फस्त केली. त्यांचा पुढारी सैतानाच्या वृत्तीचा जो विश्वासराव याचे डोके कापून त्यांनी ते चेंडूप्रमाणे फिरविले. आणि त्या अधर्मी कुत्र्याचा नायब, फुटक्या नशिबाचा भाऊ हा गाजीच्या घोड्यांच्या टाचाखाली सापडून त्यांच्या डोळ्यासमोरून नाहीसा झाला. (मफकूदुल ऐन दिलावरान शुद) आणि तो काळा साप मल्हार शूरवीरांच्या तल्वारीचे भक्ष्य बनून, काळे तोंड करून पळून गेला. जनको हा मृत्यूच्या पाशात सापडून बादशाही छावणीतील कुत्र्या कावळ्यांच्या भक्ष्यस्थानी पडला. असंख्य सरदार नर्कात जाऊन पडले. बावीस हजार देखणे गुलाम आणि नाजुक कमरेच्या दक्षिणी दासी विजयी सैन्याच्या हाती पडल्या. ती सैन्यात वाटून टाकण्यात आली. अगणित संपत्ती हस्तगत झाली. जड, जवाहीर, रोकड, पन्नास हजार घोडे, तोफखाना, दोन लाख बैल, काही हजार उंट, पाचशे प्रचंड हत्ती ही सर्व विजयी सैन्याच्या हाती पडली.

हा विजय अत्यंत महत्त्वाचा होय असे सर्व इस्लामला वाटले. परमेश्वराचे आभार मानून या फत्तेनाम्याच्या प्रती चहूकडे पाठविण्यात येत आहेत. वास्तविक पाहता या विजयाने बादशाहाचे तेज आणि वैभव ही वाढली आणि शत्रूची तोंडे काळी झाली आहेत आणि त्यांचा शेवट वाईट होत आहे.

## मिराते अहमदी

(अली महंमदखान हा मोगल काळात गुजरात प्रांताचा दिवाण होता. इ. स. १७६१ च्या शेवटी त्याने फारसी भाषेत गुजरातचा इतिहास लिहिला. या ग्रंथाचे नाव मिराते अहमदी असे असून मूळ फारसी ग्रंथ गायकवाड ओरिएन्टल सेरीज मध्ये इ. स. १९२७ साली प्रसिद्ध करण्यात आला आहे. या ग्रंथाच्या शेवटी अली अहंमदखानाने पानीपताची हकीकत लिहून ठेविली आहे. ही माहिती आपण पानीपताहून पळून आलेल्या लोकांकडून गोळा केली आहे असे तो म्हणतो. अली महंमद खानाने बऱ्याच बाजार गप्पा आपल्या हकीकतीत दिल्या आहेत. अहमदशहाचा पराजय होत होता. पण ऐन वेळी शुजाउद्दौला व नजीबखान यांनी बाजू सावरली असे तो म्हणतो. याला काही आधार नाही. पण पानीपतानंतर अवघ्या एक वर्षाच्या आत लिहिली गेली म्हणून ही हकीकत वाचून पाहण्यासारखी आहे. यातील काही भागाचा अनुवाद श्री. यदुनाथ सरकार यांनी केला असून तो सरदेसाई गौरव ग्रंथांत प्रसिद्ध झाला

आहे. पण समग्र प्रकरणाचा मूळ फारसीवरून केलेला अनुवाद खाली देण्यात येत आहे. बाजूचे आकडे मूळ ग्रंथाच्या पानाचे आहेत.)

(५८५) ''यापूर्वी लिहिण्यात आले आहे की मिर्जा संगीला शहाजहान या नावाने गादीवर बसविण्यात आले. याचा सूड घेण्याकरिता अहमदशहा अब्दाली हिंदुस्थानात आला. त्याला अडविण्याकरिता गाजिउद्दीनाने जनकोजी शिंद्याची मदत घेतली. जनकोजी हा काही महिन्यापासून नजीबद्दौल्याशी लढण्यात गुंतला होता. अब्दाली सरहिंदपर्यंत येऊन पोहोचला अशी बातली कळली तेव्हा मसलतीने नजीबद्दौल्ल्याबरोबर तह करण्यात आला. मग गाजिउद्दीनाने मराठ्यांची फौज घेऊन अब्दालीचा प्रतिकार करण्याकरिता यमुनेवर तळ दिला. शुजाउद्दौला अयोध्येला परत गेला. नजीबद्दौल्याचे अहमदशहाबरोबर संधान होते. शुजाउद्दौल्याचा नोकर अलीबेगखान याच्याबरोबर तीन हजार स्वार होते. नजीबद्दौलाने आपले सैन्य बरोबर घेतले. तो आणि अलीबेगखान हे आपल्या पथकासहित अहमदशहाला मिळण्यास निघाले. ११७३ हिज्री जमादिलावलच्या नऊ तारखेस ते अहमदशहाला मिळाले. त्यांना नदीचे घाट आणि रस्ते माहीत होते. ते यमुना ओलांडून गेले. गाजिउद्दीनाने शत्रुसैन्याची तयारी आणि लढाई पाहिली. तो दिल्लीस आला आणि त्याने शहराचा बंदोबस्त केला. अहमदशहाचे सैन्य पाठलाग करीत आले. दक्षिण्याची फौज शहर पाठीशी घेऊन उभी होती. एक रात्र आणि एक दिवस त्यांनी तोफाबंदुकांची मारगिरी केली. पण युद्धाचा शेवट संकटपूर्ण झाला. जयाप्पाचा भाऊ आणि जनकोजीचा चुलता दत्ताजी हा युद्धात मारला गेला. जनकोजी जखमी झाला. त्यांच्या सैन्याचे पाय उखडले. त्यांची पळापळ झाली आणि त्यांची सामग्री गारत होऊन अबदालीच्या फौजेच्या हाती सापडली. गाजिउद्दीनाचा सगळा भर मराठ्यांच्या बळावर होता. त्यांची शोचनीय दशा पाहून तो हादरला. दक्षिणी सैन्य रेवाडीच्या बाजूने पळाले. गाजिउद्दीनाने यापूर्वीच भरतपुराकडे आपली मुले माणसे पाठविली होती. आता तोहि सूरजमलच्या आश्रयाला गेला.

दिल्ली शहरात अहमदशहा अब्दालीने बंदोबस्त केला. सारे शहर अफगाण शिपायांच्या तावडीत सापडले. दोन दिवसपर्यंत कत्तल आणि लूटमार ही चालू होती. या धुमाकुळात जे वाचले ते अक्षरश: भरडले गेले. अहमदशहा काही दिवस दिल्लीत राहिला. नंतर त्याने शहर बंदोबस्त आणि लालकिल्ल्याचे रक्षण याकरिता याकूब अलीखान याची नेमणूक केली. हे झाल्यावर त्याने नजीबखानाच्या सल्ल्याने आग्र्याकडे मोर्चा वळविला. तेथील जमीनदारांकडून खंडणी गोळा करणे आणि जाटांचा बीमाड करणे हे त्याचे उद्देश होते.

(५८६) तो जयनगर जवळ पोहोचला. जाटांची ठाणी उठवून लावण्यात आली. मग अब्दाली आणि जाट यांच्यांत खंडणीसंबंधी बोलणी होऊ लागली. या सुमारास मल्हारराव होळकर आपल्या सैन्यासहित त्या भागात पोहोचला. त्याच्यात आणि अब्दालीच्या सैन्यात विशेष अंतर नव्हते. पण जनकोजीच्या दुर्दशेने मराठी फौजेने धास्ती घेतली होती. मल्हाररावने तेथून कूच केले. त्याने दिल्लीपाशी यमुना ओलांडली. नजीबखान हाच अहमदशहाला बोलाविण्यास कारण आहे. म्हणून त्याचा मुलुख उध्वस्त करण्यासाठी त्याने चाल केली. मल्हाररावाने सिकंदरा लुटून फस्त केले. तेथे त्याला विपुल संपत्ती मिळाली. ही बातमी अहमदशहाला कळली. त्याने नजीबखानाचा सल्ला घेतला व रात्रंदिवस दौड करून आणि सत्तर कोस पार करून तो दिल्लीस पोहोचला. तेथून त्याने यमुना ओलांडली. मल्हाररावाबरोबर चकमकी झडल्या. मल्हारराव अब्दालीच्या फौजेसमोर टिकणे शक्य नव्हते. त्याने नजीबखानाच्या मुलुखावर मोहीम काढण्याचा बेत बदलून तडक यमुना ओलांडली. अब्दालीच्या सैन्याने दोन दिवस विश्रांती घेतली. नंतर मराठ्यांचा पाठलाग करावा हा विचार होता तोच यमुनेला पूर आला. नदीपार करणे अब्दालीच्या

फौजेला अशक्य झाले. नावा जमविणे आणि नदीवर पूल टाकणे इत्यादी प्रयत्न करण्यात आले पण त्याचा काही उपयोग झाला नाही. याचवेळी जनकोजी शिंदे, गाजिउद्दीन आणि सूरजमल हे मल्हाररावाला येऊन मिळाले. काही दिवस गाजिउद्दीनाने मल्हारराव होळकराच्या सल्ल्याने आणि सूरजमलच्या संमतीने, स्वत:ची वजीरी, बादशाहीचा बंदोबस्त आणि दक्षिण्याबरोबर तडजोड या विषयासंबंधी नजीबखानाच्या मार्फतीने तहाची बोलणी चालू केली. पण ती यशस्वी झाली नाहीत. मग गाजिउद्दीन भरतपुराला परतला. या सुमारास बाळाजीरावाचा चुलतभाऊ व कुलमुख्त्यार सदाशिव पंडित उर्फ भाऊ हा वरील बातम्या ऐकून युद्धाच्या द्वारे अहमदशहा अब्दालीला मोडून काढण्याच्या उद्देशाने प्रचंड सैन्य घेऊन निघाला. त्याच्याबरोबर जंगी तोफखाना होता.

(५८७) भाऊबरोबर बाळाजीरावाचा मुलगा विश्वासराव, भाऊ, समशेरबहादुर, सरदार दमाजी गायकवाड आणि इतर सरदार होते. सैन्य अगणित होते. तो पुण्याहून हिंदुस्थानाच्या रोखाने निघाला अशी बातमी आली. शुजाउद्दौला अहमदशहाला जाऊन मिळाला. गाजिउद्दीनाने भाऊच्या येण्याचे वर्तमान ऐकले. आपले नशीब आता जोरावर आहे असे समजून तो भाऊला येऊन भेटला. कौल करार झाल्यानंतर त्याने सुरजमलला आणून त्याची व भाऊची गाठ घालून दिली. मग त्या सर्वांची मसलत ठरली की यमुनेचा पूर ओसरत नाही. अहमदशहा काही एकाएकी यमुना पार करू शकत नाही. तर आपण कूच करून दिल्ली हस्तगत करावी; घाट आणि उताराच्या वाटा रोखून धराव्या आणि नावा साऱ्या जप्त करून ठिकठिकाणी मजबूत चौकी पाहारे ठेवावे. शहराचे रक्षण करू शकेल इतके सैन्य दिल्लीचा किल्लेदार याकूब अलीखान याजपाशी नव्हते. म्हणून त्याने किल्ल्याची तेवढी मजबूती करून तो लढविण्यास सुरवात केली. गाजिउद्दीन आणि सूरजमल जाट यांनी मराठ्यांची मदत घेतली. आणि किल्ल्याभोवती जागजागी मोर्चे बांधून किल्ल्यावर गोळ्यांचा वर्षाव केला. याकूब अलीखानाने शक्य तितक्या निर्धाराने किल्ला लढविला. अहमदशहा अब्दाली नदीच्या पलीकडे होता. तो नदीच्या काठावर सैन्य घेऊन आला. नदीला पूर, नावा मराठ्यांच्या ताब्यात, नदीचे उतार त्यांच्या बंदोबस्तात; यामुळे अहमदशहाचा उपाय चालेना. मग त्याने नदीच्या काठावर तोफा आणून मराठ्यांच्यावर गोळे टाकले. याकूब अलीखान निराश झाला. त्याला दारूगोळा आणि इतर युद्ध सामग्री याचा तुटवटा भासू लागला. शेवटी पोक्त विचार करून त्याने गाजिउद्दीन आणि सूरजमल यांच्या द्वारे कौल करार करून घेऊन किल्ला सोडून दिला. किल्ल्यावर सूरजमल्लाचा बंदोबस्त झाला.

सदाशिवराव भाऊला आता गर्व झाला. त्याच्या डोक्यात भलभलते विचार घोळू लागले. त्याने लाल किल्ल्याचे निरीक्षण केले. नंतर त्याने किल्ल्यावरील जाटांचा अंमल काढून टाकला आणि ठिकठिकाणी आपली माणसे नेमली. यानंतर विश्वासराव, दमाजी गायकवाड आणि इतर सरदार यांना घेऊन तो लाल किल्ल्यात आला. त्याच्या विनंतीवरून शहाजहान (दुसरा) बादशहा येऊन सिंहासनावर बसला.

(५८८) भाऊने बादशहाला नजर गुजरानली आणि नंतर त्याचा निरोप घेतला. बादशहा महालात गेला. नंतर भाऊने राजवाडे, बागबगीचे इत्यादी पाहिली. त्याने काही महत्त्वाच्या खोल्या उघडून पहिल्या. एका सोन्याच्या पीठावर धार्मिक महत्त्वाच्या वस्तू ठेविल्या होत्या. ते पीठ भाऊने ताब्यात घेतले. नंतर किल्ल्याच्या बंदोबस्त आपल्या विश्वासू माणसांवर सोपवून तो आपल्या छावणीकडे गेला. गाजिउद्दीन आणि जाट यांनी सांगून पाठविले की आपल्याला फक्त किल्ला पाहावयाचा होता. किल्ल्याचे रक्षण हे माझे काम आहे. तुमची माणसे किल्ल्यातून बाहेर काढा पाहू. पण भाऊला आपल्या सैन्याचा आणि पराक्रमाचा भारी गर्व झाला होता. त्याने ही गोष्ट कबूल केली नाही. मोघम उत्तरे देऊन गोष्ट टाळली. भाऊने दिवाणे खासचे चांदीचे छत काढून टंकसाळ्यात नाणी पाडण्याकरिता

चांदी पाठविली. त्याची किंमत दहा लाख रुपये भरली. मराठ्यांनी अमीर उमरावांची घरे धुवून नेली. पुरलेले खजिने सापडतील या कल्पनेने त्यांनी अनेक घरे खणून काढली. घरातील तुळया आणि लाकडी सामान ही मराठी सैन्याने उपयोगात आणली. गाजिउद्दीन आणि सूरजमल यांच्यापाशी दहा बारा हजार सैन्य होते. ही परिस्थिती पाहून त्या दोघांची तडफड झाली. पण वरील पेक्षा जास्त सैन्य त्यांच्याजवळ नव्हते. त्यांना हाकलून लावावे या उद्देशाने भाऊने पंधरा हजार स्वारांना त्यांच्या गोटाभोवती नेमले. मल्हाररावाला भाऊचा उद्देश कळला. भाऊला मनाई करणे त्याला शक्य नव्हते. त्याने सूरजमल्लाला इशारा दिला. सूरजमल्लाला आपण संकटात सापडलो असे वाटले. त्याने दक्षिण्यांच्या हेतूची खबर शुजाउद्दौल्यास दिली. शुजाउद्दौल्याने युक्ति केली ती ही की आपले सैन्य नदी पार करणार असा पुकारा करून त्याने नदीच्या काठावरून तोफा सोडण्यास सुरवात केली.

(५८९) इकडे मराठ्यांनी प्रतिकार सुरू केला. दोन्ही तीरावरून तोफांची गोळागोळी सुरू झाली. धुराने वातावरण भरून गेले या संधीचा फायदा घेऊन सूरजमल आणि गाजिउद्दीन हे तेथून निघून वल्लभगडला गेले. शुजाउद्दौल्याने त्यांचे समाधान करून त्यांना दिलासा दिला. अहमदशहाकडून खिलतीची वस्त्रे आणि रक्कम त्यांच्याकडे पाठविण्यात आली. गाजिउद्दीन हा आपल्या मुलांमाणसांबरोबर भरतपूर येथे राहिला. सदाशिवराव भाऊने पाहिले की आपली युक्ति फसली. त्याने सूरजमलकडे भेटीदाखल हत्ती, वस्त्रे वगैरे पाठविली आणि त्याला लिहिले की आमच्यापासून वेगळे होणे आणि आपल्या दोघांचा शत्रू जो अहमदशहा त्याला जाऊन मिळणे हे उचित नव्हते. आता निदान तुम्ही वाटा रोखून धरून शत्रूच्या लष्करात रसद पोहोचणार नाही अशी व्यवस्था करावी. सूरजमल काही दिवस वल्लभगडात राहिला. नंतर शुजाउद्दौल्याच्या सूचनेने तो भरतपुराकडे रवाना झाला. त्याने दोन्ही पक्षांना मदत करण्याचे टाळले.

या सुमास बातमी आली की अहमदशहाच्या आज्ञेने गक्कर जमातीचे सहा हजार अफगाण सिरहिंदला आले आहेत. अब्दुस्समदखान हा सिरहिंदचा फौजदार होता. कुतुबखानाकडे कर्नालच्या आसपासचा टापू होता. त्यांनी कोंडा घाटापाशी यमुना ओलांडली आणि ते पानीपतला पोहोचले. भाऊने सखदेव पाटील यास पाच सहा हजार सैन्यानिशी त्या भागाचा बंदोबस्त ठेवण्यात नेमले होते. त्याच्याने शत्रूचा प्रतिकार होईना. त्याने वरील हालचालीची बातमी भाऊला लिहून कळविली.

भाऊने पाहिले की नदीला पूर आहे. शत्रू नदी ओलांडणार नाही याची त्याला खात्री वाटली. त्याने दिल्लीच्या व्यवस्थेसाठी नारोशंकरपाशी तीन चार हजारांचे सैन्य ठेविले. आणि सैन्य तोफखाना वगैरे बरोबर घेऊन त्याने तीन रविलावल रोजी दिल्लीहून कूच केले. शहाआलम बादशहा या वेळी अजीमाबाद पाटण्याकडे होता. त्यांचे आणि गाजिउद्दीनाचे वाकडे होते. आलमगीर (दुसरा) चा अंत झाल्याची त्याला खबर कळली. हे ऐकून त्याने आपण बादशहा झाल्याचे जाहीर केले.

(५९०) त्याचा मुलगा मिर्जा जवान बख्त हा दिल्लीस होता. जीनत महाल, म्हणजे जवानबख्त याची आई, हिने प्रसंग ओळखून आपला कारभारी सैफुद्दीनखान यास सदाशिवराव भाऊकडे पाठविले. त्याच्या विनंतीला यश आले. शहा आलम हा बादशहा म्हणून जाहीर करण्यात आले. त्याचा मुलगा जवान बख्त याला बादशहाचा युवराज नेमण्यात आले. शहाजहान (दुसरा) याला बादशाहीवरून काढण्यात आले. शहा आलमच्या नावाने नाणी पाडण्यात आली आणि खुतबा पढण्यात आला. जवानबख्त हा युवराज म्हणून गादीवर बसला. शुक्रवार, सफर महिन्याच्या सुरवातीला मराठा सैन्याच्याबरोबर जवानबख्त हा मिरवणुकीने जुम्मामशिदीत प्रार्थना पढण्यास गेला.

सदाशिवरावभाऊने कूच करीत असता वाटेतूनच मल्हारराव होळकर आणि जनकोजी शिंदे यांना पुढे रवाना

केले होते. तोफखाना आणि इतर लष्कर घेऊन तो त्यांच्या मागोमाग निघाला. ही बातमी लागताच अब्दुस्समदखान कुंजपुऱ्याकडे वळला. कुंजपुरा हे मजबूत स्थळ होते. ते नजीबखानाचे असून तेथे त्याचा भाऊ नजाबतखान हा फौजबंद होऊन राहात होता. अब्दुस्समदखानाच्या मागोमाग मल्हारराव आणि जनकोजी पोहोचले. नजाबतखान किल्ल्याच्या बाहेर येऊन अब्दुस्समदखानास मिळाला. उभय पक्षात युद्धाची धुमश्चक्री सुरू झाली. मल्हाररावाने याची बातमी सदाशिवराव भाऊस दिली. तो आपल्या तोफखान्यासहित पाठोपाठ जाऊन पोहोचला. आणि त्याने तोफांचा मारा चालू केला. दक्षिण्यांची फौज असंख्य होती. त्या मानाने अब्दुस्समदखानापाशी सैन्य कमी होते. आता लढण्यात काही अर्थ नाही हे पाहून तो कुंजपुऱ्याच्या गढीत आश्रय घेण्याकरिता वळला.

(५९१) गढी लढवावी आणि अहमदशहाच्या कुमकेची वाट पाहावी असे त्याने ठरविले. अब्दुस्समदखानाचे सैन्य डळमळू लागले आहे, असे पाहून त्यांनी निकराचा हल्ला केला. आणि शत्रुसैन्याला किल्ल्याचे दरवाजे बंद करण्याचीही फुरसद दिली नाही. मोठ्या लढाईनंतर अब्दुस्समदखान, कुतुबखान, नजाबतखान आणि त्याची मुले बाळे, आणि सतरा नामांकित सरदार कैद झाले. नजाबतखानाला कैदेत राहणे पटले नाही. त्याने आत्महत्या केली. सदाशिवरावाच्या आज्ञेने अब्दुस्समदखान आणि कुतुबखान यांचा वध करण्यात आला. कुंजपुऱ्यातील शिबंदी गारत करण्यात आली. आणि गाव उध्वस्त करण्यात आले. लुटीमध्ये दक्षिण्यांना वीस हत्ती आणि तीन हजार घोडे मिळाले. याशिवाय लूट मिळाली ती वेगळीच. नजाबतखानाच्या मुलांना आणि इतर माणसांचा छळ करून घरे खणून काढून गुप्त खजिने शोधण्यात आले. असे ऐकण्यात आले की जवळ जवळ एक कोटि रुपयाची संपत्ति, आणि युद्धोपयोगी सामान मराठ्यांच्या हाती सापडले.

नजीबखान हा अहमदशहापाशी बरपतगंज येथे होता. त्याला ही बातमी कळताच त्याने तेथून कूच केले. अहमदशहाही त्याच्या पाठोपाठ निघाला. पहिल्या दिवशी त्याने पंचवीस कोसाची मजल मारली. चवदा तारखेस त्यांना बागपत आणि कंगऱ्याच्या मध्ये नदीला उतार सापडला. तेथेही नदी पार करणे सोपे नव्हते. पण त्यांनी यमुना ओलांडली. नदी पार होत असता अनेक माणसे बुडून मेली. दिल्ली जवळील राजघाटावरच दीडशे माणसांची प्रेते आणि बरीच गुरे ढोरे ही काढण्यात आली. असाच प्रकार इतर घाटावरही घडला.

सारांश यमुना ओलांडल्यावर अहमदशहाने सोनपत पाठीशी घेतले. आणि यमुनेपासून सात कोसावर संभळक्याजवळ त्याने मराठ्यांशी लढण्याच्या उद्देशाने छावणी कायम केली.

(५९२) सदाशिवरावाने वरील बातमी ऐकताच कुंजपुऱ्याहून कूच केले. आणि पानीपत पाठीशी घेऊन अब्दालीच्या समोर सहासात कोसावर त्याने आपली छावणी कायम केली. त्याने एक मोठा आणि रुंद खंदक खणला. आणि ठिकठिकाणी तोफा चढविल्या. त्या सांखळ्यांनी बांधलेल्या होत्या.

रविलावलच्या तेवीस तारखेच चकमक झडली. उभय पक्षांतील काही माणसे मारली गेली आणि काही जखमी झाली. याचा शेवट कसा होईल या कल्पनेने शुजाउद्दौला चिंतित झाला. त्याने तडजोड घडून यावी म्हणून प्रयत्न सुरू केले. यात त्याने मल्हारराव होळकराला मध्यस्थ केले. शुजाउद्दौल्याने पुन्हा पुन्हा प्रयत्न केले. पण सदाशिवरावाला आपल्या सैन्याचा आणि यशाचा गर्व चढला होता. त्याने तडजोडीची बोलणी फेटाळून लाविली. कुंजपुरा घेतल्यामुळे सदाशिवरावाला गर्वाची सपाटून धुंदी चढली होती. तडजोडीची याचना म्हणजे प्रतिपक्षाचे बळ कमी असले पाहिजे असे तो समजला.

भाऊने नदीच्या पलीकडे आपली काही फौज ठेविली. नजीबखानाच्या मुलुखातून अहमदशहाला येणारी

रसद व युद्धोपयोगी सामान मारून काढण्याचे काम या सैन्याला देण्यात आले होते. दिल्लीच्या वाटेवर भाऊने दुसरे सैन्य ठेवून दिले. म्हणजे तिकडून एक कपर्दिकही अहमदशहाला पोहोचू नये अशी योजना होती.

(५९३) अहमदशहाचे सगळे सैन्य नदीपार झाले. नंतर त्याने संभलका हे गाव सोडून कूच केले. आणि यमुनेपासून दोन कोसावर छावणी केली. आणि सैन्याभोवती खंदक खणून तोफा व्यवस्थित चढविल्या.

दक्षिण्यांनी रसदेच्या वाटा बंद केल्या होत्या. त्यामुळे इस्लामच्या लष्करात महर्गता झाली. आट्याचा भाव रुपायाला दीड शेरावर आला. या सुमारास बातमी आली की वंजारी लोकांचा एक तांडा धान्य घेऊन बहादुरगडाकडून येत असून तो मराठ्यांच्या छावणीकडे जात आहे. अहमदशहाने त्याच्यावर हल्ला करण्याची आज्ञा केली. खूप मारामारी झाली. नंतर वीस हजार बैल धान्याने लादलेले अहमदशहाच्या लष्करात आणण्यात आले. नजीबदौल्याच्या मुलानेही सहारणपुरच्या बाजूने बरीच रसद आणली: आता पूर्वीची टंचाई जाऊन त्याच्या जागी आबादानी झाली.

एकोणीस रबिउस्सानी रोजी उभय दळात चांगलीच लढाई झाली. त्यात अहमदशहाच्या दळाचा विजय झाला. पंचवीस तारखेस दक्षिण्यांनी जमावाने हल्ला केला. रात्रीचा एक प्रहर जाईपर्यंत उभय दळे निकराने लढत होती. जखमी लोकांची संख्या सोडून दिली तर मैदानावरून मुसलमान आणि काफर यांची पाच हजार तीनशे चौऱ्याहत्तर प्रेते हलविण्यात आली. एक तंबू नव्हता की जेथे मृताचा शोक आणि जखमी माणसांचे विव्हळणे ऐकू येत नव्हते. (नंतर) काही दिवसापर्यंत दक्षिण्यांना लढण्याची हिंमत राहिली नाही. मराठ्यांच्यापाशी बादशाही तोफखाना होता. याशिवाय कुंजपुरा येथे त्यांना जेजाले, बाण इत्यादी युद्धसामग्री अगणित सापडली होती. त्यांनी आपल्या छावणीचा बंदोबस्त कडेकोट ठेविला होता. छावणीत घुसण्याची इस्लामच्या लष्कराला हिंमत झाली नाही. तिकडे मराठ्यांना इस्लाम धर्मीयांचा धाक बसला होता. ('मराठ्यांच्यापाशी' पासूनची वरील वाक्ये मूळ फारसीत आहेत. आपल्या इंग्रजी अनुवादात जदुनाथांनी ती गाळली आहेत) यामुळे तोफांची गोळा गोळी होई. आणि मधून मधून करावली (अघाडी) च्या चकमकी होत. त्यात ज्यांचे मरण ओढवलेले असे ते मृत्युमुखी पडत.

या सुमारास अहमदशहाला बातमी कळली की भाऊच्या आज्ञेने नारोशंकराने दोन हजार मराठ्यांची फौज चिमणाजी पंडित याच्या नेतृत्वाखाली पाठविली आहे. या सैन्याने दुआबांतील रसद बंद करण्याचे काम पत्करले होते. गाजिउद्दीननगर पासून दोन कोसावर सराई लालखान येथे या सैन्याचा तळ होता. गोविंद पंडित हा इटावा आणि आसपासच्या मोकासदार होता. तो दहा हजार सैन्य घेऊन मीरठ प्रांतांत आला. तो भाग नजीबखानाचा होता. तिकडून रसदेचा पुरवठा होत होता. तो बंद करावा असा गोविंदपंताचा उद्देश होता. त्याप्रमाणे त्याने हालचाल केली.

(५९४) अहमदशहाने जहानखानाला पाच हजार अशा तडफदार सैन्यासहित गोविंदपंताचा बीमोड करण्याकरिता रवाना केले. जहानखान हा तडक चिमणाजीवर घसरला. चिमणाजीचे सैन्य गारत झाले. चिमणाजी हजार संकटांतून निसटून मोठ्या कष्टाने दिल्लीस पोहोचला. त्यानंतर जहानखानाने तितक्याच तडफेने गोविंदपंतावर चाल करून त्याला त्याच्या सैन्यासहित पूर्णपणे गारत केले. गोविंदपंताचे शिर कापून घेण्यात आले. नंतर जहानखानाचे सैन्य परत अहमदशहास येऊन मिळाले. कुंजपुऱ्याला मराठ्यांनी कत्तल केली होती. त्याचा सूड म्हणून नजीबखानाने गोविंदपंताचे शिर जरीच्या वस्त्रात लपेटून मल्हारराव होळकराकडे पाठविले.

अब्दाली आणि मराठे यांच्या संघर्षाची बातमी बाळाजीराव पेशव्याला लागली. तो यापूर्वी सावधगिरीकरता म्हणून पुण्याहून बुऱ्हाणपुरास येऊन राहिला होता. मराठ्यांच्या सैन्यास पाठिंबा देण्यास म्हणून तो दहाबारा हजार

सैन्यासहित हंडियापाशी नर्मदा पार झाला. तेथून तो उज्जैन येथे येऊन बसला. मराठ्यांच्या बातमीकडे त्याचे सारखे कान लागले होते. यमुनेच्या पलीकडून अहमदशहाला येणारी रसद अडविणे दक्षिण्यांना शक्य होईना. त्या प्रयत्नात त्यांचे काही सरदार मारले गेले. इस्लामियांच्या समशेररूपी विजेने त्यांचे डोळे दिपून गेले. मैदानात उभे राहून लढणे त्यांना शक्य झाले नाही. पण त्यांनी खंदक खणून आग ओकणाऱ्या तोफा डागल्या होता त्यामुळे प्रतिपक्षाला त्यांच्या छावणीवर हल्ला करणेही शक्य होईना. (या परिच्छेदांतील वरील सर्व वाक्ये जदुनाथांनी गाळली आहेत) म्हणून अहमदशहाने सैन्याला दिल्लीच्या वाटेवर ठेवले. तिकडून मराठ्यांना रसद आणि खजिना येत असे. ते एकदम बंद झाले. त्यामुळे शत्रूंच्या सैन्यात ताबडतोब दुष्काळ पडला. शिवाय, हिवाळ्यात त्या प्रदेशात पाऊस पडतो तसा पाऊस पडला. चारा आणि दाणा यावाचून असंख्य गुरे ढोरे हैराण झाली होती. त्यांच्यात अगदी त्राण न राहिल्यामुळे ती यमलोकात चरण्यास गेली. काही माणसांची जीवननौका त्या भयंकर रक्तसमुद्रातून सुरक्षित किनाऱ्याला लागली होती. त्यांच्या सांगण्यावरून समजले की साठ हजार घोडी मरण पावली. याशिवाय असंख्य जनावरे आणि माणसे मेली. अहमदशहाच्या सैन्याची पथके दिल्लीपासून बारा कोसावर नरेला येथे आली. नारोशंकराने शहराचे दरवाजे बंद केले. आणि पाच हजार स्वार व दहा हजार पायदळ शहराच्या तटबंदी भोवती उभे केले.

(५९५) चार महिनेपर्यंत उभय सैन्ये एकमेकाच्या समोर ठाण मांडून मारामारी करीत होती. शत्रू काही आता हा लढा शेवटास नेणार नाही असे अहमदशहास वाटले. त्याने आपले सैन्य दिल्लीच्या दिशेने हलविण्यास सुरवात केली कदाचित यामुळे शत्रू खंदकाबाहेर येऊन लढाई देईल असे त्याला वाटले. म्हणजे जे काय घडायचे ते घडेल. मराठ्यांच्या सैन्यात रसदेचा इतका तुटवडा पडला की रुपायाला एक शेराचे धान्य कष्टाने मिळे. (येथपर्यंतची वरची सगळी वाक्ये जदुनाथांनी गाळली आहेत). लहान थोरांची स्थिती अगदी हलाकीची झाली. जमादिउस्सानी महिन्याच्या सहा तारखेस बुधवारच्या आदल्या रात्री मराठे सरदार सदाशिवराव भाऊकडे गेले. त्यांनी सांगितले की दाण्यापाण्या वाचून जनावरात चालण्याफिरण्याची शक्ति राहिली नाही. आणि तीच स्थिति माणसांची झाली आहे. यापेक्षा लढून मरणे बरे. सारी रात्र मसलत चालली होती. शेवटी असे ठरले की तेथून कूच करून दिल्ली गाठावी. तेथे रसद आणि खजिना याची सोय होईल. मग शहर पाठीशीं घेऊन शत्रूशी युद्ध करावे. रात्रीच्या शेवटच्या प्रहरी सैन्याची तयारी करण्यात आली. तोफा ओढणारे बैल बरेच निकामी झाले होते. छावणीतील बाजारातून जे दुकानदारांचे बैल जेथे जेथे सापडले तेथून आणून शक्य तितक्या तोफा बरोबर घेण्यात आल्या. अघाडी, पिछाडी, उजवी फळी आणि डावी फळी अशा प्रकारे सैन्याची रचना करण्यात आली. आणि खंजीरधारी तुर्काने (सूर्याने), हिंदूचा (कृष्ण वर्णीय, म्हणजे तिमिर) नाश करण्याकरिता सोनेरी टोप चढवून पदार्पण केले, म्हणजे पहाट झाली. त्यावेली मराठ्यांच्या सैन्याने कूच केले. अहमदशहाला ही बातमी लागताच युद्धासाठी तो स्वार झाला. दक्षिण्यांनी बाजार बुणगे लवाजमा यांच्या सुरक्षित रवानगीसाठी तोफखाना समोर ठेविला. आणि तोफा, बाण, बंदुकी इत्यादींची सरबत्ती करीत त्यांची अघाडीचे पथके लढू लागली. इस्लामच्या वीरांनी काफरांचा डाव ओळखला. एका तर्फेने शुजाउद्दौला व नजीबुद्दौला हे आपल्या सैन्यासहित आणि दुसऱ्या तर्फेने अहमदशहा आणि तैमूरशहा हे आपल्या किजलबाश आणि अफगाण सैन्यासहित निकराने तुटून पडले.

(५९६) इस्लामच्या अनुयायांनी जिहादचा पण केला होता. यात हत झालो तर आपण शहीद या पदवीस पात्र होऊ या निर्धाराने अल्लाचे नाव घेणारे निकराने तुटून पडले. त्यामुळे पृथ्वी हादरून गेली. मराठ्यांचे सैन्य इस्लामियांच्या तिप्पट होते. पण विजय म्हणजे परमेश्वराची देणगी होय. तेच यावेळी प्रत्ययास आले. मराठ्यांनी

पण शौर्याची शर्थ केली. आणि भारी पराक्रम गाजविला. अहमदशहाचा पराजय होण्याची वेळ आली होती. पण शुजाउद्दौला व नजीबुद्दौला हे मारामारी करीत सैन्याच्या मध्यात पोहोचले आणि अनेक सरदार शिपायांना त्यांनी मारून काढले. या हाणामारीत बाळाजीरावाचा मुलगा विश्वासराव हा हत्तीवर स्वार होता. तो बंदुकीची गोळी लागून मरण पावला. भाऊला ही बातमी कळताच व्यथित होऊन तो हत्तीवरून खाली उतरला आणि घोड्यावर स्वार झाला. तो आणि जनकोजी हे खरी स्थिति काय आहे ते पाहाण्याकरिता त्या ठिकाणी आले. हे पाहून मराठ्यांच्या सैन्यत गोंधळ निर्माण झाला. आणि त्याची शिस्त मोडली. प्रतिपक्षी त्यांच्यावर वाघासारखे तुटून पडले. मराठ्यांचे उरलेले सैन्य पळू लागले. हजारोंचे रक्त जमिनीवर सांडले.

(५९७) जिकडे तिकडे प्रेताच्या राशी दिसू लागल्या. बाजार बुणग्याचे लोक प्राण वाचवून खंदकांत आश्रयाला आले. शिपायांनी वाट फुटेल तिकडे रस्ता धरला. आणि सर्वांच्या प्रत्ययास आले की -

कविता - युद्धात जय नशिबाने मिळत असतो, असंख्य सैन्य अगर खजिना याने नव्हे. इस्लामचे गाजी हे पाठलाग करू लागले. दक्षिण्यांनी अंगावरची वस्त्रे आणि अलंकार ही टाकून दिली आणि सैरावैरा पळण्यास सुरवात केली. विश्वासू माणसांच्या सांगण्यावरून कळले की युद्धभूमीपासून बारा कोसापर्यंत चहूकडे प्रेतेच प्रेते दिसत होती.

(५९८) सुभानल्ला. मराठ्यांची संख्या, त्यांचा पराक्रम आणि त्यांच्या नशिबाची चढती कमान पाहता कुणाला कल्पनाही असणे अशक्यच होते की दैवाच्या एका आघाताने त्यांचा नाश घडून येईल. चढ आहे तेथे पड आहेच. सारांश शूर गाजींनी कत्तली केल्यानंतर संपत्तीची लूट केली. घोडे आणि उंट यांवर संपत्ती लादलेली अशा रांगाच्या रांगा त्यांनी धरल्या. समशेरी, बंदुकी, तर त्यांनी अपार अशा मिळविल्या. सोने, मोती, दागदागिने, ही अगणित त्यांच्या हाती आली. सातशे हत्ती, पंचवीस हजार घोडे, तितकेच बैल आणि उंट तेही संपत्तीने लादलेले अहमदशहा, शुजाउद्दौला आणि नजीबुद्दौला यांच्यापाशी दाखल करण्यात आले. इतरांनी लुटून नेलेली संपत्ती वेगळीच. एकंदरीत संपत्ती काही कोटीची भरेल. जवळ जवळ वीस हजार माणसे लहान थोर अशी कैद झाली. दक्षिणी लोकांची पद्धत म्हणजे घरी आणि प्रवासात ते बायका पोरांना बरोबर बाळगतात. त्यांच्या बायकांना घोड्यावर स्वारी करण्याचा अभ्यास असतो. सुमारे बारा हजार स्त्रिया, हलक्या आणि चांगल्या कुळाच्या (येथे जदुनाथांनी हलक्या हा शब्द अनुवादांत दिलेला नाही.) अशा शत्रूच्या ताब्यात आल्या. असे म्हणतात की (हे शब्द जदुनाथांनी गाळले आहेत.) सातशे बायका पालखीतून फिरणाऱ्या होत्या.

सारांश अहमदशहाने परमेश्वराचे आभार मानले. शुजाउद्दौल्याने उत्कृष्ट कामगिरी बजावली होती. अहमदशहाने त्यांची प्रशंसा केली. नंतर तो आपल्या छावणीकडे परतला. विश्वासरावांचे प्रेत हत्तीवर होते. ते हाती लागले. अहमदशहाच्या परवानगीने सुजाउद्दौल्याने त्याचे दहन करविले. समशेर बहादुर जखमी होऊन मोठ्या कष्टाने भरतगडला पोहोचला आणि तेथे मरण पावला.

(५९९) या लढाईला आतापर्यंत आठ महिने झाले आहेत. अद्यापपर्यंत सदाशिवराव भाऊ आणि जनकोजी शिंदे हे जिवंत आहेत का मेले आहेत याचा छडा लागला नाही. दर काही दिवसांनी खबर उडे की ते जोग्याच्या वेषात आमक्या तमक्या ठिकाणी आहेत. आणि ही बातमी ऐकून लोक खुश होत. युद्धातून सुमारे तीन हजार माणसे पळून रातोरात प्रवास करीत दुसऱ्या दिवशी दिल्लीस पोहोचली. लोकांनी त्यांना नागाविले. नारोशंकर दिल्लीत होता. त्याने सगळी हकीकत ऐकून दिल्लीतून आपल्या सहकाऱ्यासहित पळ काढला. आणि आग्रा गाठले. वाटेत त्याला दमाजी गायकवाड आणि मल्हारराव होळकर भेटले. आग्र्यास आपला पाठलाग होईल या भीतीने त्यांनी चंबळा पार

केली. आणि ग्वाल्हेर येथे पळातील लोकांची व्यवस्था लावण्याकरिता वाट पाहात राहिले. अनेक लोक रस्ते भटकून खेड्यापाड्यातून शिरले. त्यांना खेडुतांनी नागविले. दागदागिन्याच्या लोभाने त्यांनी अनेकांना मारले. अनेक जण झाडाचा पाला अगर जंगली फळे खाऊन पोटाची भूक शमवीत. त्यापैकी काही ग्वाल्हेरीस पोहोचले व काही वाट फुटेल त्या मार्गाने दक्षिणेस रवाना झाले. युद्धात त्यांना पीडा झाली नाही ती या आसपासच्या भटकण्यात त्यांच्या वाट्याला आली. घोड्यासहित क्वचितच कोण निसटला असेल. अफगणांच्या हाती जे कैद झाले त्यापैकी बहुसंख्य मारले गेले.

(६००) अनेकांना गुलाम करण्यात आले. आता आपण बाटलो, या समजुतीने त्या गुलामांनी आपल्या शेंड्या उपटून टाकल्या. शेवटी शुजाउद्दौल्याच्या शिफारसीने बायकांना ठेवून घेण्यात आले आणि माणसांची कत्तल थांबवून त्यांना वाटखर्चाकरिता प्रत्येकी एक रुपया देऊन घालवून देण्यात आले. मराठे अस्तित्वात आल्यापासून आजपर्यंत त्यांची इतकी दुर्दशा कधीच झाली नव्हती ही वस्तुस्थिती होय. अतिशयोक्ती नव्हे. त्यांची गनिमी काव्याने लढण्याची पद्धत असे. शिस्तीने आणि तोफखाना घेऊन ते लढत नसत - त्यांनी आपली पद्धत सोडून दिली म्हणून त्यांची जी दुर्दशा झाली, ती कोणी अद्यापर्यंत पाहिली नसेल.

(६०१) वरील बातमी दक्षिणेत पसरली. शोक नाही, असे एक घर राहिले नाही. प्रत्येक जण शोकाने होरपळून गेला. सारे जग म्हणजे शोकागार बनले.

**गम् सोख्त दरून यगान यगान रा**
**मातम कदा शुद जहान जहान रा**

## खजानाये आमिरा

(गुलाम अली आजाद बिलग्रामी याचा जन्म उत्तर प्रदेशात बिलग्राम येथे इ. स. १७०४ मध्ये झाला. इ. स. १७४० मधे तो औरंगाबाद येथे स्थायिक झाला. तेथेच इ. स. १७८६ त त्याचा मृत्यु झाला. आपल्या खजानाये आमिरा या ग्रंथांत त्याने अहमदशहा अबदालीची हकीकत (पान ९७ ते १०९) दिली आहे. ग्रंथाचा लेखनकाल इ. स. १७६३ असल्यामुळे पानीपतच्या युद्धानंतर एकदोन वर्षांत लिहिलेली हकीकत म्हणून या ग्रंथाचे महत्त्व आहे. प्रत्यक्ष युद्धाचे वर्णन थोडे आहे. सदाशिवराव भाऊने शुजाउद्दौल्याकडे आपला वकील भवानीशंकर पाठविला होता. तो बिलग्रामीचा शिष्य होय. त्याचा आणि बिलग्रामीचा पत्रव्यवहार होता असे ग्रंथावरून वाटते. युद्धाची हकीकत भवानीशंकरकडून बिलग्रामीला मिळाली असण्याचा संभव आहे.

या नंतरच्या काळात जे फारसी ग्रंथ लिहिले गेले त्यातून बिलग्रामीच्या या वरील ग्रंथाचा उपयोग करून घेण्यात आला आहे असे दिसते. उदाहरणार्थ अली इब्राहीमचा तारीखे इब्राहीम अलीखान हा ग्रंथ इ. स. १७७६ मधे लिहिला गेला. त्याच्या काही भागाचा अनुवाद इलियट आणि दौसनच्या ग्रंथाच्या आठव्या भागात देण्यात आला आहे. त्यातील बराचसा मजकूर बिलग्रामीच्या ग्रंथातून जशाचा तसा उतरून घेण्यात आलेला दिसतो.

बिलग्रामीचा हा ग्रंथ फारसीतून असून तो प्रकाशित झाला आहे. त्यातील आवश्यक भागाचा अनुवाद खाली दिला आहे.)

अहमदशहा अब्दालीने सहाव्या खेपेस हिंदुस्थानवर स्वारी केली. त्याची दोन कारणे होती. मराठ्यांनी अफगाणांना पंजाबातून हाकलून लाविले हे एक. दुसरे कारण म्हणजे हिंदुस्थानातील (उत्तर भारत) राजेरजवाडे

मराठ्यांच्या आक्रमणामुळे जेरीस आले होते. दत्ताजी शिंद्याने नजीबखानाला मेटाकुटीस आणिले होते. नजीबखान आणि इतर रोहिल्यांनी सर्वसाधारणपणे इस्लामकरिता आणि प्रामुख्याने स्वत:च्या रक्षणाकरिता, आणि राजेरजवाड्यांनी स्वत:च्या राज्याचे रक्षण करण्याकरिता अहमदशहा अबदालीला हिंदुस्थानात येण्याचे आमंत्रण दिले. वरील कारणावरून अब्दाली पंजाबात उतरला. मराठ्यांनी पंजाबांतून माघार घेतली. त्यावेळी दत्ताजी आणि शुजाउद्दौल्यांत तहाची बोलणी चालली होती. अजून तह पक्का झाला नव्हता. तोच दुराणीच्या येण्याची बातमी पसरली. अहमदशहा सिरहिंदपर्यंत पोहोचला तो सादुल्लाखान रोहिला, नजीबखान, अहमदखान बंगश, हाफिज रहमतखान, व दूंदेखान हे सरदार अहमदशहाला जाऊन मिळाले. यानंतरच्या लढाईत दत्ताजी मारला गेला. अब्दालीने पावसाळा आलेला पाहून सिकंद्रा येथे छावणी केली.

दत्ताच्या वधाची बातमी दक्षिणेत पोहोचल्यावर सदाशिवराव भाऊ जंगी फौज आणि तोफखाना घेऊन निघाला. आग्र्याजवळ मल्हारराव होळकराच्या मार्फतीने सूरजमल जाट भाऊसाहेबांना येऊन भेटला. भाऊ सूरजमलला एक कोस सामोरा गेला. इमादुल्मुल्क हा पण सूरजमलच्या मार्फतीने भाऊला येऊन मिळाला. तेथे असे ठरले की यमुनेला पूर आल्यामुळे नदी ओलांडून अब्दालीची गाठ घेणे अशक्य आहे. सबब दिल्ली हस्तगत केल्यास बरे. असे ठरवून सर्वांनी दिल्लीकडे कूच केले. मराठ्यांच्या तोफांच्या माऱ्याने लालकिल्ल्यातील इमारतींची नासधूस झाली. दिल्लीचा अफगाण सुभेदार याकूब अलीखान हा अब्दालीचा वजीर शहावलीखान याचा भाऊ होता. त्याने मराठ्यांबरोबर तहाची बोलणी लाविली आणि किल्ला मराठ्यांच्या हाती देऊन तो अब्दालीकडे निघून गेला. भाऊने नारोशंकराला किल्लेदारी दिली.

भाऊचा एक ब्राह्मण मुत्सद्दी माझा (ग्रंथकर्त्याचा) शिष्य होता. तो मला उत्तर हिंदुस्थानच्या हकीकती सतत लिहून पाठवीत असे. त्याने मला लिहिले की ''मी भाऊंच्या आज्ञेवरून शिष्टाईनिमित्त शुजाउद्दौल्याकडे गेलो. शुजाउद्दौलाने सांगितले की बऱ्याच काळापासून दक्षिणचे ब्राह्मण आणि मराठे यांनी उत्तर भारतात आपला अंमल प्रस्थापित केला आहे. सध्या जी गडबड आहे ती केवळ त्यांच्या विश्वासघातकी वर्तनातून उद्भवली आहे. रघुनाथराव, दत्ताजी, होळकर, अंताजी वगैरेंच्या वर्तनाने इकडील लोक जिकिरीला येऊन त्यांनी अहमदशहा अबदालीला बोलाविले आहे. मला पत्र लिहिणारा ब्राह्मण शुजाउद्दौल्याच्या मार्फतीने अहमदशहाच्या छावणीत अनेक वेळा गेला. तहाची बोलणी चालू होती पण ती तडीस गेली नाहीत. ती यशस्वी न होण्याची करणे त्याने आपल्या पत्रात दिली ती म्हणजे मराठे सरदारांचा मूर्खपणा (कजफहम) निर्धाराचा अभाव (दून हिंमत), संयमाचा अभाव (जूद रंज)ही होत. त्यांची वागणूक पाहून सूरजमल जाट याला कळून आले की या जमातीचें नशीब धड नाही. त्याने दिल्ली सोडून वल्लभगडाची वाट धरली. भाऊच्या हातात दक्षिण आणि उत्तर भारत होते. पण त्याचा मनाचा कोतेपणा असा की त्याने दीवानेखासचे चांदीचे छत काढले आणि ते गाळून त्याची नाणी पाडली. निजामुद्दीनच्या दर्ग्यातील, आणि महंमदशहा बादशहाच्या समाधीवरील सोन्याचांदीची उपकरणी, समया, इत्यादी काढून घेऊन वापरात आणिली. सारांश भाऊने पाहिले की दिल्लीत रसदेची टंचाई होत आहे. तेव्हा पावसाळ्याच्या शेवटी दिल्लीच्या बाहेर पडून आसपासचा प्रदेश उध्वस्त करण्याचे ठरविले. दिल्ली सोडण्याच्या पूर्वी त्याने मुहीयुसुन्नतला तक्तावरून काढून शहाआलमचा मुलगा जवानबख्त याला गादीवर बसविले आणि शुजाउद्दौल्याला त्याच्या गैरहजेरीत वजीर बनविले. हेतु हा की या कारणाने शुजाउद्दौला आणि अहमदशहात वैमनस्य निर्माण व्हावे. नंतर तो फौज घेऊन शेखूपुऱ्याकडे रवाना झाला. तेथे अब्दुस्समदखान अबदाली, कुतुबखान रोहिला आणि नजाबतखान राहात

होते. ते अहमदशहाला रसद पाठवीत. अब्दुस्समद हा सिरहिंदला फौजदार असता मराठ्यांच्या हाती सापडला होता. तेथून सुटून तो शेखूपुरा (कुंजपुरा) येथे येऊन राहिला होता. भाऊने कुंजपुऱ्याला वेढा घातला. तोफांच्या द्वारे किल्ला सर करणे अवघड नसल्यामुळे अल्पावधीत कुंजपुरा मराठ्यांच्या हाती आला. भाऊने अब्दुस्समदखान आणि कुतुबखान यास परलोकी पाठविले आणि कुंजपुरा लुटून अक्षरश: धुवून काढला.

अहमदशहाला ही बातमी समजताच त्याचा क्रोधाने भडका उडाला. यमुनेचे पाणी अद्याप ओसरले नव्हते तरी त्याने सैन्याला नदीपार होण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे सैन्य नदीपार झाले. काही लोक वाहून गेले. भाऊ कुंजपुऱ्याहून निघून सिरहिंद लुटण्याकरिता निघाला होता. अहमदशहाचे सैन्य निर्भयपणे यमुना उतरलेले पाहून भाऊचे धैर्य खचले. सिरहिंद लुटण्याचा विचार त्याने सोडून दिला आणि मागे वळून दोन टप्प्यात त्याने पानीपत गाठले आणि तेथे छावणी केली. या वेळी भाऊपाशी चाळीस हजार अनुभवी आणि कडवे स्वार होते. याशिवाय युरोपियन पद्धतीने तयार केलेला तोफखाना होता. इतके असूनहि भाऊने पाहिले की खुल्या मैदानात दुराणीबरोबर युद्ध केले तर जय मिळणे अशक्य आहे. आणि तेथे सैन्याभोवती तोफा चढवून युद्धाच्या तयारीत राहिला. छावणी भोवती तोफा काय, त्याने जणू अग्नीची भिंत उभी केली. नंतर उभय पक्षाच्या रोज चकमकी होऊ लागल्या. तोफ, रहकला, बाण, बंदूक, आणि समशेर या शस्त्रांच्या माराने उभय पक्षातील अनेक लोक मृत्युमुखी पडू लागले. दुराणींचा सर्वत्र जय होत होता. त्यांनी मराठ्यांची रसद चहूंकडून बंद केली. फक्त लाहोरच्या दिशेकडून आलासिंग (पटियाला) हा रसद पुरवीत असे. संधी साधून दुराणींनी तो मार्ग पण बंद केला.

अहमदशहाने पाहिले की अडचणीत असूनही मराठ्यांची फौज छावणीच्या बाहेर पडत नाही. निरुपाय होऊन त्याने अठावीस रबिलाखर रोजी यांच्यावर हल्ला केला. जहानखान, शहापसंदखान आणि नजीबखान हे अघाडीला होते. त्यांच्या मागे शुजाउद्दौल्ला, अहमदशहा आणि शहावलीखान हे होते. मराठ्यांची फौज छावणीच्या बाहेर एका बाणाच्या टप्प्यावर येऊन उभी राहिली. सकाळपासून सूर्यास्ताला दोन घटिका राहीपर्यंत लढाई झाली. नजीबखानाचे दहा हजार रोहिले हे मराठ्यांवर गोळीबार करून त्यांच्या छावणीत घुसले. सदाशिवरावभाऊचा मेहुणा बळवंतराव हा गोळी घागून घोड्याखाली आला आणि गतप्राण झाला. रोहिल्यांनी शत्रूचा निकाल त्याच दिवशी केला असता पण दिवस मावळून अंधार पडला. शत्रू आणि मित्र ओळखू येईना. नाइलाज होऊन रोहिले मराठ्यांच्या छावणीतून कापाकापी करीत बाहेर पडले.

इटाव्याचा मोकासदार गोविंद पंडित हा दहा हजार स्वार, मुबलक खजिना आणि रसद घेऊन शहादऱ्यापाशी आला. अंतर्वेदीतील नजीबखानाचा मुलुख उध्वस्त करून कुंजपुऱ्यापाशी यमुना ओलांडून मराठ्यांना जाऊन मिळावे अशा उद्देशाने ता जलालाबादेपर्यंत पोहोचला. जलालबाद हे दिल्लीहून बारा कोसावर आहे. अहमदशहाला ही बातमी कळताच त्याने अताईखान दुराणी आणि अब्दुलस्समदखानाचा मुलगा यांस पाच हजार स्वार देऊन गोविंद पंडितावर पाठविले. अताईखान हा बागपतापाशी यमुना पार झाला आणि लांब लांब मजला मारीत तो शाहदऱ्यापाशी पोहोचला. नारोशंकराचा सरदार तेथे होता तो मारला गेला. तेथून निघून ते गाजीउद्दीन नगराला पोहोचले. तेथील मराठ्यांना त्यांनी मारले. आणि त्याच दिवशी म्हणजे शवाल महिन्याच्या नऊ तारखेस ते जलालाबाद येथे पोहोचले. तेथे त्यांनी गोविंद पंडित आणि त्याचे सहकारी यांना ठार मारले. आणि गोविंद पंडिताचे शीर कापून ते अहमदशहाकडे आणले. मराठ्यांची बरीच संपत्ती त्यांच्या हाती लागली.

मराठ्यांच्या छावणीत रसदेची टंचाई झाली. उपासामुळे लोक रोज मरू लागले. शेवटी मराठ्यांनी ठरविले

की छावणीत कुजून आणि उपासमारीने मरण्यापेक्षा बाहेर पडून लढाई द्यावी. आमच्या नशिबात मग तक्त असो किंवा तख्ता (फाशीची फळी). सहा जमादिलाखर बुधवारी त्यांनी सैन्य तयार केले. तोफखाना समोर ठेवून ते छावणीच्या बाहेर पडले. सावज आपल्या हल्ल्यात येईपर्यंत शिकारी थांबतो त्याप्रमाणे इस्लामचे वीर मराठे छावणीतून एक दोन टप्पे पुढे येईपर्यंत थांबले आणि मग त्यांनी मराठ्यांच्या सैन्यावर भयंकर हल्ला केला. त्यांनी शत्रूच्या रांगा उध्वस्त करून टाकल्या आणि असंख्य लोकांना ठार मारले. विश्वासराव ऐन तारुण्याच्या भरात होता तो गोळी लागून ठार झाला. मग भाऊ आणि नंतर जनकोजी आण इतर सरदार मारले गेले. नंतर इब्राहीमखान हा निमरोळ (याने आपण परमेश्वर असल्याचा दावा मांडला होता) पेक्षाही दुष्ट होता. तो पाडाव झाला. त्याला काही दिवस कैदेत ठेवून ठार मारण्यात आले. अल्लाहो अकबर, रणक्षेत्र म्हणजे मृतांच्या रक्ताने लालफुलांच्या उपवनासारखे दिसू लागले. बावीस हजार दक्षिणी माणसे इस्लामच्या मर्दामध्ये वाटली गेली. मराठ्यांची अलोट संपत्ती गाजीच्या हाती लागली. त्यात पन्नास हजार घोडे, दोन लाख बैल, काही हजार उंट आणि पाचशे हत्ती होते.

रणांतून जे पळाले त्यंना आसपासच्या खेड्यापाड्यातील लोकांनी सर्वस्वी नागविले आणि कित्येकांना ठार मारले. शमशेर बहादुर हा वाटेतच जखमी विकल होऊन मरण पावला. शत्रूतील उत्तम सरदारांपैकी दोघे तिघे सोडून कोणी वाचले नाही. निसटलेल्यांपैकी मल्हारराव होळकर होता. अत्यंत कष्टाने तो माळव्याला परतला आणि तेथून पुण्यास आला. या प्रचंड पराभवाने धक्का बसून बाळाजी युध्दानंतर पाच महिने तेरा दिवसांनी मरण पावला.

(गुलाम अली आजाद बिलग्रामीचा हा ग्रंथ इ. स. १७६३ मध्ये म्हणजे युद्धानंतर दोनच वर्षांनी लिहिला गेला आणि शुजाउद्दौल्याबरोबर बोलणी करणारा मराठ्यांचा वकील भवानीशंकर याचा ग्रंथकर्त्याशी त्याच काळात सतत पत्रव्यवहार चालू होता हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे.)

## नजीबखानाच्या चरित्रातील 'पानीपत'

(नजीबखानाचे चरित्र लिहिणारा सय्यद नूरुद्दीन हसन हा दिल्लीचा वजीर गाजीउद्दीन इमादुल्मुल्क याच्या पदरी होता. कामाच्या निमित्ताने त्याचा नजीबखानाशी अनेकदा संबंध आला. जाट, इमादुल्मुल्क आणि मल्हारराव होळकर यांनी दिल्लीला वेढा घालून नजीबखानाशी झगडा केला त्यावेळी नजीबखानाशी तहाची बोलणी करण्याकरिता नूरुद्दीन हा इमादुल्मुल्क तर्फे नजीबखानाकडे गेला होता. (१७६४). पुढे हाच नूरुद्दीन पुण्याचा इंग्रज रेसिडेंट म्यालेट याचा मुन्शी म्हणून काम करीत होता.

नुरुद्दीनने नजीबखानाचे चरित्र इ. स. १७७१ मधे म्हणजे नजीबखानाच्या मृत्यूनंतर अवघ्या एकाच वर्षाने लिहिले. नजीबखानाशी त्याचा निकटचा संबंध आला असल्यामुळे या चरित्राला विशेष महत्त्व आले आहे. चरित्राचा इंग्रजी अनुवाद सर जदुनाथ सरकार यांनी केला असून त्यातील पानीपत संबंधीचा मजकूर खाली दिला आहे.)

पावसाळा संपला तो मराठ्यांच्या कुचेच्या बातम्या जोरात पसरू लागल्या. नजीबखानाने शुजाउद्दौल्याला लखनौहून बोलावून घेतले आणि त्याची आणि अहमदशहाची गाठ घालून दिली. सदाशिवराव भाऊंच्या नेतृत्वाखाली मराठ्यांची फौज मथुरेला आल्यावर सूरजमल जाट आणि वजीर इमादुल्मुल्क हे भरतपुराहून येऊन भाऊस भेटले. अहमदशहा तर्फे त्याच्या वजीराचा भाऊ याकूत अलीखान हा दिल्लीला किल्लेदार होता. त्याच्याबरोबर तीनशे शिपाई, तोफखान्याचा अधिकारी आणि जरबवाशी आणि तीनशे हिंदुस्थानी पायदळ होते. भाऊने मथुरेहून मल्हारराव होळकर, जनकोजी, बळवंतराव, इमादुल्मुल्क आणि सूरजमल जाट यांना दिल्लीकडे पाठविले. त्यांनी येऊन दिल्लीच्या

किल्ल्याला वेढा घातला. त्या आधी त्यांनी शहर ताब्यात घेतले.

तीन दिवसांनी म्हणजे ११७३ हिज्रीच्या जिल्हज महिन्याच्या अकरा तारखेस भाऊ दिल्लीस येऊन पोहोचला (२४ जुलै १७६०) किल्ला घेण्यात दिरंगाई केल्याबद्दल त्याने सरदारांची कानउघाडणी केली. तेरा दिवसांनी त्याने तडजोडीने किल्ला आपल्या ताब्यात घेतला. किल्ल्यातील दीवाणेखासचे चांदीचे छत काढून त्याने त्याची चौदा लाखांची नाणी पाडली. तेथे दिल्लीत तो कांही दिवस थांबला. अहमदशहानेहि कोइल (अलीगड) हून कूच केले आणि दिल्लीहून दोन कोसावर यमुनेच्या पलीकडे शहादरा येथे त्याने मुक्काम केला. दिल्ली मराठ्यांच्या ताब्यात, याचा त्याला मनस्वी खेद झाला. दोन कोसावरून हे सर्व तो पाहात होता, पण यमुनेला बेफाम पूर आल्यामुळे त्याला नदी ओलांडता येईना. भाऊने शहराभोवती बंदोबस्त केला. दुराणी नदी ओलांडू शकत नाही हे पाहून भाऊने सिरहिंदच्या दिशेने जाऊन तिकडचा प्रांत आपल्या ताब्यात आणण्याचे ठरविले. त्याप्रमाणे तो दिल्लीहून निघून साठ कोसावर असलेल्या कुंजपुऱ्यास पोहोचला. कुंजपुऱ्याचा सरदार नजाबतखान याने लढाईची तयारी केली. अहमदशहाचा सरदार समदखान हा लाखी जंगलात भटकत होता तो पाचशे माणसे घेऊन त्याला मिळाला. त्याचप्रमाणे रोहिला सरदार कुतुबशहा कुंजपुऱ्यास आला. नजाबतखानाने त्या दोघांना किल्ल्यात येण्यास सांगितले. पण ते त्यांनी कबूल केले नाही. तुम्ही किल्ल्यात तयारीने रहा. आम्ही बाहेर राहून लढा देतो. आम्हाला पेच पडल्यास आम्ही किल्ल्यात येऊ असे त्यांनी सांगितले. असे करणे  योग्य नव्हे. किल्ल्यात सगळे एकत्र येऊन आपण दोन महिने किल्ला लढवू म्हणजे अहमदशहा आपल्या साहाय्यार्थ येईल असे नजाबत खानाने सांगितले पण समदखानाला आपल्या शक्तीचा गर्व होता. तो किल्ल्याबाहेरच तळ देऊन राहिला.

भाऊ आपल्या सगळ्या सैन्यासहित कुंजपुऱ्यावर चाल करून आला. त्याचे एक लाख सैन्य होते. सोबत मोठा तोफखाना होता. इब्राहीमखानाच्या हाताखाली बारा हजार गार्दी होते. त्यांना आघाडीवर ठेवून भाऊने किल्ल्यावर हल्ला चढविला. समंदखान आणि इतर सरदारापाशी दोन हजारांचे सुद्धा सैन्य नव्हते. तरी त्यांनी पुढे होऊन  युद्धाला सुरवात केली. इब्राहीमखानाने तोफांचा मारा सुरू केला. रोहिले सरदारांनी मराठ्यांविरुद्ध घोड्यांवरून चाल केली. पण तोफांच्या मारामुळे त्यांना मराठ्यांपर्यंत पोहोचता येईना. सगळ्या सैन्यासहित भाऊने हल्ला केला. समंदखान मारला गेला. त्याचे सैन्य किल्ल्याच्या वेशीकडे पळत सुटले. वेशीपाशी ते आले तो नजाबतखानाने किल्ल्याचे दरवाजे बंद केले. मग समंदखान आणि कुतुबशहाच्या माणसांनी नजाबतखानानला म्हटले, ''तुम्ही अहमदशहाच्या माणसांना आत येऊ देत नाही. खात्रीने तुम्ही मराठ्यांशी मिळाला आहात. पण हरकत नाही. अहमदशहा जिवंत आहे. उद्यां तो तुमच्या कृत्याचा जाब मागितल्याशिवाय राहाणार नाही.'' असे बोलून आणि गोंधळ करून त्यांनी वेशीचे दरवाजे उघडण्यास लाविले. तोपर्यंत मराठे तेथे पोहोचले होते. त्यांनी दरवाजातून तडक किल्ल्यात प्रवेश केला. त्यांनी किल्ला पूर्णपणे लुटला आणि नजाबतखान आणि त्याच्या दोन्ही मुलांना हालहाल करून ठार मारले. कुतुबशहा पाडाव झाला होता. त्याचा, दोन दिवसांनी शिरच्छेद  करण्यात आला. नजाबतखानाचा एक मुलगा दिलेरखान हा जिवंत राहिला. मराठ्यांनी किल्ला खणून काढला. तेथे त्यांना पुष्कळ संपत्ती सापडली. उंट, घोडे, धान्य, आणि तोफा इत्यादी सामग्री त्यांनी हस्तगत केली. मराठ्यांनी किल्ल्यातील लोकांना फार छळले आणि मोठा विजयोत्सव केला.

अहमदशहाला ही बातमी कळली. त्याला अतिशय क्रोध आला. अफगाण सरदारांना बोलावून त्याने म्हटले. ''अफगाणांची अशी दुर्दशा, आणि तीही मी जिवंत असताना व्हावी हे मी कधीही सहन करणार नाही. नदीचा उतार

कोठे सापडतो का पहा म्हणजे आपल्याला चटकन नदी ओलांडता येईल. त्याप्रमाणे लोकांनी उतार शोधले पण ते कुठेच सापडले नाहीत. अहमदशहा आपले सैन्य घेऊन नदीच्या काठाकाठाने कूच करीत बागपत येथे आला. बागपत हे दिल्लीपासून चवदा कोसावर आहे. भाऊला ही बातमी कळली पण नदीला पूर असल्यामुळे त्याला त्याची काळजी वाटली नाही. तरी सिरहिंदच्या रोखाने पुढे जाण्याचा त्याने आपला बेत टाकून दिला. दिल्लीपासून वीस कोसावर सोनपत येथे शत्रू नदीपार होण्याची शक्यता आहे हे ओळखून भाऊने तेथे रात्रंदिवस पहारा देण्याकरिता एक हजार स्वार ठेवून दिले. अहमदशहाने चार पाच दिवस वाट पाहिली. नंतर एके दिवशी तो सैन्यासहित नदीकिनाऱ्यापर्यंत आला. त्याने रोहिले सरदार आणि शुजाउद्दौला यांना बोलावून म्हटले, ''तुम्ही हिंदुस्थानाचे सरदार आहात तुम्हाला नदीवर उतार सापडू नये  हे आश्चर्य आहे. आता मी उतार शोधून काढतो पहा.'' मग ते सगळे म्हणू लागले, ''आम्ही स्वार्थप्रेरित आहोत. पण आमचे रक्षण करण्याच्या निस्वार्थ बुद्धीने आपण आला आहात. आम्हाला काही सुचत नाही.''अहमदशहाने म्हटले, ''आता ही गोष्ट मानवी उपायाच्या बाहेर गेली आहे. आता परमेश्वरावर भार टाका आणि येथूनच नदीत घोडे घाला.'' आणि अहमदशहाने फातिहा (प्रार्थना) पढून आपला घोडा नदीच्या काठावर आणला. त्याचवेळी जारचीने (घोषण करणारा) ओरडून सांगितले की सैन्याने नदीत घुसावे. त्याप्रमाणे सैन्य सुरक्षितपणे नदीपार झाले. काही ठिकाणी घोड्यांना पोहावे लागले तर काही ठिकाणी त्यांचे पाय नदीच्या तळाला लागले. नदीच्या दुसऱ्या काठाला सैन्य लागले तेथे इतका चिखल होता की माणसे काय जनावरे काय कुणालाच पुढे सरकता येईना. मग अहमदशहाने ठरविले की झाडाच्या फांद्या आणून चिखलावर पसराव्या. काठावर झाऊ नांवाच्या झाडांचे जंगल होते. या झाडांना पाने नव्हती आणि त्याच्या फांद्याही लहान लहान होत्या. मुख्य वजीर घोड्यावरून उतरला आणि त्याने स्वत: झाडाची फांदी तोडली. अहमदशहाच्या जमातीतील आठ हजार माणसांपैकी प्रत्येकाने  फांद्या तोडून चिखलात पसरविल्या. नंतर सर्व सैन्याने याच प्रकारे दोन गज उंचीचा रस्ता एका घटकेत तयार केला, या रस्त्यावरून सारे सैन्य पार करून गेले. तोफा हत्तीच्या कमरेला बांधून नदीपार करण्यात आल्या. सैन्यातील फक्त दहा पंधरा माणसे पाण्यात जाया झाली.

नदीपार झाल्यावर काठावरील मराठ्यांचे टेहेळणी पथक  कोठे आहे असे अहमदशहाने नजीबखानास विचारले. त्याजकडून कळले की मराठे तेथून सहा कोसावर आहेत. अहमदशहाने शहापसंदखानाला आज्ञा केली की त्याने मराठ्यांवर तुटून पडावे आणि त्यापैकी एकालाही पळून जाऊ देऊ नये. शहापसंदखानाने आपल्याबरोबर चार हजार माणसे घेतली. वाट दाखविण्यास नजीबखानाची माणसे बरोबर होती. दोन घटकांत तो मराठी पथकापाशी पोहोचला. त्यांनी लढण्याची तयारी केली. पण अफगाणांचे सैन्य चाल करून येत आहे हे पाहून त्यांची हिंमत खचली. आणि ते मुख्य छावणीकडे वळले. शहापसंदखानाने जवळ येऊन त्यांच्यावर बंदुकींचा मारा केला. थोडा वेळ गोळीबार केल्यानंतर त्याने चहूबाजूने त्यांच्यावर तलवार चालविली. आणि सर्वांची कत्तल केली. त्यांची डोकी कापून सहा घटकांच्या अवधीत तो अहमदशहाच्या छावणीत परत आला.

दुसऱ्या दिवशी अफगाणांनी कूच केले. आणि तिसऱ्या दिवशी ते पानीपतला पोहोचले. भाऊने पण कूच करून पानीपत गाठले आणि गांवानजीक त्याने आपला तळ ठोकला. अहमदशहाचा तळ पानीपत गांवापासून तीन कोसावर होता. दोन्ही दळांत चकमकी उडू लागल्या. दिल्लीचा किल्लेदार नारोशंकर याच्या प्रयत्नाने भाऊच्या सैन्याला रसदेचा पुरवठा होत होता. पुण्याहून दिल्लीपर्यंत युद्धाचे सामान दारू गोळा, स्वार पायदळ, इत्यादी रोज येऊन दाखल होत होते. अहमदशहा रोज सकाळी आपला मुलगा तैमूर याला घेऊन घोड्यावरून फिरत असे.

त्याची पथके सुसज्ज होऊन त्याच्या तंबूबाहेर उभी असत. आज्ञेवाचून छावणीच्या बाहेर कोणीही पडायचे नाही अशी सक्त ताकीद शुजाउद्दौला आणि अफगाण सरदार यांना देण्यात आली होती. अहमदशहाच्या रोजच्या टेहेळणीत अगदी थोडेस्वार असत. तो शिरपेच वगैरे सारखा उंची पोशाख घालीत नसे. डोक्याला काळी टोपी, अंगात तांबडा अंगरखा, जवळ धनुष्य आणि बाणाचा भाता असा त्याचा थाट असे. तैमूरशहाचा पोशाखही असाच असावयाचा. अहमदशहाच्या आज्ञेने त्याचे सरदार त्याला चकमकीची रोज यावेळी माहिती पुरवीत. मराठ्यांची पथके हल्ला करण्यास पुढे झाली की अहमदशहा त्यांचा प्रतिकार करण्याकरिता आपल्या कोणत्याही पथकाला हुकूम सोडी. त्याच्या स्पष्ट आज्ञेशिवाय हल्ला करण्यास कोणी धजत नसे. अहमदशहाला लांबून धुरळा उडताना दिसला आणि धुरळा नजीक येत आहे असे वाटले की तो म्हणे की आपल्या पथकांचा पराजय झाला आहे. आणि मग मदतीकरिता तो सैन्याच्या तुकड्या रवाना करी. धुरळा लांब जाताना दिसला की शत्रू पराजित झाला हे ओळखून त्यांच्या पाठलागाकरिता तो आपली दोन तीन घोडदळे पाठवी. त्यांनी कुठवर पाठलाग करावा हेही तो ठरवीत असे. घोडदळांना तितक्या अंतरावर जाणे अशक्य आहे असे वाटले की ते लोक बाणाच्या एका टप्प्यावर थांबत. मग तो पुढे जाऊन आणि चकमक चाललेली पाहून योग्य तो निर्णय घेई. कधी कधी हिंदुस्थानी सरदारांना तो योग्य ते हुकूम करी. हरकाऱ्यांच्या ऐवजी चकमक लढणारे शिपाईच सतत आणि एका पाठोपाठ एक त्याला बातम्या पुरवीत. बातम्यांचा मजकूर खालीलप्रमाणे असे. '' ते आता बंदुकी झाडीत आहेत; किंवा आता तलवारीची खणाखणी सुरू झाली आहे, किंवा इतकी माणसे ठार झाली, इतकी जखमी झाली आहेत, अमक्या अमक्या रंगाचा झेंडा, किंवा हौदा आणि अंबारी असलेला अमका अमका हत्ती समोर आहे.'' असे मजकूर त्याला सांगण्यात येत.

अशा कार्यक्रमात तो दोन प्रहर घालवी. त्यावेळी मैदानात त्याच्याकरिता एक लहानशी राहुटी आणि आडोशाची कमान उभी करण्यात येत असे.

अहमदशहाचा वजीर शहावलीखान अशरफुल वुजरा याचा हिंदुस्थानच्या लोकांशी चांगलाच स्नेह होता. मीरबख्शी जहानखान जब्तबेगी अब्दुल्लाखान, दिवाण बेगी फतुल्लाखान, सादूजाई हे त्याचे सरदार होते. बाज चंगखान बंगष, आणि बरखुर्दारखान अबचाकजाई (हा रसद आणण्याच्या कामावर होता) महंमदखान खोजा हा गुलार आगाशी म्हणजे अहमदशहाच्या खाजगी कडील अधिकारी होता. सय्यद रहमतखान हा तोफखान्याचा अधिकारी होता. मीर अताईखान आणि जारजी करीमदादखान हे अहमदशहाचे प्रमुख सरदार होते. नसफचीबाशी कुश्क अगाशी मारुफखान, बाजूखान अर्जबेगी आणि हिंदुस्थानचे इतर सरदार हे अहमदशहाच्या भोवती हजर असत. अहमदशहार घोड्यावर असे तेव्हा ते त्याच्या भोवती उभे असत. तो आपल्या तंबूत बसला तरी ते त्याच्याशी उभे राहून बोलत. पण सकाळच्या प्रहरी जेव्हा दरबार नसे त्यावेळी हाफिज रहमत खानास पुष्कळदा बसण्याची परवागी असे कारण तो हाफिज होता. म्हणजे त्याला कुराण तोंडपाठ येत असे.

भाऊच्या सैन्यात दुआब आणि दिल्ली येथून रसदेचा पुरवठा होत असे. नजीब खानाने अहमदशहास म्हटले, ''अंतर्वेदीत माझी ठाणी आहेत पण दिल्लीच्या भोवती दहाबारा कोसपर्यंत माझा अंमल नाही. तुम्ही सैन्याची एक तुकडी मला द्याल तर ती मी माझ्या अधिकाऱ्याबरोबर पाठवीन म्हणजे शहादऱ्याच्या बाजूने शत्रूला रसदेचा पुरवठा होतो तो बंद करता येईल.'' अहमदशहाने जरची करीमदादखान याच्या दळापैकी एक हजार माणसे या कामाकरिता नेमली. सिकंद्रा आणि आसपासच्या परगण्याचे आमिल त्या पथकाबरोबर होते. त्यांनी शहादऱ्यापर्यंत सर्व प्रदेश उध्वस्त केला. आणि माणसे सापडतील तशी मारली. दिल्लीहून नारोशंकराने जिवाजी बख्शी आणि मीरखान

नत्थूच्या नेतृत्वाखाली काही सैन्य पाठविले. पण त्यांच्या हातून काही होऊ शकले नाही. त्यांची माणसे मारली गेली आणि त्यांना दिल्लीला परत जावे लागले. त्या वेळेपासून शत्रूचा रसदेचा तो मार्ग बंद झाला. यानंतर अहमदशहाने जरची करीमदादखान आणि मीर अताईखान यास म्हटले "गेल्या दोन वर्षापासून माझ्या सैन्याला सारखी दगदग होत आहे. तुम्ही नुकतेच कंधारहून आला आहात. शत्रुसैन्याचा पुरवठा बंद करण्याचे काम तुम्ही झटून केले पाहिजे." मग ते दोघे सरदार आणि मूसीखान बलोची हे मराठ्यांच्या रसदेच्या तुकडीवर दोन वेळेस तुटून पडले आणि सर्वांची कत्तल करून त्यांनी तोही मार्ग बंद करून टाकिला.

भाऊ वंजाऱ्यांना चांगले वेतन देत असे. ते रात्रीच्या वेळी अपरिचित आणि अवघड मार्गांनी मराठ्यांच्या छावणीत धान्य नेऊन पोहोचवीत. पण दिवसा तसे करणे कठीण होते. भाऊच्या छावणीत आता पैशाची टंचाई भासू लागली. भाऊने नारोशंकराला काळजीपूर्वक खजिना पाठविण्याची आज्ञा केली. नारोशंकराने पाचशे शिपायांच्या बरोबर प्रत्येकी पाचशे अश्रफ्या दिल्या. त्यांनी त्या कंबरेला बांधल्या. भाऊच्या छावणीत जाण्यास ते निघाले. सकाळच्या प्रहरी करीमदादखान आणि अताईखान यांनी त्यांना गाठून त्यांच्यावर हल्ला केला आणि सर्वांची कत्तल केली. दोन तीनच माणसे काय ती निसटून शहरात परत आली. सगळा खजिना लुटला गेला. मारलेल्यांची डोकी आणि पाडाव झालेले घोडे अहमदशहाला दाखविण्यात आले. यानंतर भाऊंच्या सैन्याने धास्ती घेतली.

अशा रीतीने उभय पक्षाच्या चकमकीत एक महिना गेला. एके दिवशी नजीबखानाचा भाऊ सुलतानखान याच्या हाताखाली रोहिल्यांचे पायदळ लढत होते. तेव्हा सुलतानखानाने आपल्या शिपायांना म्हटले की "आपण आज नेट धरला तर मराठ्यांना आज आपण हाकलून देऊ." रोहिले कबूल झाले. मराठ्यांची पद्धत अशी असे की ते रोज तोफा मैदानात आणीत आणि सूर्यास्ताला चार घटका राहिल्या की परत छावणीत नेत. त्या दिवशी तोफा परत चालल्या असता रोहिल्यांनी हल्ला केला. मराठे छावणीकडे पळू लागले आणि रोहिल्यांनी त्यांचा पाठलाग करीत मराठ्यांची छावणी गाठली. मग छावणीतून सगळे सैन्य तयार होऊन बाहेर पडले. सूर्यास्ताला अल्पावधि राहिला होता. आणि मग एकच धुमश्चक्री उडाली. झाडून सारे मराठे सैन्य उठले होते आणि रोहिले फक्त दोनहजार स्वार आणि तीनहजार पायदळ होते. रोहिल्यांचे घोडेस्वार गोंधळून पळून गेले. पण पायदळ शिपायांनी आपले झेंडे हातात धरून मराठ्यांच्य गोटात शिरण्याचा प्रयत्न केला. रोहिल्यांनी गोळ्यंचा वर्षाव केला त्यामुळे मराठ्यांच्या घोडदळाला त्यांच्यावर हल्ला करणे जमेना. त्याच सुमारास इब्राहीमखान गार्दी आणि बळवंतराव हे आपल्या पायदळासहित त्याठिकाणी आले. रोहिल्यांनी प्रयत्नाची पराकाष्ठा केली. त्यातच बळवंतरावाला पोटात दोन गोळ्या लागून तो खाली पडला. इब्राहीमखान गार्दी आणि त्याचा तोफखाना यांनी मोठी कामगिरी केली. त्यादिवशी दीड हजार रोहिले मारले गेले. उरलेले लढत लढत परतले. अंधार पडला त्यावेळी ते छावणीत परत आले. रोहिल्यांच्या पायदळांची इतकी कत्तल झालेल पाहून नजीबखानाला अति दुःख झाले.

या सुमारास मराठ्यांनी तह घडून यावा म्हणून विनंती केली. वजीर शहावलीखान हा तहाला अनुकूल झाला. या वाटाघाटी हाफिज रहमतखानाच्या मार्फतीने होऊ लागल्या. नजीबखान मूळचा गरीब पण आता हाफिज रहमतखान व इतर अमीरापेक्षा त्याचे महत्त्व वाढले होते. त्याच्या प्रयत्नाने शुजाउद्दौला हा अहमदशहाच्या पक्षात आल्यामुळे तर नजीबखानाचे महत्त्व भारीच वाढले होते. हाफिजने सुचविले की इमादुल्मुल्काला वजीर करावे आणि मराठ्यांशी तह करावा. शहावलीखानाने अहमदशहापुढे ही सूचना मांडली. अहमदशहा कबूल झाला. ही गोष्ट नजीबखानाला कळली. तो दुसऱ्या दिवशी दरबारात आला आणि त्याने शहावलीखानाला त्याच्या तोंडावर म्हटले, "काल माझी

चार हजार माणसे ठार झाली. आणि आता कुणी कमहिमतीचा माणूस मराठ्यांशी तह करू इच्छितो व अफगाणांना त्यांच्या तावडीत द्यावे म्हणतो असे मी ऐकिले आहे. हा माणूस भित्रा आहे आणि जातीचा अफगाण नाही. मी अहमदशहाला स्पष्टपणे सांगतो की तो इस्लामचा सम्राट आहे. हा अफगाणांच्या इज्जतीचा प्रश्न आहे. अहमदशहाने अफगाणांना मराठ्यांच्या तावडीत लोटू नये.'' नजीबखानाने तडजोड घडवून आणू पाहणाऱ्यांच्याबद्दल इतरही कटु शब्द उच्चारले. शहावलीखान चिडला आणि पुश्तूभाषेत म्हणाला (गुमखोर) ''मूर्खासारखे बोलू नकोस.'' इतके म्हणून तो निघून गेला. नजीबखानाने सरदार जहानखान आतणि काजी इद्रीस यांचे मन वळविले. अहमदशहापाशी त्याचे वजन होते. नजीबखानाने त्यांना लढ्याची धार्मिक बाजू सांगून अहमदशहाकडे पाठविले. मग जहानखानाने अहमदशहाला म्हटले. ''काफरांच्या बरोबर तह करणे राजधर्माविरुद्ध आहे. आमची शक्ति शाबूत आहे. आमचा काही पराजय झाला नाही. हे मराठे, यांनी लाहोरात आमच्या माणसाचा काय काय छळ केला नाही. त्यांनी सिरहिंद येथे समदखानाचा नाश केला, दिल्लीत नजीबखानाचे त्यांनी काय कमी हाल केले. अलीकडेच त्यांनी कुंजपुऱ्यास अफगाणांची काय बेइज्जत केली नाही. इमादुल्मुल्कानेच आलमगीरसानीचा खून करविला हा सगळा प्रलय त्याच्यामुळेच घडून आला आहे.''अहमदशहाने म्हटले ''मला सारे माहीत आहे. मला स्वत:ला इमादुल्मुल्क आवडत नाही. पण माझे सैन्य पोसायला माझ्यापाशी पैसा नाही. मराठ्यांच्या ताब्यातून काढलेला मुलूख मी अफगाणांना दिला आहे. ते सुस्थितीत आहेत. पण माझे सैन्य अन्नावाचून मरत आहे. मी या रोहिल्यांकडून जबरदस्तीने पैसे उकळले तर माझा दुर्लौकिक होतो. या रोहिल्यांच्या डोक्यात इतकी साधी गोष्ट येत नाही. केवळ त्यांच्याबद्दलच्या ममत्वामुळे मी दोन वर्षे मोहिमेचा त्रास सहन करीत आहे. मराठ्यांचा पराजय करण्यावरच माझे राजेपण थोडेच अवलंबून आहे. मी केवळ धर्मयुद्धाला म्हणून प्रवृत्त झालो आहे.''

यावर काजी इद्रीस म्हणाला ''या शब्दांनाच आपण चिकटून राहावे. कोणत्याही लोभाची पर्वा करू नका. कारण त्यामुळे जिहादचे पुण्य नाहीसे होते. देवाने तुम्हाला राज्य दिले आहे. ते काही रोहिल्यांच्या मदतीवर अवलंबून नाही. रोहिल्याचा छळ झाला म्हणून ते तुमच्याकडे धावले. आणि आता अंगांत शक्ति असूनही तुम्ही त्यांची दाद घेतली नाही तर परमेश्वरासमोर तुम्हाला जाब द्यावा लागेल. हे जग नश्वर आहे. हा हा म्हणता नादिरशहाची काय गत झाली हे तुम्ही पाहिलेच आहे. शत्रूला भिऊ नका, पैसा नाही म्हणून कचरू नका. फक्त परमेश्वराचा धाक मनात ठेवा.'' हे बोलणे चालू असता दुराणी सरदार हजर होते ते म्हणू लागले. ''हा काजी योग्य तेच म्हणत आहे. या धर्म युद्धात आम्ही आपल्या आज्ञेचे पूर्ण पालन करू. मग कोणताही प्रसंग आला तरी बेहेतर. आम्ही भरल्या पोटी असलो किंवा उपाशी असलो तरी प्रयत्नात कोणत्याही प्रकारे कसूर करणार नाही.'' मग अहमदशहाने म्हटले. ''आता तहाच्या गोष्टी बंद, लढाईचा फातिहा (प्रार्थना) पढा'' मराठ्यांच्या वकिलांना निरोप देण्यात आला.

नंतर बातमी आली की कारुपी, शिकोहाबाद, इत्यादी परगण्याचा आमिल गोविंद पंडित उर्फ गोविंद बुंदेले हा दहा हजार सैन्य घेऊन भाऊला येऊन मिळण्याकरिता दुआबांतून येत आहे. त्याने नजीबखानाचे परगणे उध्वस्त करण्याचा सपाटा चालविला आहे. त्याला भाऊच्या छावणीत येऊ देऊ नये म्हणून अहमदशहाने जरची करीमदादखान आणि मीर अताईखान यांना आज्ञा केली. त्या दोघांनी नजीबखानाचा एक सरदार करीमखान याला बरोबर घेतले आणि रातोरात नदीपार करून आणि मीरठ आणि सिकंद्र्यामधील पन्नास कोसाची मजल मारून भल्या पहाटे गोविंद पंतावर चाल केली. त्याचे सैन्य गाफील होते. त्यांनी गोविंद पंतांचे डोके कापले. गोविंद पंतांचा मुलगा बाळाजी मोठ्या कष्टाने निसटला. त्याच्या दहा हजार सैन्याची पूर्ण वाताहत झाली. चवथ्या दिवशी गोविंदपंतांचे डोके

अहमदशहाच्या छावणीच्या बाजारात, त्याच्या बैठकीच्या सज्जा (मंजिलार नुमा) खाली फेकून देण्यात आले.

त्यानंतर मराठ्यांच्या छावणीत प्रत्येक गोष्टीचे दुर्भिक्ष झाले. त्यांनी आपल्या छावणी भोवती मोर्चे उभे केले आणि दक्षिणी भाल्या एवढे खोल खंदक खाणले. रोज चकमकीकरिता ते बाहेर पडत आणि संध्याकाळी परत जात. असे दोन महिने चालू होते. अन्नावाचून ते दुबळे झाले आणि चकमकीत त्यांचा एकदाही प्रभाव पडला नाही. ते अगदी हतबल झाले.

**१४ जानेवारी -** एक दिवस मराठ्यांचे सगळे सैन्य, इब्राहीमखानाचा तोफखाना, होळकर, शिंदे इत्यादी छावणीच्या बाहेर निघाले आणि त्यांनी युद्धाला सुरुवात केली. अहमदशहाने आपल्या पद्धतीने आपल्या सर्व पथकांना युद्धात पडण्याचा हुकूम केला. मराठ्यांनी आपली प्रबळ शक्ती प्रगट केली. आणि एका पाठोपाठ एक असे अब्दालीच्या सैन्यावर सारखे हल्ले करू लागले. अहमदशहाला याच्या सारख्या बातम्या मिळत होत्या. तो स्वत: पुढे झाला. त्याने पाहिले मराठ्यांचे सगळे सैन्य तोफखान्यासहित पुढे सरकत आहे. भाऊने इब्राहीमखानाला शुजाउद्दौला, हाफिजहमत दूंदीखान इत्यादींच्या विरुद्ध पाठविले. मल्हारराव होळकर हा नजीबखानाच्या विरुद्ध उभा होता. भाऊ स्वत: आपले हुजरातीचे पथक घेऊन अहमदशहाच्या हाताखाली असलेल्या पथकावर घसरला. त्याच्या समोर मोठ्या तोफा होत्या. सकाळपासून तीन तासांपर्यंत अग्निगोल आणि तोफा यांचा भडिमार चालू होता. नंतर बर्कंदाजानी बंदुकी आणि भाले उपयोगात आणले. मराठ्यांनी समोरील पथकांना मागे रेटले. त्यावेळी अहमदशहाने जरची करीमदादखान आणि मीर अताईखान यांना त्यांच्या मदतीस पाठविले. त्या सरदारांनी चांगली लढाई केली. अहमदखान बंगश आणि दुंदीखान यांच्यावर इब्राहीमखान गार्दी आणि इतर सरदार यांनी हल्ला केला. दुंदीखानाची अनेक माणसे ठार झाली. त्याचे कित्येक शिपाई पळून गेले. त्याचा हत्ती पन्नास पावले मागे हटला. बंगशानेही निकराचा सामना दिला. त्याची पण कठीण अवस्था झाली. शुजाउद्दौला आणि नजीबखान यांच्यावर त्या दिवशी कोणताच आघात झाला नाही.

दुपारच्या वेळी भाऊने घोड्यावर स्वार होऊन आणि विश्वासरावाने हत्तीवरून हल्ला केला. आणि सैन्ये भिडवून बंदुकी, भाले आणि तलवारी चालविल्या. मीर अताईखान मारला गेला. आपले सैन्य पेचात आहे, हे अहमदशहाला दिसून आले. त्याने आपला बाशीगुल पथकांना बोलाविले. त्यात सहा हजार स्वार शिपाई होते. आणि म्हणाला ''पोरांनो, हीच वेळ आहे. शत्रूला चहूकडून कोंडून धरा.'' त्याप्रमाणे त्या तीनही पथकांनी भाऊच्या आघाडीवर एकदमच गोळ्यांचा वर्षाव केला. भाऊच्या अघाडीचे पाय उखडले आणि ते मागे हटून भाऊच्या मुख्य पथकात मिसळले. त्यावेळी हलकल्लोळ झाला. लोक पळू लागले. भाऊच्या हुजरातीने थोडा दम धरला आणि काही ठिकाणी आपली जागा सोडली नाही. अहमदशहाच्या वरील बाशीगुल पथकापैकी एका दस्त्यात दोनहजार माणसे असत. एक दस्ता उजवीकडून येई आणि गोळ्यांचा वर्षाव करून डावीकडे जाई. दुसरा दस्ता डावीकरून येई आणि गोळ्या झाडून उजवीकडे जाई. तिसरा दस्ता समोरून गोळ्या झाडीत येई आणि पिछाडीकडे निघून जाई. शत्रू सावरण्यापूर्वी हे दस्ते पुन्हा पुन्हा येत आणि गोळ्यांचा सारखा वर्षाव करीत. चहूकडून मराठ्यांवर हल्ला होतो असे दिसून येऊ लागले. अशाप्रकारे लढाई चालू होती. मराठे मैदानभर पसरले होते ते झाडून एका ठिकाणी गोळा झाले. वरील तीन दस्त्यांनी त्यांच्या एक लाख सैन्याभोवती सतत घिरट्या घालण्याचा क्रम चालू ठेविला.

मराठ्यांचे पाय उखडले आहेत आणि काहीजण पळ काढीत आहेत हे पाहून बादशहाने वजीराच्या दळाला बाशीगुलच्या दस्त्यांना मदत करण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे त्यांनी हल्ला चढविला. या सुमारास विश्वासरावाला

गोळी लागली आणि मराठ्यांचा पराजय होणार असा रंग दिसू लागला. भाऊ जवळ आला तो पाहतो काय की विश्वासरावाचे प्रेत हत्तीवर असून त्याचे दोन्ही पाय हत्तीच्या डोक्याच्या दोन्ही बाजूस लटकत आहेत. भाऊला अपार दु:ख झाले, आणि मरणाचा निर्धार करून त्याने आपल्या जुन्या सरदारांना घेऊन घोडा पुढे घातला. अहमदशहाने पाहिले की मराठे मोठ्याने घोष करीत वजीराच्या दळावर चाल करून येत आहेत. त्याने आपल्या जंबूरकबाशीला आपले जंबूरकांचे उंट पुढे घालण्याची आज्ञा केली. एकाच वेळेस दीड हजार जंबूरकाचे बार झाले. या गोळीबाराने भाऊच्या बरोबर असलेले मातबर सरदार खाली आले. आणि इतरांनी पाठ फिरवली. वजीराचे दळ आणि बाशीगुलच्या पथकांनी त्यांच्यावर चहूकडून हल्ले करण्यास सुरवात केली. भाऊने दुसऱ्यांदा हल्ला केला. पण त्याचे काही चालेना. फिरून एकदा त्याची अनेक माणसे मृत्युमुखी पडली. आणि त्याला परत फिरावे लागले. या दोन्ही वेळेस जंबूरची बाशीच्या हल्ल्यासमोर मराठे मागे हटले. अहमदशहा स्वत: जंबूरचीबाशीच्या पथकापाशी उभा होता. सूर्यास्ताला अजून तीन तास अवकाश होता. त्यावेळी शत्रूने टोळ्याटोळ्यांनी रणांगणांतून पळ काढण्यास सुरवात केली. शत्रूचे बळ नाहीसे झाले हे अहमदशहाला दिसून आले. भाऊचे हत्ती, जरी पटका आणि चार पाच हजार माणसे एका ठिकाणी राहिली. आपला जीव वाचविण्याकरिता ती इकडून तिकडे फिरत होती. या वेळेस अहमदशहाने आपले अबदाली जातीचे आठ हजाराचे सैन्य मराठ्यावर घातले.

या सुमारास भाऊ मारला गेला. इतर सरदारांची डोकी कापण्यात आली त्यात भाऊचेही डोके कापण्यात आले मग अफगाण, मोगल, रोहिले आणि शुजाचे सैन्य शत्रूवर तुटून पडले आणि लुटालुटीला सुरुवात झाली. अफगाणांच्या हातात अगणित संपत्ती पडली. सूर्यास्तापर्यंत पाठलाग चालू होता. मराठ्यांच्या छावणीतील सगळी लूट अब्दालीच्या जातीच्या खानाच्या पथकाने घेतली. त्यांनी शक्य तोवर इराणी किंवा तुराणी यांना लूट घेऊ दिली नाही. पण त्यांनी हिंदुस्थानी शिपायांना लुटीचा माल विकला. सुंदर ब्राह्मण बायका एक तुमान म्हणजे चार रुपायाला एक आणि उत्तम घोडे दोन तुमान म्हणजे आठ रुपायाला एक या भावाने विकल्या गेल्या. सूर्यास्तापर्यंत अफगाणांना जो कोणी सापडला त्याचे डोके उडविण्यात आले. छावणीतील खंदकात शेकडो मराठे स्वार आणि घोडे मरून पडले होते. त्यांची संख्या इतकी होती की पुढे काही वर्षेपर्यंत शेतकऱ्यांना शेते नांगरणे मुष्किल झाले. नांगरताना कुठे हाडाचे सापळे सापडतील ते सांगता येत नसे. कित्येकांनी पानीपत गावात आश्रय घेतला होता. त्यांना हुडकून काढून ठार मारण्यात आले. नजीबखानाच्या कृपेने मल्हारराव सुरक्षित निसटला. जनकोजी शिंदे हरियाना प्रांतांतील गुंडांच्या हातून मारला गेला. अंताजी माणकेश्वराची तीच गत झाली. कित्येक थंडीने काकडून मेले. भाऊचे प्रेत रणमैदानात सापडले. ते वजीराने शुजाकडे दिले. त्याचे गोसावी लोकांनी विधिपूर्वक दहन केले. भाऊची बायको बारगिराच्या मदतीने सात प्रहरात साठ कोसाची मजल मारून मोठ्या कष्टाने वल्लभगडाला पोहोचली.

## शहानामाये अहमदिया

(निजामुद्दीन इश्रत हा पंजाबातील सियालकोट येथील राहणारा. इ. स. १७५७ मध्ये अहमदशहा अब्दाली हा आपली हिंदुस्थानची मोहीम आटपून काबूलला परत जात असता, निजामुद्दीन हा अहमदशहाला चिनाब नदीच्या काठी भेटला. अहमदशहाने त्याला आपल्या पदरी ठेवून घेतले. निजामुद्दीनने नादिरशहाच्या चरित्रावर शहानामाये नादिरी हा काव्य ग्रंथ रचला. तो पाहून अहमदशहाने आपल्याही जीवनावर निजामुद्दीनने काव्य लिहावे अशी त्याला आज्ञा केली. निजामुद्दीनने यावरून शहानामाये अहमदिया हे महाकाव्य रचले. हे काव्य म्हणजे इतिहास नव्हे.

निजामुद्दीन पानिपतावर हजर नव्हता. पण इ. स. १७६२ मध्ये अहमदशहाने काश्मीर जिंकल्यावर तेथे निजामुद्दीनची न्यायखात्याचा अधिकारी म्हणून नेमणूक केली.

निजामुद्दीनाने हे काव्य इ. स. १७७२ पर्यंत आणून सोडले आहे. या ग्रंथाची एक हस्तलिखित प्रत हैद्राबादच्या सरकारी ग्रंथालयात आहे. त्यातील पानीपत संबंधीच्या प्रकरणाचा कामापुरता मराठी अनुवाद येथे दिला आहे. अर्थात हे काव्य आहे, इतिहास नव्हे हे लक्षात ठेविले पाहिजे. तरी कवि हा अहमदशहाच्या दरबारात वावरत असल्यामुळे काळजीपूर्वक शोधणाऱ्याला त्याच्या काव्यात माहितीचे कण आढळल्याशिवाय राहणार नाहीत.)

## पानीपतपुरता अनुवाद

काफरांनी यमुनानदीच्या काठी पोहोचून तेथे छावणी केली. त्यांनी आपल्या छावणीच्या भोवती तोफा चढविल्या त्यांची गणती होऊ शकत नव्हती. मराठ्यांच्या बरोबर गाजीउद्दीनचे मोगल शिपाई मिळाले होते. हे नावाचे मुसलमान आपला धर्म विसरून हिंदूंना मिळाले होते. पण त्यांच्यावर परमेश्वरी कोप झालाच. खऱ्या धर्मापासून (इस्लाम) निघून ते हिंदूंच्या मंदिराकडे वळले. अशा हितशत्रूवर परमेश्वरी कोप होऊन त्यांची शिरे धडावेगळी होणारच. त्याला शस्त्राचीही आवश्यकता नाही. गाजीउद्दीन जनकोजीला जाऊन मिळाला म्हणून त्याचा सर्वनाश झाला. बादशहाच्या हातून त्याचा पराभव होऊन त्याची आमरण फजीती झाली.

काफरांच्या सैन्याचा बंदोबस्त पाहून अहमदशहला चेव आला. त्याने आपल्या सैन्याला आज्ञा केली की धर्मयुद्धाकरिता तयार व्हा. तुमच्या पदाघातांनी धरणी कंपायमान होवो. त्याच्या सैन्यांतील रणवाद्यांचा आवाज गगन भेदून सूर्यापर्यंत जाऊन पोहोचला. अहमदशहा आपल्या पराक्रमी सैन्यासहित कूच करून नजीबखानाच्या मुलुखातून निघाला. त्याच्याबरोबर नामवंत अमीर उमराव होते. त्याचे सैन्य म्हणजे पोलादाचा जणू डोंगरच वनातून चालत असल्याचा भास झाला.

मुक्कामावर पोहोचल्यावर अहमदशहाने आपल्या सैन्याची रचना केली. दोन्ही सैन्ये एकमेकासमोर आली. वीरांना मृत्यू म्हणजे समारंभाची घडी वाटू लागली. खुरासान आणि दक्षिणी यांच्या फौजा पानीपतावर जमल्या. मरू किंवा मारू या भावनेने ते बेभान झाले होते. त्या दिवशी विश्वावर प्रलय कोसळल्याप्रमाणे झाले.

अहमदशहाने मग मैदानावर सैन्य जमविले आणि परमेश्वराची करुणा भाकली. मग वजीराने बादशहाचा निरोप घेतला आणि तो तोफांच्या कडे रवाना झाला. त्यावेळी पृथ्वी आणि आकाश ही खालीवर होऊ लागली. तोफातून आगीचे लोळ बाहेर पडू लागले. पृथ्वीवर एकच हलकल्लोळ उडाला. युद्धाच्या ईर्ष्येने उभयदळे एकमेकांकडे चालून जाऊ लागली. दोन्ही सैन्ये प्रचंड पर्वताप्रमाणे भासत होती. सैन्याच्या धुराळ्याने अंधार पडला. सैन्यातील रांगा एकेक करून पुढे सरकू लागल्या. परमेश्वराने जणू त्याच दिवशी प्रलय घडवून आणण्याचे ठरविले होते. एवढा तळपणारा सूर्य, पण धुराने तो दिसेनासा झाला. तोफांतून आग बाहेर पडू लागली, तिच्यासमोर नरकातील आग म्हणजे काहीच नव्हे. दोन्ही सैन्यांतून तोफांचा मारा होऊ लागला. तेव्हा चोहोकडून आगीचा दर्या वाहतो असे वाटले. तोफांचे आवाज म्हणजे मेघांचा गडगडाटच. तोफांच्या लपेट्यात सैन्य आले तेव्हा अजगराच्या जबड्यात जणू ते सापडले. सारांश तोफांच्या भडिमाराने रोहिल्यांची दाणादाण होऊन ते अत्यंत कष्टी झाले. आणि त्यांनी अहमदशहाची मदत मागितली. अहमदशहाने रोहिल्यांची दुर्दशा पाहिली तेव्हा त्याने हाजी अताई आणि हाजी करीम यांना पाठविले. त्यांच्या पाठोपाठ महमूदखान पण निघाला. त्याच्या पाठोपाठ हसनखान हा अहमदशहाचा

निरोप घेऊन निघाला. या सर्व पथकातील शिपाई हे वाघासारखे आणि अनुभवी होते. आणि मग त्यांच्यात आणि शत्रूंत घनघोर युद्ध जुंपले. हत्ती आणि वाघ यांची झटापट होती. कधी एकाला जय मिळे तर कधी दुसऱ्याला. कृष्णवर्णीय हिंदूंच्यावर इस्लामची फौज तुटून पडली. जणू काय अंधारावर प्रकाशाने हल्ला केला. दोन्ही दळे हट्टाला पेटून युद्ध करीत होती. अनेक माणसे प्राण सोडू लागली. अग्नीचे बाण म्हणजे जगाचे काळच. त्यांच्या थयथयाटांनी पृथ्वी जळून खाक होऊ लागली. दोन्ही दलातील तोफांचा मारा चालूच होता. त्यांच्या माऱ्याने एकेका वेळी शंभर माणसे मरत. जाळणे हाच तोफांचा गुण आहे मग तुम्हीच सांगा त्यांच्यात आणि नरकात काय फरक आहे. तोफा आणि बाण यांच्याबरोबर बंदुकीचाही मारा होऊ लागला. प्रत्येक दस्त्यापाशी (पथक) हजारो बंदुकी होत्या. उभय सैन्याच्या बंदुकींच्या माऱ्यांनी शिपायांच्या रांगाच्या रांगा उध्वस्त झाल्या. मुसलमान गाजींच्या तोंडचे पाणी पळाले. त्यांचे चेहेरे फटफटीत झाले. अग्नीच्या पुराशी कोण युद्ध करू शकेल? त्यांनी युद्धासाठी हातपाय हलविण्यापूर्वीच त्यांच्या भोवती मृत्यूचा पाश पडू लागला. दोन्ही सैन्ये सारखीच प्रबळ होती. त्यापैकी कुणाचेच पारडे जड नव्हते. उभय सैन्यांनी शौर्यात कोणतीच कसूर केली नाही. मुसलमान आणि काफर हे शक्तीत बरोबर होते. इस्लाम धर्म (दीन) आणि काफरी यांच्यातील संग्राम हा काही सोपा नव्हता. एकीकडे अहमद तर दुसरीकडे अबुजहल असा हा संग्राम होता. वजीराच्या सैन्यावर शत्रू इतक्या त्वेषाने तुटून पडले की प्रत्यक्ष प्रलयच पातला असे वाटले. शत्रूच्या सैन्यात प्रचंड हत्ती होते. बादशहाने आपल्या फौजेला आज्ञा केली की आता गोळ्यांचा भडिमार सुरू करा. उभय सैन्ये एकमेकाला भिडली. नदीत नौका हलावी तशी पृथ्वी कापू लागली. अहमदशहाच्या आज्ञेने एकामागून एक अशा पल्टणी पुढे सरकू लागल्या. प्रत्येक स्वाराच्या हातात बंदूक होती. प्रत्येक पल्टणीतील बंदुकीच्या एकेका भडिमाराने शत्रूंच्या दोनशे खोगिरी रिकाम्या होऊ लागल्या. एकीकडून बाण तर एकीकडून बंदुकी असा मारा चालला होता. हत्तीवर बसलेले काफर सरदार शहावलीखानावर तुटून पडले. त्या घनघोर युद्धात अगणित माणसे मारली गेली. त्यामुळे खुरासान पासून दख्खनपर्यंत सगळा देश विपन्न दशेस पोहोचला. शहावलीखान परमेश्वराचे नाव घेऊन आपल्या सैन्यासहित काफराबरोबर लढू लागला. या लढाईत परमेश्वराच्या आज्ञेने हाजी अताईखान हा स्वर्गाला गेला (ठार झाला). मुसलमान संख्येने कमी आणि काफर बहुसंख्य, खमीरीत मीठ असल्याप्रमाणे. पण अहमदशहाच्या फौजेला काफरावर जय मिळाला. चंद्रप्रकाशाने अंगाराचा नाश करावा त्याप्रमाणे झाले. नाहीतरी काफरांना पवित्र धर्मावर जय कसा मिळणार? मातीपेक्षा पाणी हे केव्हाही श्रेष्ठच म्हटले पाहिजे. अहमदशहाने शत्रूवर आपली फौज घातली, प्रभात काळच्या वायूत सुगंध मिसळावा असे झाले. त्या घनघोर युद्धात जयाचे पारडे कधी इकडे तर कधी तिकडे असे अनेकवेळा झुकले. उभय दलाचे शिपाई पुढे पुढे तर तलवारीनी, कट्यारींनी आणि शेवटी तर नुसत्या हातांनी लढू लागले. त्यांचे डोळे क्रोधाने लाल झाले होते. त्यांच्या हृदयात दयेमायेचा लवलेशही नव्हता.

असे दुपारपर्यंत चालले होते आणि मग बादशहाने आपल्या पलटणींचा (दस्त्यांना) शत्रूवर निकराचा हल्ला करण्याचा आदेश दिला. हा हल्ला भीषण आणि भयंकर होता. सरदार जहानखान आणि शहापसंदखान हे आपल्या शिपायांना लागोपाठ शत्रूवर पाठवू लागले. मराठ्यांचे कित्येक घोडेस्वार आपल्या घोड्यावरून खाली आले. नजीबखान आपल्या जागेवर पहाडासारखा ठाण मांडून उभा होता. शेवटी परमेश्वराच्या कृपेने अहमदशहाचा विजय झाला.

किती माणसे मारली गेली याचा हिशेब मला विचारू नका. जेथे पहावे तेथे प्रेतांच्या राशीच्याराशी पडल्या होत्या.

**म पुसे अज़मन् अदाज़ा कुश्ता हा**
**ब बीन पुश्ताहा पुश्ताहा पुश्ताहा**

आणि मग इस्लामच्या फौजेने पाठलाग करून शत्रूची लांडगेतोड सुरू केली. बादशहाच्या आज्ञेने फौजेत विजय सूचक नगारे वाजू लागले. गर्विष्ठ असे शत्रूंचे सरदार मातीत मिळाले त्यांचे ते मुकुट कोठे गेले? त्यांची ती सिंहासने कोठे गेली? त्यांचे ते वैभव कुठे? त्यांचे ते असंख्य सैन्य कुठे गेले? त्यांचे ते वैभवशाली तंबू आणि शामियाने कोठे? त्यांची गर्वाची आणि वैभवाची मधुपात्रे भग्न झाली. त्यांचे गर्वहरण होऊन ते शुद्धीवर आले.

सारांश काफरांची सैन्ये उध्वस्त झाली. त्यांचा सैन्याचा सेनापती विश्वासराव हा गर्विष्ठ अशा नानाचा लाडका पुत्र होता. दैवाच्या एका फटकाऱ्यासरशी तो आपल्या अंबारीतून धुळीत पडला. आकाशातून तारा तुटून पडावा तसा तो हत्तीवरून खाली कोसळला. या विजयाने इस्लामचे फूल टवटवीत झाले. परमेश्वरी कोपाने काफरांची दुर्दशा झाली. दुराणींनी हजारो शत्रूंची कत्तल केली. हजारो शत्रू कैद होऊन आले. त्यात स्त्रिया आणि पुरुष दोघेही होते. ते दीनवाणे दयेची याचना करू लागले.

त्या मैदानातून जिवंत असे कोणी निसटले नाही. जनकोजी आणि भाऊ हे मारले गेले. शमशेरखान (बहादुर) मारला गेला. तीच गत फिरंगी कुळातील इब्राहीमखानाची झाली. अंताजी माणकेश्वर आणि तात्या हे तडफडून मरण पावले. मल्हार आणि राघो हे सुरक्षित निसटले नाहीत. ते मृत्यूच्या तलवारीला बळी पडले. पुढाऱ्यापैकी कोणीही सुरक्षित गेला नाही. अहमदशहाचा कोप म्हणजे आगच ती. पूर्वीच्या बादशहांच्या अनेक हकीकती वाचल्या आहेत पण असा विजय घडलेला मी कधी ऐकला नाही. शिकंदर काय, रुस्तुम काय किंवा बहमन काय आणि इस्फिंदार काय असे घनघोर युद्ध कुणीच पाहिले नसेल. मागे होऊन गेलेल्या कुणाही बादशहावर युद्धात तोफांचा आणि बंदुकींचा असा मारा झाला नसेल. या मोहिमेत अहमदशहा दोन वर्षे गुंतला होता. त्याला विश्रांती अशी मिळाली नाही. रात्रंदिवस तो शत्रूच्या भोवती घिरट्या घालीत होता. त्याने शत्रूची वाट अशी व्यवस्थित अडविली की त्यांचा काहीच उपाय चालेना. धन्य आहे अहमदशहाच्या समशेरीची. मोठमोठ्या शूरांना तिने नमविले. अहमदशहा हा आतून साधुवृत्तीचा आहे. तो रात्रंदिवस परमेश्वराच्या आराधनेत निमग्न असतो. त्याचा वजीर हा दयाळू आणि परमेश्वरभक्त आहे. वजीर हा अनुभवी आणि बादशाह पवित्र विचारांचा. असा उत्तम मेळ जमला आहे.

सारांश युद्धाच्या दिवशी अहमदशहाने कैद्यांची विचारपूस केली. कैद्यांवर दयेची दृष्टी केली. त्याने कैद्यांना अभय दिले. आणि सोडून दिले. आता यापुढे कोणालाही कैद करू नका असे बादशहाचे भेसावल म्हणजे शिपाई सर्वांना सूचना देत गेले. मग स्त्री आणि पुरुष कैद्यांना छावणीतून बाहेर काढण्यात आले. आणि त्यांना कपडे आणि वाट खर्चाला रुपये देण्यात आले.

अहमदशहाच्या हाती शत्रूची अगणित संपत्ती पडली. सामानाने लादलेले हजारो उंट, सोनेरी अंबारी असलेले हत्ती, सजविलेले घोडे, सोने भरलेल्या पेट्या, असे किती म्हणून वर्णन करावे. प्रत्येक शिपाई समृद्ध बनला. इतकी लूट रुमशामचे बादशहा अगर चीनचे सम्राट यांच्याही वाट्याला कधीही आली नसेल.

मग हिंदुस्थानच्या अमीरांनी अहमदशहावर सोने मोती उधळली. शुजाउदौला, नजीबखान इत्यादींवर अहमदशाहाची मोठीच कृपा झाली. त्यांना खिलतीची वस्त्रे व अलंकारही देण्यात आली. या विजयाची बातमी इराण अरबस्तान इत्यादी देशात जाऊन पोहोचली. मुसलमान कष्टी झाले होते. या विजयाची वार्ता ऐकून ते परमेश्वराचे आभार मानण्याकरिता सहर्ष मशिदीकडे निघाले.

परमेश्वरा, अहमदशहाचे वैभव दिवसेंदिवस वृद्धिंगत होऊ दे. त्याचे राज्य चिरकाल टिकू दे.

(या महाकाव्यात पानीपत प्रकरणावर चव्वेचाळीस पाने आहेत. प्रत्येक पानावर तीस ओळी आहेत. म्हणजे एकंदरीत तेराशेवीस ओळी आहेत. या काव्यात कवीचा कल्पनाविलास बहराला आला आहे असे म्हटले पाहिजे. उपमा उत्प्रेक्षा इत्यादींची त्याने गर्दी करून सोडली आहे. प्रत्येक ओळीचा अनुवाद करणे अनावश्यक होते. उदाहरणादाखल काही ओळीचा शब्दश: अनुवाद केला आहे तर बाकीचा मजकूर सारांश रूपाने दिला आहे.

या महाकाव्यांतून दोन तीन गोष्टी वाचकांच्या मनावर ठसल्याशिवाय राहात नाहीत. एक गोष्ट म्हणजे मराठ्यांच्या तोफांनी उडविलेला कहर. या घटनेवर कवीने निदान चारशे ओळी खर्ची घातल्या आहेत.

दुसरी गोष्ट म्हणजे रोहिल्यांची झालेली दाणादाण होय. तिसरी गोष्ट म्हणजे उभय दळे निकराने लढली आणि जयाचे पारडे कधी इकडे तर कधी तिकडे झुकत होते ही होय.

अहमदशहाच्या राजकवीने लिहिलेले हे पानीपतवरील काव्य अनेक दृष्टीने अभ्यासकांना उद्‌बोधक वाटावे असे आहे.)

## शिवप्रसाद - तारीखे फैजबक्ष

(शिवप्रसाद हा रामपूरचा रोहिला नवाब फैजुल्लाखान याच्या पदरी होता. फैजुल्लाखान हा इतर रोहिले सरदार हाफिज रहमतखान, दूंदेखान इत्यादींबरोबर पानपतच्या मैदानावर हजर होता. त्याच्याबरोबर शिवप्रसादही हजर होता. इ. स. १७७६ मध्ये शिवप्रसादने इंग्रज अधिकारी किर्कप्याट्रिक याजकरिता म्हणून रोहिलखंडच्या रोहिल्यांचा इतिहास लिहिला. या ग्रंथाचे नाव त्याने तारीखे फैजबख्श असे ठेविले.

शिवप्रसादाने पानीपत प्रसंगाचे अगदी त्रोटक वर्णन दिले आहे. त्याचा ग्रंथ अद्याप हस्तलिखिताच्या स्वरूपात रामपूरच्या सरकारी ग्रंथालयात आहे. त्यातील आवश्यक भागाचा मराठी अनुवाद मूळ फारशीवरून खाली दिला आहे.)

मराठ्यांचा कोट्यावधी रुपायांचा मुलूख अहमदशहाच्या कृपेने रोहिले सरदारांच्या ताब्यात आला. त्या प्रांतातील मराठे आमिल, गुमास्ते वगैरे अधिकारहीन झाले. त्यांची विपन्नावस्था होऊन ते पुण्याला बाळारावकडे गेले. आणि त्यांनी फिर्याद केली की उत्तर हिंदुस्थानातून आमचे वर्चस्व नाहीसे झाले असून रोहिल्यांनी सत्ता बळकाविली आहे. ही वेळ आमची दाद घेण्याची आणि मदत करण्याची आहे. दक्षिणी सरदारांनी उत्तर हिंदुस्थानची माहिती काढली. आणि आपसात सल्लामसलत केली. मोहीम काढली तर नतीजा बरा पावणार नाही असे त्यांना वाटले म्हणून मोहिमेचा विचार करू नये असे त्यांनी ठरविले. कुणालाही अहमदशहाविरुद्ध लढण्याचे धैर्य होईना. पण कित्येकांचे मरण ओढवले होते आणि उत्तर हिंदुस्थानात त्यांची माती व्हावयाची होती म्हणून अनेक सरदार मोहिमेवर निघाले. भाऊ, विश्वासराव, मल्हारराव, इब्राहीमखान गार्दी, यशवंतराव, नारोशंकर, विठलराव, माधवराव, आनंदराव, चतुरसिंग, सदाशिवराव, दामोदर, त्र्यंबकराव, दादोराव, जीवनराव, हीराजी, तात्याजी, अप्पाजी वगैरे सरदार हिंमत करून मोहिमेवर निघाले. निरनिराळ्या प्रांतातील सैन्ये त्यांना येऊन मिळाली तसे त्यांना अधिक बळ आले. हां हां म्हणता त्यांच्यापाशी असंख्य सैन्य गोळा झाले. मराठे सरदार प्रचंड सैन्य आणि प्रबळ तोफखाना घेऊन अहमदशहाशी लढण्याकरिता निघाले ते नरवर व ग्वाल्हेर मार्गे कूच करीत अकबराबाद आग्र्यापाशी आले. तेथे त्यांनी बावीस मुक्काम केले. त्यांना उत्तर हिंदुस्थानात जागजागी असलेली पथके येऊन मिळाली. याशिवाय

सूरजमल जाट हा एक लाख स्वार आणि पायदळ घेऊन त्यांना मिळाला. यमुनेच्या काठावरचा तमाम मुलूख त्यांच्या ताब्यात आला. त्यामुळे त्यांना भारी गर्व चढला. ते आग्र्याहून निघाले. नदीतील नावा त्यांनी आपल्याबरोबर घेतल्या. आणि यमुनेच्या काठाने कूच करीत ते दिल्लीस पोहोचले.

सूरजमलजाट हा धूर्त, धोरणी आणि अनुभवी होता. तुम्हाला रसद पुरवितो, शिवाय मला अजून युद्धसामग्रीची तयारी करावयाची आहे असे निमित्त करून तो मराठ्यांचा निरोप घेऊन आपल्या किल्ल्याच्या आश्रयाला गेला. आपण मराठ्यांच्या तावडीतून सुरक्षितपणे निसटलो याबद्दल त्याने परमेश्वराचे आभार मानले. नंतर त्याने अहमदशहापाशी अनेक अर्ज पाठविले. त्यात आपण मराठ्यांपासून वेगळे झालो. आणि तुमचा बंदा गुलाम आहे असा मजकूर होता. अहमदशहानेही त्याच्यावर विशेष कृपा केली.

दक्षिणी सरदारांनी दिल्लीत सापडेल ते लहान मोठे सामान घेऊन पानीपत कर्नालकडे कूच केले. तेथे ते थांबले. अहमदशहाचा अधिकारी अब्दुस्समदखान, हा होता. आणि नबाब सादुल्लाखानाचे अधिकारी कुतुबशहा, व मोमिनखान वगैरे नजीबुद्दौल्याने तेथे ठेविले होते. ते सर्व सुभेसिरहिंदचा बंदोबस्त पाहात. मराठे सैन्य येत आहे हे त्यांनी ऐकले. आणि त्यांचा प्रतिकार करणे अशक्य आहे असे दिसून आल्यामुळे ते सगळे कुंजपुऱ्याच्या किल्ल्यात आश्रयाला जाऊन राहिले. मराठ्यांनी कुंजपुऱ्याच्या किल्ल्याला वेढा दिला आणि हरप्रकारची रसद तोडली. सरतेशेवटी त्यांनी वरील सरदारांना कैद केले. आणि त्यांचे अनेक प्रकारे हाल करून ठार मारले.

मराठ्यांचे सैन्य चाल करून येत आहे हे पाहून अहमदशहा डगमगला नाही. त्याने अनूपशहराहून कूच केले. आणि पावसाळ्याचे शेवटी यमुना ओलांडून तो मराठ्यांच्या समोर आला. अहमदशहाचे सैन्य आले म्हणून मराठेही घाबरले नाहीत. ते आपल्या जागी ठाण मांडून राहिले. त्यांनी कोणत्याही प्रकारे काळजी अगर चिंता दाखविली नाही. उलट त्यांनी आपले मोर्चे अधिक मजबूत केले. आणि संघटित होऊन ते राहिले.

अहमदशहाने नजीबुद्दौल्याला हुकूम केला की तुम्ही ताबडतोब जाऊन शुजाउद्दौल्याला आमच्याकडे घेऊन यावे. नजीबुद्दौल्याने त्याप्रमाणे जाऊन शुजाउद्दौल्याला सर्व काही समजाविले आणि बादशहाने तुम्हाला अभय दिले आहे, त्याची तुमच्यावर विशेष कृपा राहील असे त्याला सांगून त्याला अहमदशहाकडे आणले. अहमदशहाने त्याला वस्त्रे अलंकार वगैरे देऊन त्याचा आदर सत्कार केला.

अहमदखान बंगश हा आपले सैन्य घेऊन सरळ अहमदशहाच्या सेवेत हजर झाला. हे सर्व मिळून अहमदशहापाशी प्रचंड सैन्य जमले. त्या सहित अहमदशहा न डगमगता आणि असंख्य असलेल्या शत्रूची तमा न बाळगता त्यांच्याशी लढू लागला. आणि त्यांचा निकाल लावण्याचा त्याने निश्चय केला.

सारांश अहमदशहाने मराठ्यांच्या छावणीपासून चार पाच कोसावर आपली छावणी केली. उभय पक्षाच्या आघाडीच्या पथकात चकमकी होऊ लागल्या. त्यांची हकीकत अशी आहे. मराठ्यांनी आपली गनिमी काव्याने लढण्याची पूर्वापार पद्धत सोडून दिली. त्यांनी छावणी कायम केली आणि मोर्चे बांधून ते राहिले. हेच त्यांच्या सर्वनाशाचे कारण झाले. उलट जर ते आपल्या पद्धतीने धावपळीची लढाई लढते तर वर्षानुवर्ष ही मोहीम काही संपली नसती. आणि त्यांचा मोड करण्यास फारच यातायात पडली असती. परमेश्वराची धन्य आहे की मराठ्यांनी आपली जुनी युद्धपद्धती सोडून दिली. ही तीन चार लाख माणसे अक्कल हुशारी आणि शहाणपणा याला पारखी झाली.

मराठ्यांची विचारसरणी अशी होती. पानीपतपासून ठाणेश्वरपर्यंतची भूमी ही हिंदूंची पुण्यभूमी होय. या

भूमीत ज्याला मृत्यू होईल, मग तो युद्धामुळे असो की इतर कारणामुळे असो, त्याला स्वर्गाची प्राप्ती होते. त्यांची पापे सगळी नाहीशी होतात. हे कुरुक्षेत्र आहे. येथे यश मिळाले तर चहूकडे लौकिक होईल. आणि मृत्यु आला तर सद्‌गती प्राप्त होईल. जर आम्ही गनिमी पद्धतीने लढलो तर लढण्याचा प्रसंग कुठे घडेल हे कुणी सांगावे. भलत्याच ठिकाणी मृत्यू आला तर इह आणि पर या दोन्ही लोकांना आपण मुकू. अशा विचाराने ते आपल्याला छावणीत कोंडून घेऊन राहिले. आणि प्राणाला मुकले. त्या युद्धातून कोणीही दक्षिणी सरदार जिवंत गेला नाही. पण मल्हारराव हा अनुभवी आणि पोक्त बुद्धीचा होता. त्याने भाऊ आणि विश्वासराव यांना हरप्रकारे समजाविले की ही छावणी नव्हे, ही मृत्यूची शृंखला आहे. ती बुद्धि हरपलेल्या सरदारांच्या पायात पडलेली आहे. तुम्हाला जीवनच नको असेल तर गोष्ट वेगळी. नसल्यास सापडेल त्या उपायांनी छावणीच्या बाहेर पडून निघून जावे. आणि गनिमी काव्याने लढण्याचे करावे. भाऊ आणि विश्वासराव हे अननुभवी होते. त्यांना गर्व चढला होता. त्यामुळे त्यांना योग्य मार्ग दिसत नव्हता. त्यांनी मल्हाररावाचे सांगणे मनावर घेतले नाही. मर्दासारखे लढून मरून जाण्याचे ठरवून ते लढण्यास तयार झाले. उभय दळाच्या आघाडीच्या चकमकी होऊ लागल्या. इस्लामच्या फौजेच्या वीरांनी शत्रूची रसद बंद करून टाकली. मराठ्यांच्या छावणीकडे रसद जात असलेली दिसली की इकडील फौजेचे वीर ती लुटून आपल्या छावणीत आणीत. मराठा सैन्याचे अधिकारी रसद आणणाऱ्या पथकाचे रक्षण करण्याकरिता जात. त्यांना दरखेपेस चांगलीच तंबी घडत असे. पुन्हा त्यांना आपल्या छावणीबाहेर पाऊल टाकण्याची हिंमत होत नसे.

शेवटी शत्रूच्या सैन्यात उपासमार होऊन त्यांच्यात फाक्यावर फाके पडू लागले. जनावरे उपाशी मरू लागली. दाणाचारा मिळेनासा आला. श्रीमंत माणसांना सुद्धा मीठ भाकरी मोठ्या कष्टाने मिळू लागली. गरीब लोक नुसते गम खाऊ लागले आणि क्रोध गिळू लागले. आणि मरावे असा विचार करून मृत्यूची आठवण करू लागले.

इकडच्या फौजेने रसद तोडून शत्रूची दुर्दशा केली खरी पण मराठ्यांची छावणी आणि मोर्चे यांचा बंदोबस्त इतका आटोकाट होता की त्यावर चालून जाण्याचे त्यांना धाडस करवेना. त्यांचा तो (मराठ्यांचा) तोफखाना जंगी होता. त्यांनी तोफा छावणीच्या भोवती निवडक स्थळी उभ्या केल्या होत्या. बंदोबस्त इतका कडक होता की त्यातून पाखरू घुसणे कठीण होते मग स्वार आणि पायदळ शिपायांची काय कथा.

माझे पालक फैजुल्ला आणि नवाब सादुल्लाखान हे रोहिल खंडांत राहून तेथील व्यवस्था आणि अहमदशहाच्या छावणीत असलेले रोहिले सरदार हाफिजरहमतखान व दूंदखान यांची सरबराई करीत होते. उभय दळातील युद्ध जवळ आले आहे हे त्यांनी ऐकले. रोहिलखंडातील व्यवस्था बरी चालली होती. म्हणून ते अहमदशहाला जाऊन मिळावे म्हणून निघाले. वाटेत नवाब सादुल्लाखान हा आजारी पडल्यामुळे हसनपुर येथे थांबला. पण माझे मालक जलदीने कूच करून अहमदशहाच्या छावणीत दाखल झाले. त्यांनी अहमदशहाला नजर गुजरानली. अहमदशहानेही त्यांच्यावर कृपेचा वर्षाव केला.

छावणीत कोंडलेले शत्रू उपासमारीने हैराण झाले. त्यांच्या छावणीत हलकल्लोळ उडाला. उपासमारीमुळे सगळे लोक छावणीतून बाहेर पडून सैरावैरा पळत सुटतात की काय असे वाटू लागले. सरदारांनी सल्ला मसलत केली. त्यांनी पाहिले की असे झाले तर सैन्य उधळून जाईल. त्यापेक्षा उद्या छावणीतून बाहेर पडून लढाई करावी. परमेश्वर काय घडवून आणील ते पाहावे. हेरांनी बातमी आणली की उद्या कल्पांत होईल असे करावे असे शत्रूने ठरविले आहे. अहमदशहाने हुकूम दिला की शत्रूच्या बेताची बातमी प्रत्येक गोटात पोहोचविण्यात यावी. सर्वांनी खबरदारीने राहावे.

दुसऱ्या दिवशी सकाळी शत्रूची पथकेच्या पथके छावणी बाहेर पडू लागली. त्यांच्यापैकी एकाही सरदाराचे वैभव आणि तेज ही वर्णन करू जावे तर रुमालचे रुमाल पुरे पडणार नाहीत. भाऊ, विश्वासराव, मल्हारराव, जनकोजी, शमशेर बहादुर, इब्राहीमखान गार्दी इत्यादी सरदार युद्धभूमीवर पोहोचले. इकडून अहमदशहा, राजपुत्र तैमूर, वजीर शहावलीखान, जहानखान, हाजी करीम दादखान, अताईखान, बर्खुर्दारखान, शाहा पसंदखान व माझे मालक फैजुल्लाखान, नजीखुद्दौला, हाफिज रहमतखान, दूंदेखान, इनायतखान, अब्दुस्सतारखान, सय्यद महमंद मासूम, शेख महमद कबीर, मुल्ला महंमद मुहसिनशहा, शरफखान हे रोहिले सरदार मैदानावर हजर होते. शुजाउद्दौला व अहमदखान बंगश हे आपापली पथके घेऊन रणांगणावर पोहोचले.

लढाईला सुरवात झाली. धन्य परमेश्वराची, लढाईचे दृश्य कुणालाही स्तिमित करून सोडणारे होते. लढाई इतकी निकराची झाली की, प्रतिपक्षांनी बंदुकी, बाण इत्यादि टाकून दिल्या आणि तलवार, भाला, खंजीर, कट्यार इत्यादींनी लढू लागले. यानंतर तर हत्यारे टाकून देऊन उभयदळातील वीर एकमेकाला धरून कुस्त्या खेळू लागले. शत्रूचे पाय टिकू शकले नाहीत पण त्यांनी दाखविलेला त्वेष आणि वीरश्री ही पुराणकाळातील रुस्तुम आणि इस्फंदार या वीरांची आठवण ताजी करून देत होती. त्यांनी जे शौर्य गाजविले त्याचे वर्णन करणे शक्तीच्या बाहेर आहे. पण अहमदशहाला विजय मिळावा हा परमेश्वरी संकेत होता. म्हणून त्यांच्या शौर्याचा आणि शर्थीचा उपयोग झाला नाही.

युद्ध फारच भयंकर झाले. ठिकठिकाणी मृतांचे आणि जखमी लोकांचे ढिगारे जमले. चहूकडून रक्ताचे पाट वाहू लागले. माझे मालक, नजीबुद्दौला, हाफिज रहमतखान, दूंदेखान वगैरे रोहिलखंडाच्या वीरांच्या पराक्रमाने भाऊ, विश्वासराव वगैरे दक्षिणी सरदार हे अकराशे चौऱ्याहत्तर हिज्रीत मारले गेले. इब्राहीमखान गार्दी जखमी होऊन पाडाव झाला होता. अहमदशहाच्या हुकुमाने त्याचा वध करण्यात आला. मल्हारराव हा अनुभवी होता. युद्धातून तो सुरक्षित बाहेर पडला. कोल्ह्याप्रमाणे धूर्तपणा दाखवीत तो काही काळ बादशाही छावणीभोवती फिरून दक्षिणेकडे निघून गेला. परमेश्वराच्या कृपेने विजयसूचक वारे बादशाही फौजेच्या दिशेने वाहू लागले. माझे मालक फैजुल्ला याच्या पराक्रमाने अहमदशहा विजयी होऊन शत्रूचा सर्वनाश झाला. बादशहाच्या आज्ञेने विजयाची शहाजणे वाजू लागली. आश्चर्याची गोष्ट ही की शत्रूपैकी एक विश्वासराव सोडून कुणाचेही प्रेत सापडले नाही. विश्वासराव हा तरुण, देखणा आणि अनुपम असा सुंदर होता. इस्लामच्या सैन्यापैकी सगळे सरदार सुरक्षित राहिले. गनिमांची कोट्यवधी रुपयांची संपत्ती जेत्यांच्या हाती सापडली. प्रत्येक गरीब मनुष्य संपन्न झाला. सरदार, रिसालदार, जमादार आणि दफेदारापैकी काही हत्ती, उंट, घोडे मिळाले नाहीत असा कोणी राहिला नाही. लुटीमुळे प्याद्याचे स्वार बनले, स्वारांचे जमादार बनले. जमादारांचे रिसाल्दार, आणि रिसाल्दारांचे अमीर बनले. कैद केलेल्या स्त्री पुरुष आणि बालकासंबंधी काय लिहू. अद्याप अंगावर कांटा येतो. एके दिवशी एका दुराणीने एक लहान अर्भक माझ्यासमोर आणले. त्याने अगदी कमी किंमतीला, जवळजवळ फुकट म्हणाना, ते मूल मला देऊन टाकले. त्याला सांभाळणे आपल्याला जमणार नाही असे त्याला वाटले. अहमदशहाच्या फौजेत स्वारी आणि सामान नेण्यास उंटांशिवाय दुसरे साधन नव्हते. मग पालखी, रथ, छकडे वगैरे कुठले मिळायला.

युद्धात माणसे, हत्ती, घोडे, उंट आणि बैल इतकी मेली की घारीगिधाडींना अनेक वर्षाचे खाद्य मिळून त्यांना आनंद झाला. शत्रूपैकी काही लाख माणसे होती ती सर्व कुठे नाहीशी झाली? लूट करणारे आमचे शिपाई मराठ्यांच्या छावणीत गेले होते. ते सांगत की एक धान्य सोडले तर मराठ्यांच्या छावणीत इतर सामान भरपूर होते. दुकाने, तंबू,

राहुट्या, बाजार ही सर्व विविध सामग्रीनी भरली होती. जखमी होऊन पडलेल्या शत्रूंच्या लोकांची गाठ पडली तेव्हा ते म्हणाले की धान्याच्या न मिळण्यामुळे आमचे सरदार अस्वस्थ आणि चिंतायुक्त झाले. नाहीतर पुढे काही काळाने लढाई द्यावी असा विचार होता. युद्धसामग्री आणि खजिना याबद्दल त्यांना काही काळजी नव्हती. आमची घोडी दाणा व मिळाल्यामुळे जाया झाली. जी राहिली ती स्वारीयोग्य राहिली नाहीत. आम्ही दक्षिणी घोडेस्वार आहोत, पायउतार होऊन काही होऊ शकत नाही. म्हणून आम्ही अस्वस्थ होऊन जिवावर उदार झालो.

एवढा मोठा विजय मिळवून बादशहाने परमेश्वराची प्रार्थना करून त्याचे आभार मानले.

## काशिराजाची बखर

(काशिराज हा महाराष्ट्रीय गृहस्थ शुजाउद्दौल्याचा कारभारी या नात्याने इ. स. १७६१ मध्ये पानीपतच्या मैदानावर हजर होता. युद्धानंतर एकोणीस वर्षांनी त्याने युद्धाची हकीकत फारसी भाषेत लिहून काढली. या हकीकतीचा इंग्रजी अनुवाद दिल्ली येथील इंग्रज रेसिडेंट जेम्स ब्राउन (१७८२-१७८५) याने करून तो इ. स. १७९९ मध्ये ऐशियाटिक रिसर्चच्या तिसऱ्या खंडात प्रसिद्ध केला. या अनुवादाचे संपादन एच. जी. रॉलिन्सन यांनी मुंबई विद्यापीठाकरिता इ. स. १९२६ मध्ये केले. आपल्या प्रस्तावनेत रॉलिन्सन यांनी मूळ फारसी हस्तलिखित नष्ट झाले आहे असे म्हटले आहे. १७९९ तील इंग्रजी भाषांतराचा मराठी अनुवाद इ. स. १८७७ मध्ये 'लोकहितवादी'नी प्रसिद्ध केला होता.

पण मूळ हस्तलिखिताच्या प्रती लंडन आणि रामपूर येथे आढळल्या. सर जदुनाथ सरकार यांनी लंडन प्रतीवरून सदर ग्रंथाच्या मुख्य भागाचा इंग्रजी अनुवाद करून तो इ. स. १९३४ च्या इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टली या नियकालिकात प्रसिद्ध केला.

मूळ फारसी ग्रंथ अद्यापि प्रकाशित झालेला नाही. रामपूरच्या (उत्तर प्रदेश) रजा ग्रंथालयातून ग्रंथाच्या हस्तलिखिताची एक प्रत करून मागविण्यात आली. त्या फारसी प्रतीवरून मराठी अनुवाद खाली देण्यात येत आहे.)

दख्खनच्या रियासतीच्या मसनदीवर असलेला बाळाराव पंडित प्रधान हा शहाणा, दूरदर्शी आणि भाग्यवान होय अशी त्याची ख्याति हिंदुस्थानातील जनतेत होती. पण त्याचा स्वभाव विलासी होता. हे सुद्धा त्याच्या चातुर्याचे आणि बुद्धिमत्तेचे लक्षण होय असे लोक म्हणत. घरात भांडण तंटे नकोत म्हणून त्याने राज्याचा कुल कारभार आपला चुलतभाऊ सदाशिवराव भाऊ याजकडे दिला होता. आणि तो स्वत: आरामात काळ घालवीत होता. सदाशिवरावभाऊने लहानपणापासूनच रामचंद्र बाबा शेणवी या अप्रतिम मुत्सद्याच्या हाताखाली, मुल्की कामे, आर्थिक प्रकरणे, मुलुखगिरी, फौजफांटा इत्यादि राज्यकारभाराच्या प्रत्येक अंगाचे शिक्षण घेतले होते. सर्व गोष्टीत त्याने प्राविण्य संपादन केले. आपल्या भाग्याने तो सर्वत्र प्रसिद्ध झाला. मध्यरात्रीपर्यंत तो प्रत्येक लहान मोठ्या प्रकरणात लक्ष घालीत असे. प्रत्येक प्रकरणाचा तो एखाद्या पोक्त आणि अनुभवी मुत्सद्याप्रमाणे निकाल लावी. सारेजण एकमुखाने त्याची बुद्धी विलक्षण आहे असे म्हणत.

या काळात उत्तर हिंदुस्थानातील आणि दक्षिणेतील अनेक प्रकरणे त्याच्या हातून तडीस गेली. योगायोगाने उत्तर हिंदुस्थानची मोहीम काढून तिचे आधिपत्य रघुनाथरावाकडे द्यावे असे ठरले. रघुनाथरावांच्या बरोबर मल्हारराव होळकर, जयाजी शिंदे वगैरे सरदार देण्यात आले. त्यांच्याबरोबर प्रचंड सैन्य होते. उत्तर हिंदुस्थानातील सगळी

प्रकरणे निकालात काढून हे सैन्य लाहोर आणि गुजरात शहादूला या भागात पोहोचले. शहा अब्दालीचे सरदार जहानखान आदींचा मराठ्यांच्या हातून दणदणीत पराजय झाला. ते अटक नदी पार करून गेले. मराठ्यांच्या फौजेने अटक नदीपर्यंत त्यांचा पाठलाग केला. आणि त्यांनी त्या भागात आपला काही काळ अंमल बसविला. मोहीम पार पडली. तसा फौजेच्या पगारबाकीचा प्रश्न पुढे आला. रघुनाथराव सल्ला घेऊन परत फिरला आणि दक्षिणेकडे निघून गेला. रघुनाथरावाच्या मोहिमेचे जमाखर्च भाऊने तपासले तो त्यास आढळून आले की खंडणी पेशकश इत्यादीच्या रूपाने जी रक्कम वसूल झाली त्यामानाने अठ्याऐंशी लाख रुपये पगार बाकी आणि इतर कर्ज झाले होते. भाऊ हा रघुनाथरावाहून प्रत्येक बाबतीत श्रेष्ठ होता. त्याने रघुनाथरावाला टोचून म्हटले की हीच का तुमची कार्यकुशलता. आमच्याकरिता कर्ज मात्र करून आलात. रघुनाथरावाने पण उत्तर दिले की या पुढे आपणच मोहिमात लक्ष घालून व्यवस्थित खर्च करावा. या सवालजबाबात बाळाराव मध्ये पडला. रघुनाथराव त्याचा भाऊच होता. त्याचा विचार करून बाळारावाने म्हटले की रघुनाथराव पोर आहे. पुढे त्याला अनुभव येईल.

यानंतर तिसऱ्या वर्षी हिंदुस्थानात मोहीम काढण्याचा मन्सुबा ठरला. त्या संबंधी रघुनाथरावास विचारण्यात आले. पण त्याने नकार देऊन म्हटले की ते दौलतीचे हितचिंतक आणि व्यवस्थित जमाखर्च करणारे आहेत. त्यांच्याकडे मोहीम द्या. रघुनाथरावाचे बोलणे भाऊस लागले. अनेक दृष्टीनी विचार करून ती मोहीम आपल्या अंगावर घेण्याचे त्याने कबूल केले. पूर्वापार पद्धतीप्रमाणे बाळारावाचा सतरा वर्षाचा मुलगा विश्वासराव यास सरदार करून त्याने बरोबर घेतले. आणि प्रचंड सैन्य बरोबर घेऊन चालत असलेल्या पद्धतीस सोडून आपले नवीनच कायदे कानू चालवू लागला. मुलकी प्रकरणात, आमिलांचे जमाखर्चाचे हिशेब तपासण्यात तो आपल्या मनासारखे आणि कडकपणे वागू लागला. मल्हारराव वगैरे सरदार उत्तर हिंदुस्थानातील व्यवहारात अनुभव घेतलेले होते. तिकडील राजेरजवाड्यांशी त्यांची घसट होती. त्यांची सल्लामसलत न घेता तो आपल्याच पद्धतीने वागू लागला.

असे होत होत भाऊ सिरोंज प्रांतांत येऊन पोहोचला. तेथून त्याने हिंदुस्थानातील सरदारांपाशी वकील पाठविले. राजेरजवाडे, अमीरउमराव यापैकी प्रत्येकाला त्याने मूल्यवान भेटी पाठविल्या. आणि त्यांना पत्रे लिहिली की तुम्ही आम्हाला येऊन मिळावे. म्हणजे एकत्र येऊन आपण हिंदुस्थानची प्रकरणे निकालात काढू. एक वकील शुजाउद्दौल्यापाशी आला. त्याने मूल्यवान वस्त्रे आणि रत्नजडित अलंकार भेटीदाखल आणले. त्याने भाऊचा वरील निरोप आणिला. आणि शुजाउद्दौल्ल्यास सांगितले की भाऊजवळ येताच ते तुम्हाला आणण्याकरिता नारोशंकर यास पाठवतील.

शुजाउद्दौल्याने वरील निरोपाला व्यवहाराला धरून जे उत्तर होते ते दिले. पण त्याने आपल्या मनाशी ठरविले की उभयपक्षात काय घडते ते पाहात आपण वेगळे राहावे. ज्या पक्षाला जय मिळण्याचा रंग दिसेल त्याला जाऊन मिळता येईल, मग तो पक्ष कोणता का असेना.

दत्ताजी पटेलवर जय मिळविल्यानंतर अहमदशहा अब्दालीने अनूपशहर भागात गंगेच्याकाठी दुआबात छावणी केली होती दत्ताजी पाटील हा नजीबुदौल्याच्यामुळे युद्धात मारला गेला होता. पुढे काय होईल या भीतीने नजीबुदौला अहमदशहा दुराणीला मिळाला होता. सरदार जहानखानाच्या पराजयाच्या पराजयाचा सूड घ्यावा असे अहमदशहानेही ठरविले होते. पण तो हिंदुस्थानात येण्याचे मुख्य कारण म्हणजे नजीबुदौल्याने त्याला बोलाविले हेच होय. अहमदशहाच्या पावसाळी छावणीसाठी आणि इतर व्यवस्थेकरिता लागणारी रक्कम नजीबुदौल्याने अहमदशहापाशी पाठविली. नजीबुदौला हा युद्धात आणि राजकारणात पूर्णपण मुरलेला होता. सगळे रोहिले सरदार

आणि फरुखाबादेचे अफगाण हे नजीबुदौल्याच्या सल्ला मसलतीने आणि स्वजातीच्या अभिमानाने शहा दुराणीला मिळाले.

सदाशिव भाऊची स्वत:ची फौज होती. याशिवाय त्याने नारोशंकर वगैरे माळव्यातील आणि झाशी प्रांतातील अधिकारी होते त्यांच्या फौजाही बरोबर घेतल्या. तो चंबळ नदीच्या काठावर पोहोचला. तेथून त्याने राजा सूरजमलला येऊन भेटण्यासंबधी निरोप पाठविला. सूरजमलने उत्तर दिले की नेहमी राव मल्हार आणि शिंदे यांच्या मार्फतीने आमचे जाबसाल होत. त्यांना मध्ये घालावे म्हणजे मी हजर होईन. असे करणे जरूर आहे हे पाहून भाऊने शिंदे होळकरांच्या मध्यस्थीने सूरजमल बरोबर कौल करार केला. त्यानंतर ता चंबळ ओलांडून अकबराबाद आग्र्याजवळ पोहोचला. तेथे राजा सूरजमल जाट हा येऊन त्याला भेटला. उभयतात सल्ला मसलत झाली. सूरजमलने म्हटले. ''तुम्ही सगळ्या हिंदुस्थानचे स्वामी आहात. आणि मी एक जमीनदार आहे. माझ्या योग्यतेप्रमाणे मी म्हणेन की तुमची युद्धसामग्री, बाजारबुणगे, जाडजूड तोफांचा कारखाना ही या युद्धात उपयोगी पडणार नाहीत. हिंदुस्थानातील लोकांत तुम्ही सर्वांपेक्षा तडफदार आहात. पण प्रतिस्पर्धी तुमच्यापेक्षाही जास्त तडफदार आहे. म्हणून माझा सल्ला असा आहे की तुम्ही सड्या सैन्याने शत्रूवर चालून जावे. आणि तुमचे जड सामान चंबळ नदीच्या पलीकडे तुमच्या ताब्यात असलेल्या झांशी किंवा ग्वालियर या ठिकाणी ठेवावे.

दुसरा सल्ला असा की माझ्या पाशी दीग आणि इतर असे चार किल्ले आहेत. या पैकी तुम्हाला जो किल्ला पसंत पडेल तो मी रिकामा करून देईन. त्यात तुम्ही आपले कबीले आणि जाड सामान ठेवा. मी तुमची सोय करण्यास तयार आहे. यात चांगली गोष्ट ती ही की आपला मुलूख पाठीशी राहील. आणि रसदेची काळजी राहाणार नाही. आणि तुम्ही कोणत्याही प्रकारची काळजी न करता शत्रूशी मुकाबला करू शकाल. शत्रूच बहुतेक चाल करून येणार नाही. मोहिमेचा हा रंग पाहून शत्रू जागच्याजागी बसून राहील.''

मल्हारराव वगैरे सरदारांना हा सल्ला पटला. ते म्हणाले ''तोफखाना घेऊन युद्ध करणे ही बादशाही पद्धत झाली. आम्ही मराठे गनिमी काव्याने लढणारे आहोत. आपल्या पद्धतीने लढणे बरे, हा मुलूख म्हणजे काही आमचा मिराशी मुलूख नव्हे. येथे आम्हाला पुढे जाता आले नाही तर पाय मागे घेण्यात काही नामुष्की नाही. सूरजमलचा सल्ला योग्य आहे. त्यायोगे शत्रू आपण होऊनच माघार येईल. तो सध्या या देशात आहे. तो कसा तरी काळ काढील. पावसाळाही आता जवळ आला आहे. या वेळी तो निघून जाणार नाही. पण नंतर मात्र तो आपण होऊन आपल्या मुलुखाकडे निघून जाईल.''

सगळ्या सरदारांनी एकमुखाने हा सल्ला दिला. भाऊला आपल्या सैन्याचा आणि पराक्रमाचा गर्व होता. त्याने तो सल्ला मानला नाही. तो म्हणाला, ''आमच्या सेवकांनी या प्रांतांत मोठी कामे केली आहेत. हेतु हा की हा मुलूख मिळवावा. आम्ही काही निष्क्रिय म्हणून लोकात प्रसिद्ध होऊ इच्छीत नाही. मल्हारराव म्हातारा झाला आहे. त्याची बुद्धी नष्ट झाली आहे. सूरजमल आपल्या योग्यतेप्रमाणे बोलला. त्याची हुशारी ती किती. आम्ही त्याच्या सल्ल्याप्रमाणे काय म्हणून वागावे.''

अशा प्रकारे भाऊ कडकपणे बोलला. भाऊच्या अशा बोलण्यावरून अनुभवी आणि पोक्त माणसांनी ओळखले की दुर्दैवच ओढवले आहे म्हणून भाऊ शहाणा आणि दूरदर्शी असूनही चांगला सल्ला ऐकत नाही. त्याच्या कठोर बोलण्याने प्रत्येक सरदार दिलगीर आणि कष्टी झाला. त्यांनी मनाशी विचार केला की या ब्राह्मणाला जय न मिळणे हेच बरे. नाहीतर आमची कदर ती काय राहाणार?

भाऊने राजा सूरजमलच्या बडदास्तीकरिता फौज नेमून दिली. यामुळे राजा सूरजमलला चिंता उत्पन्न झाली. मल्हारराव वगैरे सरदार त्याला म्हणाले, ''घाई उपयोगाची नाही. योग्य वेळी जे करायचे ते करा. तूर्त भाऊच्या मर्जीस अनुसरून राहाणे योग्य होय.''

या नंतर भाऊ अकबराबाहेहून (आग्रा) कूच करून शहाजहानाबादेस पोहोचला. अहमदशहाचा वजीर शहावलीखान याचा नात्याने चुलत भाऊ असलेला याकूब अलीखान हा बादशाही किल्ल्यात होता. भाऊने एकदम किल्ल्याला वेढा घातला आणि किल्ला खाली करून द्या म्हणून सांगून पाठविले. आपापसात काही काळ गोळागोळी झाली. शेवटी याकूब अलीखानाला आपण टिकू शकू असे वाटेना. त्याने शहावलीखानाचा सल्ला घेतला. आणि सरदारांच्या मार्फतीने बोलणी लावून तो किल्ल्याच्या बाहेर पडला. भाऊ आणि विश्वासराव हे किल्ल्यात दाखल झाले. बऱ्याच बादशाही वस्तू त्यांनी आपल्या ताब्यात घेतल्या. दिवाणेखासचे छत चांदीचे होते ते त्यांनी तोडले. आणि त्याची नाणी पाडली. भाऊने अशाच इतर काही गोष्टी केल्या. लोक बोलू लागले की भाऊचा हेतु असा दिसतो की हिंदुस्थानातील काही सरदार आणि नवाब यांना काढून टाकावे. आणि अहमदशहा राहाणार नाही. मग विश्वास रावाला दिल्लीच्या तक्तावर बसवावे. या गोष्टी तोंडी आणि वकीलांच्या पत्रव्यवहाराने शुजाउद्दौल्यापर्यंत पोहोचल्या होत्या. त्याप्रमाणे येथे लिहिल्या आहेत.

नंतर पावसाळा सुरू झाला. भाऊने शहाजहानाबादेत छावणी केली. तो स्वत: किल्ल्यात राहिला. त्याचे सैन्य बारा कोसपर्यंत ठिकठिकाणी पसरले होते. इकडे अहमदशहाची छावणी अनूपशहरजवळ गंगेच्या काठावर होती. नजीबुद्दौल्याला चहूकडची बातमी मिळत असे. त्याने सगळी हकीकत शहा दुराणीला कळविली. शहा दुराणी म्हणाला की शुजाउद्दौल्याला सर्वप्रकारे समाधान करून इकडे आणणे योग्य होय. असे न होवो की तो दुसऱ्या पक्षाला जाऊन मिळाला. त्याने आपल्या बरोबर मोठे सैन्य आणले काय किंवा लहान आणले काय त्याच्यावर काही अवलंबून नाही. तो कदाचित अनुकूल राहणार नाही. माझ्या हिंदुस्थानावरील सुरुवातीच्या मोहिमेत त्याचा बाप सफदरजंग आणि मी यांच्यात काही घटना घडल्या होत्या. त्यात माझे पाय टिकले नाहीत. याची जाणीवही शुजाउद्दौल्याला असून याची त्याला काळजी लागली आहे. तू स्वत: जाऊन शुजाउद्दौल्याचे समाधान करून माझ्यापाशी घेऊन ये. हे काम पव्यवहाराने किंवा वकील पाठवून होणारे नाही. तू स्वत: तडक जाऊन शुजाउद्दौल्याला वजीरशहावलीखान याने कौलकरार करून, त्याचे शिक्कामोर्तब करून कुराणाच्या प्रतीबरोबर शुजाउद्दौल्याने देण्याकरिता नजीबुद्दौल्ल्यापाशी दिल्या. नजीबखानाने आपल्याबरोबर दोन तीन हजारांचे सैन्य घेतले आणि तो तीन चार दिवसात मेहदी घाटापाशी गंगेवर पोहोचला. शुजाउद्दौल्याने सगळ्या गोष्टीला जागरूक राहाण्याच्या आणि सुरक्षिततेच्या दृष्टिने गंगेवर आपली छावणी ठेवली होती. गंगेच्या पतीकडील तीरावर नजीबुद्दौला एकाएकी आलेला पाहून शुजाउद्दौल्याने निरुपाय होऊन त्याची भेट घेतली. आणि त्याचा पाहुणचार केला. नजीबुद्दौल्याने शहा दुरण्णी आणि शहावलीखान यांनी लिहिलेली पत्रे आणि करारमार शुजाउद्दौल्यापाशी दिली, आणि आपल्यातर्फे आणि शहा दुराणीच्या तर्फे समाधानाच्या गोष्टी सांगितल्या आणि जगात नेहमी कधी वर तर खाली असा अनुभव कसा येतो हे त्याला सांगितले. आणि म्हटले ''मी तर स्वत:ची आशा जवळ जवळ सोडली आहे. कारण भाऊ हा माझा शत्रू आहे. पण तुम्ही स्वत:च्या बचावाची काळजी घेणे आवश्यक आहे. तुम्ही एखाद्या पक्षाशी संघटण ठेवावे. भाऊ हा मुसलमानांचा मन:पूर्वक द्वेष करतो. त्याला शक्य झाले तर तो तुम्हाला काय आणि आम्हाला काय, कुणालाच सोडणार नाही. नशीबात जे व्हावयाचे ते होईल हे जरी खरे असले तरी आपल्याला शक्तीप्रमाणे हात पाय हलविणे

हेच योग्य होय. केवळ स्नेहभावाने मी येथपर्यंत आलो आहे. तुम्हाला जे योग्य होईल असे वाटते ते करा.''

अशा प्रकारे त्यांचे संभाषण चार दिवसपर्यंत चालू होते. शेवटी शुजाउद्दौल्याने विचार केला की एकीकडे मराठ्यांशी आपले संबंध आहेत. अब्दालीचा पक्ष सोडून देण्यातही शहाणपणा आणि दूर दृष्टी दिसून येत नाही. नजीबुद्दौला हा स्वत: येथे आला आहे. तो निराश होऊन येथून गेला तर शहाची नामुष्की झाल्यासारखे होईल. उलट मराठ्यांचे आणि आपले निकटचे संबंध आहेत. मराठ्यांचा जय झाला काय किंवा दुराणीचा झाला काय काळजीची परिस्थिती निर्माण होईलच.

पूर्ण विचार करून आणि नजीबुद्दौल्याचा मान राखून शुजाउद्दौल्याने शहा दुराणीकडे जाण्याचा निश्चय केला. त्याने बेगमांना लखनौला रवाना केले. बेणी बहादुर यास आपल्या तर्फे राज्यावर नायब म्हणून नेमले. नंतर त्याने नजीबुद्दौल्याला घेऊन कूच केले. अनूपशहर जवळ तो अहमदशहाला भेटला. अहमदशहाने त्याचा सत्कार केला. आणि त्याला म्हटले ''मी तुला आपला मुलगा मानतो. तुझीच वाट पाहात होतो. आता पहा मराठ्यांचा धुव्वा कसा उडवितो ते.'' अहमदशहाने शुजाउद्दौल्यावर कृपेची वृष्टी केली. त्याने आपल्या फौजेत आज्ञा जाहीर केली की शुजाउद्दौल्याच्या फौजेशी कोणीही भांडण करू नये. कोणी असे करील तर त्याचा वध करण्यात येईल. हा ईराणी मोगल सफदर जंगाचा मुलगा शुजाउद्दौला हा आमच्या घराण्याचा खास पाहुणा आहे आणि मला आपल्या मुलापेक्षाही अधिक प्रिय आहे. वजीर शहावलीखान हा सत्तर वर्षे वयाचा अत्यंत अनुभवी इसम होता. तो शुजाउद्दौल्याला आपला मुलगा म्हणे. त्यानेही शुजाउद्दौल्याचा बहुत आदरसत्कार केला. शुजाउद्दौल्याच्या छावणीत काही दुराणी शिपायांनी दांडगाई केली त्याबद्दल अहमदशहाने दोनशे शिपायांना शिक्षा केली. यानंतर कुणालाही दांडगाई करण्याची हिंमत झाली नाही.

ऐन पावसाळ्यात अहमदशहाने कूच केले. दिल्लीच्या लाल किल्ल्याच्या समोर नदीच्या अलीकडील तीरावर त्याने छावणी केली. मराठ्यांची फौज नदीच्या पलीकडे होती. पावसाळ्याचे दिवस आणि नदीला पूर आलेला. उभय दळापैकी कुणालाही नदीपार करणे शक्य झाले नाही.

भवानीशंकर हा औरंगाबादचा राहाणारा असून बुद्धिमान आणि चतुर होता. सदाशिव भाऊने त्याच्याबरोबर पत्र देऊन त्याला शुजाउद्दौल्याकडे पाठविले. त्यात त्याने लिहिले की तुमच्या आणि आमच्या घराण्यात स्नेह चालत आला आहे. आमच्या सरदारांनी तुमच्या वडिलांना मदत केली आहे. तुम्ही प्रस्तुत प्रसंगी त्यांच्यांत का जाऊन मिळाला आहात. आम्ही तुम्हाला कोणत्याही प्रकारे तसदी देऊ इच्छीत नाही. काही करा पण त्या पक्षाला मिळू नका. जर हे जमत नसेल आणि त्यांच्यापासून वेगळे राहाणे शक्य होत नसेल तर कुणाला तरी आमच्याकडे बोलणी करण्यासाठी पाठवा. दिल्लीचा रहिवाशी लाला संताराम याचा मुलगा राजा देवीदत्त हा उत्तम भाषण करणारा होता. त्याला शुजाउद्दौल्याने भवानीशंकर बरोबर भाऊकडे पाठविले. मी काशिराज नेहमी मरहूम नबाबांच्या म्हणजे शुजाउद्दौल्याच्या हुजुरात असे. माझ्यावर त्यांची कृपा असे. त्यांनी स्वत: भवानीशंकर पंडित यास सांगितले की हे (मी, काशिराज) पण दक्षिणचे आहेत. शुजाउद्दौल्याच्या समोरच माझी आणि भवानीशंकरची भेट झाली आणि आम्ही दोघेही एका जातीचे आणि एकाच गावाचे रहिवाशी आहोत हे आम्हाला समजले. मी शुजाउद्दौल्याच्या पदरी आहे ही हकीकत भवानीशंकराने सदाशिवभाऊस सांगितली. भाऊने माझ्याकरिता मराठीत पत्र पाठविले होते. पत्राचा मायना बरोबर नव्हता. म्हणून मी त्याचे उत्तर धाडले नाही. भाऊने भवानीशंकराला विचारले की अमक्याअमक्याने उत्तर का धाडले नाही. भवानीशंकराने सांगितले की मुन्शीने पत्र व्यवस्थित लिहिले नव्हते. यावर

भाऊ मुन्शीवर रागावला. आणि व्यवस्थित लिहिण्याबद्दल त्याला ताकीद दिली.

राजा देवीदत्त याने भाऊपाशी पुष्कळ बोलणी केली पण त्याने भाऊचे समाधान झाले नाही. त्याने भवानीशंकराबरोबर सांगून पाठविले की देवीदत्त हा क्षुद्रवृत्तीचा माणूस आहे. तुमच्या आणि माझ्या विश्वासास हा योग्य नाही. तुमचा कोणी खास मुत्सद्दी पाठवा. आणि या पुढे तुमचा काय सल्ला आहे हे त्याच्या मार्फतीने कळवा.

त्यावेळी मल्हारराव आणि सूरजमल यांच्याकडून शुजाउद्दौल्याला अशाच अर्थांची पत्रे आली.

शुजाउद्दौल्याने सगळी हकीकत जशीच्या तशी नजीबुद्दौला आणि वजीर शहावलीखान यास सांगितली. त्यांच्या सल्ल्याप्रमाणे त्याने मराठा सरदारांशी बोलणी केली. नजीबुद्दौल्यांने बोलणी मोडावी याबाबत सर्व उपाय केले. पण शहावलीखान म्हणाला "तुमच्या मार्फतीने तह होत असेल तर उत्तम. मी कबूल आहे आणि बादशहाची संमत्ति मिळविण्याची जबाबदारी मी घेतो." सारांश शहावलीखान हा थोडासा नजीबुद्दौल्याच्या विरुद्ध होता.

शेवटी आपसात सल्ला मसलत करून त्यांनी महमद याकूतखान नावाचा खोजा हुशार आणि धोरणी होता त्याला भाऊकडे पाठविले. शुजाउद्दौल्याकडून म्हणून खालील निरोप भाऊकडे धाडण्यात आला. "खरोखरीच तुमच्या आणि आमच्या घराण्यात पूर्वापार स्नेह चालत आला आहे. आता माझे येणे या स्थळी झाले आहे. परवान वाचून मी येथून निघू शकत नाही. आणि तसे करणे योग्य पण नाही. तरी पण मी स्नेहभावास अनुसरून सल्लामसलत आणि माहिती देण्यात कसूर करणार नाही. तुम्ही माझा सल्ला विचारीत आहात तर मी म्हणेन की तुम्ही उत्तर हिंदुस्थानातील राजे आणि नबाब यांच्या पद्धतीने लढू नका. तुमच्या गनिमी काव्याच्या पद्धतीने लढा. तोफखाना आणि जड सामान एके ठिकाणी पाठवून द्या. आणि तुम्हाला तह हवा असेल तर त्याप्रमाणे पावले टाकण्यात येतील."

सूरजमलला त्या लोकांनी सांगून पाठविले ते असे "तुम्ही जमीनदार आहात. या संकटात स्वत:ला पाडून घेण्याची जरूर काय? जमेल त्या मार्गांनी आपल्या स्वस्थळी निघून जा कसे." सूरजमलला तसेच वाटत होते. त्याने लिहून कळविले की तुमचा सेवक आहे. तुम्ही सांगता तसे वागेन.

भाऊने उत्तरात लिहिले की आपण हे काय लिहिलेत. जशी मसलत आम्हाला योग्य वाटेल तशी आम्ही करू. शहा दुराणीत आणि आमच्यात कलह असण्याचे कारण नाही. बादशहानी आपल्या देशी जावे. अटकेपलीकडे त्यांचा अंमल राहील. अटकेअलीकडे हिंदुस्थानी सरदार राहतील आणि मुलुखाची व्यवस्था काय करायची ते आपसात ठरवितील. हे कबूल नसेल तर लाहोरपर्यंत अहमदशहाचा अंमल रहावा. त्याच्या अलीकडे आमचा राहील. अगदी शेवटचे म्हणून भाऊने सांगितले ते हे की सिरहिंदपर्यंत अहमदशहाचा अंमल राहावा आणि त्याच्या अलीकडे हिंदुस्थानी सरदारांची हुकमत राहील.

यानंतर याकूतखान निरोप घेऊन परत आला.

सूरजमल, मल्हारराव इत्यादी सरदारांचा तळ दिल्लीपासून सहा कोसावर बदरपूर येथे होता. दुसऱ्या दिवशी मल्हारराव वगैरे सरदारांच्या इषाऱ्याने सूरजमलने उठविले की आपण येथून जवळच कूच करून छावणी करणार आहोत. त्याने आपले बाजारबुणगे आणि इतर सामान आपल्या ताब्यातील किल्ल्याकडे पाठविले. ते सामान बारा कोसावर जाऊन पोहोचले आहे याची खात्री करून घेतल्यावर सूरजमल स्वत: स्वार होऊन आपल्या किल्ल्याकडे निघून गेला. भाऊला बातमी कळली तोपर्यंत सूरजमल दूर निघून गेला होता. एक रात्र आणि एक दिवस या अवधीत तो पन्नास कोसांची मजल मारून आपल्या किल्ल्यात दाखल झाला. भाऊला बातमी कळली. त्याने पर्वा केली

नाही. उलट तो म्हणाला, ''एक जमीनदार निघून गेल्याने काय होणार. विजय मिळाल्यावर पाहून घेऊ.''

याकूतखान दुराणीच्या फौजेत परत आला. त्याने सगळी हकीकत सांगितली. त्याला मार्गदर्शन करण्यात आले नाही. त्यामुळे उभय पक्षातील बोलणी रेंगाळू लागली.

आता पावसाळा संपू लागला होता. भाऊने दिल्लीहून कुंजपुऱ्याकडे कूच केले. कुंजपुरा दिल्लीपासून पन्नास कोसांवर असून यमुनेच्या काठावर आहे. तिथे सिरहिंद वगैरे भागातून आलेले दुराणीच्या सैन्यातील वीस तीस हजार अफगाण रोहिले इत्यादि गोळा झाले होते. भाऊने कुंजपुरा उध्वस्त केला. अफगाण रोहिल्यापैकी अनेक लोक मारले गेले. समदखान, कुतुबखान वगैरे प्रसिद्ध अफगाण सरदार कैद होऊन मारले गेले. भाऊने कुंजपुऱ्याचा किल्ला हल्ला करून घेतला. आणि दलेलखान वगैरे सरदार पाडाव होऊन मारले गेले. नदीला पूर असल्यामुळे शहा दुराणीकडून काही मदत होऊ शकली नाही. अहमदशहाला कुंजपुऱ्याची हकीकत कळली तेव्हा तो अतिशय अस्वस्थ झाला.

दसऱ्याच्या एक दिवस अगोदर त्याने आपल्या सैन्याची रचना केली, दसऱ्याच्या दिवशी त्याने एक उंच जागेवर थांबून प्रथम स्वत:च्या फौजेची पाहाणी केली. सैन्याचे चोवीस दस्ते (पथके) मोजण्यात आले. प्रत्येक दस्त्यात बाराशे स्वार असत. बादशाही सैन्यातील प्रमुख सरदारांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

मुख्य वजीर शहावलीखान, सरदार जहानखान, शहापसंदखान, नसीरखान बलोच, बरखुर्दारखान, वजीरुल्लाखान किजलबाश, मुरादजान मोगल. याशिवाय अनेक लहानमोठे सरदार होते.

वरील चोवीस दस्त्यापैकी सहादस्ते बादशहाच्या गुलामांचे होते. बादशहाच्या तळाभोवती चोहीकडे अर्ध्या कोसाच्या अंतरावर या पल्टणीचे तळ असत. त्यांच्या भोवती सरदारांचे तळ असत.

दोन हजार उंट जंबूरक (लहान तोफा) वाहून नेणारे होते. प्रत्येक उंटावर दोन जंबूरची असत. चाळीस तोफा आणि काही शुतरनाळे फौजेंत होते. हे सर्व अहमदशहाचे स्वत:चे सैन्य होते. शुजाउद्दौल्याबरोबर दोन हजार पायदळ आणि दोन हजार स्वार आणि वीस लहानमोठ्या तोफा होत्या. नजीबुद्दौल्याबरोबर सहा हजार स्वार आणि आठ हजार पायदळ होते. आणि बरीच युद्ध सामग्री होती. दूंदेखान व हाफिज रहमतखान यांच्याबरोबर पंधरा हजार पायदळ आणि तीन चार हजार स्वार आणि काही तोफा होत्या. फरुखाबादेचा अहमदखान बंगश याजपाशी दोन हजार स्वार आणि पायदळ आणि काही तोफा होत्या. म्हणजे अफगाणांकडे एकंदर सैन्य पंचेचाळीस हजार स्वार आणि तीस हजार पायदळ असे होते. यापैकी तीस हजार स्वार आणि दोनहजार काबुली शेरबच्चा जंबूरक स्वार बादशहाचे स्वत:चे होते. सरकारी दप्तरखान्याच्या अधिकाऱ्यांकडून चौकशी करून ही माहिती गोळा करण्यात आली आहे. याशिवाय सरकारी कोठारातून रसदेचा पुरवठा करणारे यांच्याकडून हीच माहिती मिळाली.

याशिवाय यतीम शिपाई असंख्य होते. प्रत्येक दुराणी स्वाराबरोबर दोन दोन चार चार यतीम (दुसरा कोणताच आधार नसलेले अनुचर) असत. त्यांचे घोडे आणि इतर सामान इतर दुराणी शिपायांच्याप्रमाणे असे. हे यतीम स्वार शूर, व मजबूत होते. त्यांचे घोडे चपळ आणि मजला मारण्यात निष्णात असत. लढाईत प्रथम दुराणीस्वार हल्ला करीत. नंतर हे यतीम स्वार शत्रूवर तुटून पडत. आणि लुटालूट आणि हाणमार करून शत्रूचा निकाल लावीत. पण खरे बादशाही सैन्य वर लिहिल्याप्रमाणे होते.

फौजेची पाहाणी केल्यानंतर दुराणीने आज्ञा केली की सैन्याने तयार राहावे. उद्या येथून कूच करणे आहे.

तिकडे भाऊला खबर लागली की दुराणी शहाने आपल्या फौजेची पाहाणी केली आहे. त्यानेही कुंजपुरा फत्ते झाल्यावर आपल्या सैन्याची चाचणी केली. मराठ्यांच्या फौजेच्या तपशील असा -

इब्राहीमखान गार्दी दोन हजार स्वार आणि नऊ हजार गार्दी पायदळ दोनळी बंदुकींनी युक्त आणि चाळीस तोफा.

हुजरातीचे पथक सहा हजार स्वार, मल्हारराव होळकर पाच हजार स्वार, जनकोजी शिंदे दहा हजार स्वार, दमाजी गायकवाड तीन हजार स्वार, यशवंतराव पवार दोन हजार स्वार, शमशेर बहादुर तीन हजार स्वार, पिलाजी जाधवाचा मुलगा तीन हजार स्वार, विठ्ठल शिवदेव तीन हजार स्वार, भाऊचा मेहुणा आणि कारभारी बळवंतराव, सात हजार स्वार, विश्वासराव खास पागा पाच हजार स्वार, अंताजी माणकेश्वर दोन हजार स्वार, इतर पथके कुठपर्यंत म्हणून आठवावीत. एकंदरीत पंचावन्न हजार तडफदार स्वार, आणि पंधरा हजार पायदळ (गार्दी धरून), दोनशे तोफा, आणि बाण, शुतर नाळे आणि इतर युद्धसामग्री अगणित होती. शिवाय चहूकडे फिरून हूल उठविणारे आणि लूटमार करणारे असे जवळ जवळ वीस हजार स्वार शिपाई होते. याशिवाय राठोड आणि कछवाहा राजांच्या वकीलांबरोबर दोन तीन हजार स्वार होते. नारोशंकराकडे दिल्लीचा बंदोबस्त देण्यात आला होता त्याच्याबरोबर पाच सहा हजार स्वार देण्यात आले होते. सदाशिवभाऊने जणू काय सारे दख्खन आणले होते. त्याच्याबरोबर वरीलप्रमाणे सैन्य होते.

शहा दुराणीने दसऱ्याच्या दिवशी शहादरा येथे डेरे दिले. नंतरचा दिवस म्हणजे रबिलावल महिन्याची दहा तारीख होती. त्या दिवशी भोजन करून अहमद शहा स्वार झाला आणि त्याने फौजेला कूच करण्याची आज्ञा केली. बाजार बुणगे मागाहून यावे अशी आज्ञा झाली. स्वत: अहमदशहा रातोरात मजल मारून यमुनेच्या काठावर बागपत येथे पोहोचला. बागपत हे दिल्लीपासून सोळा कोसावर आहे. तेथे त्याने तळ दिला. दुसऱ्या दिवशी त्याने नदीच्या अगदी काठावर एक लहानसा तंबू दिला. तेथे राहून त्याने नदीला उतार सापडतो की काय याचा शोध घेण्यास सुरुवात केली. बरेच लोक पाण्यात उतरले होते ते बुडाले अहमदशहाने दोन दिवस पर्यंत उपास आणि अनुष्ठाने केली. कुराणाचे मंत्र कागदावर लिहून ते पाण्यात टाकले. तिसऱ्या दिवशी नदीला एकाएकी उतार सापडला. पण ती वाट अरुंद होती. इतकी की जरा कोणी इकडे तिकडे भटकला की बुडून जाई.

रबिलावलच्या पंधरा तारखेपासून सैन्याने नदी पार करण्यास सुरवात केली. अर्धी फौज ओलांडून गेल्यानंतर काहीसे घाई मुळे आणि काहीसे असंख्य सैन्याच्या गर्दीमुळे कित्येक लोक बुडून मेले. १७ रबिलावलला नदी पार झाल्यावर मराठ्यांची हरावल (अघाडी) ची पथके दृष्टिपथात आली. इकडूनही सैन्य पुढे झाले, दोन्ही दलात युद्ध झाले. उभय पक्षाची जवळ जवळ दोन हजार माणसे मारली केली. संध्याकाळच्या सुमारास मराठ्यांची फौज मागे हटली. बादशाही फौज छावणीकडे परत आली. दुसऱ्या दिवशी अहमदशहाने पुढे कूच केले. रोज अघाडीच्या पथकांच्या चकमकी होत आणि दक्षिणी मागे हटत. असे होत होत अहमदशहा पानीपतपर्यंत पोहोचला. सदाशिव भाऊने पानीपत गाव मध्ये घेऊन आपली छावणी केली. छावणी भोवती त्याने वीस गज रुंद आणि हत्ती एवढा खोल खंद्क खणला. त्याने ठिकठिकाणी तोफा चढविल्या.

तेथून तीन चार कोसावर शहा दुराणीने आपला तळ दिला. प्रत्येक मुक्कामाला दुराणी फौजेची साधी छावणी असे. छावणी भोवती जंगलातील मिळतील ती लाकडे आणून रोवीत. पण आता अहमदशहाने आपला तळच ठोकला त्यामुळे छावणी मोठीच तयार करण्यात आली. बादशहाच्या डाव्या बाजूस शुजाउद्दौल्याचे डेरे होते. त्याच्या डावीकडे नजीबुद्दौल्याचे डेरे होते. उजवीकडे हाफिज रहमत, दूंदेखान, अहमदखान बंगश इत्यादी तळ होते. एकंदर तळ साडेतीन कोसांचा होता.

गोविंद पंडिताकडे इटावा, शिकोहाबाद आणि अंतर्वेदीतील मुलूख होता. याशिवाय काल्पीपासून सागरपर्यंतचा मुलूख त्याच्या रास्त अंमलाखाली होता. त्याला सदाशिव भाऊने आज्ञा केली होती की तुम्ही आपले आणि इतर जमेल ते सैन्य घेऊन शहा दुराणीच्या पिछाडीवर यावे आणि अहमदशहाची रसद तोडावी. त्याप्रमाणे गोविंदपंताने बारा हजार स्वार घेतले. तो दिल्लीच्या बाहेर पडला. त्याने नदी ओलांडून मीरठ पर्यंतचा मुलूख उध्वस्त केला. यामुळे अहमदशहाच्या छावणीत रसदेची इतकी टंचाई की धान्याची धारण दोन रुपायाला एक शेर अशी झाली. दोन दिवसापर्यंत अशी परिस्थिती होती. अहमदशहाने शहावलीखानचा चुलत भाऊ अताईखान याला दोन हजार स्वार बरोबर घेऊन गोविंदपंतावर ताबडतोब चाल करून जाण्याची आज्ञा केली. अताईखानाच्या दस्त्याच्या बरोबर दहा हजार यतीम शिपाई पण लुटीच्या आशेने त्याच्याबरोबर दिघाले. अताईखान वाटेत कोठेही न थांबता भल्या पहाटे गोविंदपंतावर तुटून पडला. मराठ्यांची फौज उधळून गेली. अनेक मारले गेले आणि कित्येक जखमी झाले. धावपळीत तो घोड्यावरून खाली आला, आणि दुराणीच्या हाती सापडला. त्याचे डोके कापण्यात आले. आणि मग समजले की तो गोविंदपंत होता. सारांश मराठ्यांची फौज गारत झाली. चवथ्या दिवशी अताईखान हा गोविंदपंतांचे शिर आणि शत्रूंची लूट घेऊन अहमदशहापाशी आला. अहमदशहाने त्याची तारीफ करून त्याच्यावर कृपेची वृष्टी केली. ही बातमी ऐकून सदाशिवभाऊ हा अत्यंत कष्टी आणि अस्वस्थ झाला. याशिवाय दोन ठिकाणाहून त्याला दुर्घटनेचे वृत्त कळले. पण तो शूर आणि हिंमतवान होता. त्याने या गोष्टीची पर्वा केली नाही.

दुर्घटना घडली ती ही की भाऊने दिल्लीहून खजिना आणण्यास गुप्तपणे दोन हजार स्वार पाठविले होते. त्यांनी नारोशंकराकडून खजिना घेतला. प्रत्येकाने एकएक हजार रुपये बरोबर घेतले होते. ते भाऊच्या छावणीकडे निघाले. रात्र अंधारी होती. ते रस्ता चुकून अहमदशहाच्या छावणीत शिरले. बादशाही सैन्याने सर्वांना लुटले आणि अनेकांना ठार मारले. या घटनेने भाऊचा धीर खचला. आणि तो चिंताक्रांत झाला.

छावणी कायम केल्यानंतर अहमदशहाने आपल्या तळासमोर एक कोसाच्या अंतरावर एक तांबड्या रंगाचा तंबू उभा केला. तेथे तो सकाळी येऊन नमाज पढे. नंतर तो कामाला लागे. बादशहाच्या डावीकडे शहावलीखान चार हजार स्वारांनिशी आणि उजवीकडे एक सरदार तितक्यच स्वारांनिशी उभे राहात. अहमदशहा आपला मुलगा तैमूरशहा आणि चाळीसपन्नास स्वार बरोबर घेऊन छावणीच्या भोवती पाहणी करीत फिरे. आणि सगळ्या सरदारांच्या तळाची तपासणी करी. यानंहतर मराठ्यांच्या छावणीला वळसा घालून नंतर तो दुपारी आपल्या तांबड्या तंबूत येई. दुपारचे जेवण तो कधी तेथे तर कधी आपल्या मुख्य डेऱ्यात घेत असे. अशा रीतीने तो रोज पन्नास कोसांची मजल मारी. अनेक वेळा तो मराठ्यांच्या छावणी भोवती हिंडून येई, त्याने पाच हजार स्वार नेमले. होते. ते लष्करापासून एक कोसावर रात्रभर पहारा देत फिरत. छावणीचे रक्षण करण्याकरिता अशीच इतर पथके नेमण्यात आली होती. तो सर्वांना म्हणे की तुम्ही आरामात झोपा. मी सगळी काळजी घेईन. ही व्यवस्था सतत चालू असे. अहमदशहाचा हुकूम म्हणजे जणू मृत्यूचा हुकूमच.

रोज उभय पक्षाच्या चकमकी होत. तोफा आणि बंदुका यांची मारगिरी चाले. संध्याकाळी उभय दळे आपापल्या छावण्यात परत जात; असे दोन महिने वीस दिवसपर्यंत चालले होते. रोज शेकडो मराठ्यांची डोकी कापून आणीत.

या अवधीत उभय दळात तीन निकराच्या लढाया झाल्या.

पहिल्या खेपेस म्हणजे रबिउस्सानी महिन्याच्या बावीस तारखेस असे झाले की वजीर शहावलीखान हा

डावीकडे आपल्या तळावर होता. संध्याकाळच्या सुमारास तो बाहेर पडला. पानीपत गावाच्या दक्षिणेस एक विहीर होती. ती तो पाहात होता. त्याच्याबरोबर जुजबी सैन्य होते. हा कोणी तरी मोठा सरदार आहे हे मराठ्यांनी ओळखले. दहा हजार मराठे स्वार त्याच्यावर तुटून पडले. शहावलीखानाची परिस्थिती अत्यंत आणीबाणीची झाली. ही बातमी बादशहाच्या छावणीत पोहोचताच शुजाउद्दौला आणि नजीबुद्दौला आणि बादशाही सैन्यही शहावलीखानाच्या मदतीस धावली. उभय पक्षात घनघोर युद्ध झाले. तीन चार घटिका युद्ध होऊन उभय दळातील तीन चार हजार माणसे ठार अगर जखमी झाली. प्रथम मराठ्यांना जय मिळाला. इतक्यात शहावलीखानाला मदत आली. आणि त्याच वेळी सूर्यास्त झाला. मराठ्यांची फौज मागे हटली. बादशाही फौजेने त्यांचा छावणीपर्यंत पाठलाग करून अनेकांना ठार मारले.

दुसरे युद्ध जमादिलावल महिन्याच्या अठरा तारखेस झाले. नजीबुद्दौल्याच्या मोर्च्यातील फौजेने आक्रमण केले. संध्याकाळच्या सुमारात भाऊचा मेहुणा बळवंतराव हा आपल्या सैन्यासहित त्यांच्यावर तुटून पडला. हा हल्ला इतक्या निकराचा होता की नजीबुद्दौल्यापाशी फक्त पन्नास स्वार राहिले. तरी तो ठाण मांडून राहिला. या सुमारास दोघांनाही कुमक येऊन पोहोचली. रात्रीची एक घटिका होईपर्यंत मोठी निकराची लढाई चालली होती. नजीबुद्दौल्याचा चुलता खलीलुल्लाखान हा मोठी मर्दुमकी गाजवीत असता ठार झाला. त्या दिवशीच्या युद्धात नजीबुद्दौल्याची दोन तीन हजार पेक्षा जास्त माणसे ठार झाली अगर जखमी झाली. शेवटी बळवंतराव जंबूरकची गोळी लागून ठार झाला. नंतर उभय दळे आपापल्या स्थळी परत गेली.

तिसऱ्या खेपेस अशीच घटना घडली. रोज सकाळपासून तो रात्रीचा एक प्रहर होईपर्यंत उभयदळात चकमकी आणि गोळागोळी होई. हिंदुस्थानी सरदार कंटाळून गेले. त्यांनी पुन्हा पुन्हा बादशहाला म्हटले की असे किती दिवस चालायचे. आता हल्ला करावा. जे व्हावयाचे ते होईल. अहमदशहा म्हणाला, ‘‘हे युद्धाचे प्रकरण तुम्हाला समजत नाही. ते सगळे मी करीन. बाकीच्या गोष्टी तुम्ही पाहून घ्या. तुम्ही पहा मी शत्रूचा निकाल कसा लावतो ते. योग्य वेळेवर जे करावयाचे ते करू.’’ बादशहाने मराठा छावणीच्या भोवती चार चार हजार स्वारांची पथके लावून दिली होती. रात्रंदिवस टेहेळणी करून शत्रूकडे रसद मुळीच पोहोचू द्यायची नाही असे त्यांना बजावण्यात आले होते. यामुळे मराठ्यांच्या फौजेत अन्नाचा दुष्काळ पडला. चाराही दुआबातून येणे कमी झाले. त्यामुळे फौजेची स्थिती हलाकीची झाली.

एके दिवशी रात्री जवळ जवळ वीस हजार मराठे स्वार आणि कहीचे लोक रसद आणण्यास बाहेर पडले होते. जेथे ते पोहोचले त्या जंगलात शहापसंदखान आपल्या पाच हजार स्वारानिशी होता. मराठ्यांना याची काहीच कल्पना नव्हती. अफगाणांनी एकाएकी मराठ्यांवर हल्ला करून त्यांना ठार मारले. रात्र असल्यामुळे भाऊ कडून कुमक येऊ शकली नाही. मराठ्यांची हजारो माणसे मारली गेली. दुसऱ्या दिवशी अहमदशहाला ही खबर लागली. तो स्वत: स्वार होऊन त्या स्थळी केला. पाहातो काय की तेथे प्रेतांच्या राशी पडल्या होत्या. भाऊला ही बातमी कळून तो कष्टी झाला. त्याचा धीर सुटला.

भाऊच्या तर्फे गणेशपंडित नावाचा अखबारनवीस शुजाउद्दौल्यापाशी होता. तो स्वत: शुजाउद्दौल्यापाशी पोहोचू शकत नव्हता. माझ्या मार्फतीने तो कामे काढून घेत असे. सदाशिवभाऊ नेहमी मला स्वत: पत्रे लिही आणि आपल्या खिदमत गाराच्या हाताने माझ्याकडे पाठवी. त्यातील मजकूर हा असे की कसेही करून शुजाउद्दौल्याचे मन वळवा आणि शहावली खानाच्या संमतीने तह घडवून आणा हे झाले आणि आम्ही सुरक्षित राहिलो तर तुमचे

हरप्रकारे अगत्य करू तुम्ही जे ठरवाल ते मला कबूल आहे. भाऊने स्वत:चा केशर लविलेला पंजा करारनाम्यावर ठसवून तो पाठविला. त्याबरोबरच शिरपेच, जडावाचा तुरा आणि आपले पागोटे त्याने शुजाउद्दौल्याकडे ही हकीकत शहावलीखान यास सांगण्याकरिता मला पाठविले. शहावलीखान तहाच्या गोष्टीला अनुकूल होता. त्याने अहमदशहापाशी विनंती केल. अहमदशहा म्हणाला की मला या सगळ्या गोष्टीशी कर्तव्य नाही. मी परमेश्वराच्या इच्छेने आपले धर्मबांधव मुसलमान आणि जातिबांधवाच्या मदती करिता या देशात आलो आहे. युद्ध लढविणे माझ्याकडे आहे. बाकीच्या गोष्टीत येथील मंडळी मुख्त्यार आहेत. राहिले सरदार हाफिज रहमत, दूंदेखान, अहमदखान बंगश हे सगळे तहाला राजी होते. शहा व शहावलीखान म्हणाले की नजीबुद्दौल्याने कबूल केले तर आम्हालाही कबूल आहे.

त्याप्रमाणे शुजाउद्दौल्याने नजीबखानाशी बोलून त्याची संमती मिळविण्याकरिता मला मध्यरात्री नजीबखानाकडे पाठविला. आज्ञेप्रमाणे मी गेलो. नजीबुद्दौला एकटाच होता. मी सगळ्या गोष्टी सांगोपांग सांगितल्या. नजीबुद्दौला म्हणाला ''शुजाउद्दौला हे माझ्या मालकांचे चिरंजीव (साहेब जादे) आहेत. त्यांना मी आपले मालक समजतो. पण ते तरुण आहेत. ते सगळ्या गोष्टी समजून घेत नाहीत. या प्रकरणात दगा आहे. शत्रू जेरीस आला तर काय काय अजीजी करीत नाही. तो कोणत्याही गोष्टीला कबूल होईल. पण शपथा म्हणजे साखळ्या नव्हत की त्यांचा गळ्याला फास पडेल. शत्रू इतक्या जेरीला आल्यावर तुम्ही त्याला जाऊ दिलेत तर तो पुढे सूड घेण्याकरिता वाटेल ते उपाय योजणार नाही का. यावेळी सारे दख्खन येथे जमले आहे. पुन्हा ते केव्हा असेच आमच्या तावडीत साप़डेल. एका हल्ल्यात हा काटा काढून टाकता येण्यासारखा आहे. नबाब साहेबांनी थोडा दम धरावा. मी स्वत: हजर होऊन सगळे काही सांगेन आणि काय सल्ला ठरेल तो अंमलात आणीन.''

या संभाषणानंतर मी परतलो. शुजाउद्दौल्याला सगळी हकीकत सांगून मी त्याला म्हटले की नजीबुद्दौल्याचे मत तहाला मुळीच अनुकूल नाही. आणि होणारही नाही. नजीबुद्दौल्यापासून मी बाहेर निघाल्यानंतर, तो त्याच वेळी घोड्यावर स्वार होऊन अहमदशहाकडे गेला. त्याने अहमदशहाला सगळी हकीकत सांगून म्हटले की सगळे जण तहाला राजी आहेत. पण मला हे पटत नाही. हिंदुस्थानात हा एकच काटा (मराठे) आहे. तो काढून टाकला तर सारे हिंदुस्थानचे साम्राज्य तुमचे आहे. याउपर तुमची जी मर्जी असेल ते करा. मी शिपाई मनुष्य आहे. त्यांचे (मराठ्यांचे) वर्चस्व झाले तर त्यांना जाऊन मिळेल.

अहमदशहा म्हणाला, ''तुम्ही म्हणता तेच खरे, या बाबतीत तुमचेच म्हणणे मी मानीन. दुसऱ्या कोणाचेही मानणार नाही. शुजाउद्दौला तरुण आहे. त्याला जगाचा अनुभव नाही. शत्रू (मराठे) हे कोल्ह्याच्या वृत्तीचे आहेत. तुमचे ऊर्जित व्हावे हे त्यांना पसंत नाही. मी तुम्हाला पहिल्या दिवसापासून मुख्यत्यार केले आहे. तुम्हाला योग्य वाटेल ते करा. सगळ्यांचे ऐकणे हे राजकारणाला धरून आहे. पण तुमच्याशिवाय मी कुणाचाही सल्ला मानणार नाही.'' दुसऱ्या दिवशी नजीबुद्दौला शुजाउद्दौल्याकडे आला. अर्धरात्रीपर्यंत त्याची बोलणी चालली होती.

या सुमारास भाऊच्या लष्करात भयंकर उपासमार झाली. त्यांनी पानीपतचे गाव धुवून काढले. पण एवढ्या मोठ्या फौजेला ते काय पुरे पडणार. शेवटी सैन्यातील सरदार आणि शिपाई भाऊकडे गेले, आणि म्हणाले की दोन दिवसापासून कोणालाही अन्नाचा कण मिळाला नाही. दोन रुपये देऊनही धान्याचा एक शेर मिळत नाही. अशा हलाकीपेक्षा शत्रूशी लढणे बरे. जे नशिबात असेल ते होईल. सदाशिवराव म्हणाला की मी सुद्धा हाच निश्चय केला आहे. तुम्ही लोक जे ठरवाल त्याच्या बाहेर मी नाही. मध्यरात्रीपर्यंत हा खल चालला होता. शेवटी युद्ध करावे असा

निर्णय घेण्यात आला. आणि असे ठरले की उद्या पहाटे दोन प्रहर रात्र राहिली असता तोफखाना समोर घेऊन निघावे आणि शत्रूवर तुटून पडावे. प्रत्येकाने हा निर्णय घेऊन निरोपाचा विडा उचलला. आणि नंतर बैठक संपली. भाऊने त्याचवेळी स्वहस्ताने एक पत्र लिहिले की आता पाणी डोक्यावरून गेले आहे. आता काहीतरी करण शक्य असेल तर करा. नाही तर तसे स्पष्ट कळवा. यापुढे लिहिणे बोलणे याला वेळ मिळणार नाही. भाऊचा खिदमतगार बाळकराम नावाचा होता. भाऊ त्याच्याकडून विडा लावून घेत असे. त्याच्याबरोबर भाऊने पत्र पाठविले. तो रात्रीचा एकप्रहर शिल्लक राहिला असता आला. त्यावेळी मी शुजाउद्दौल्यापाशी होतो. पत्र पाहून मी त्याचा मजकूर शुजाउद्दौल्याला सांगितला. आणि बाळकरामाला शुजाउद्दौल्यासमोर उभा केला. त्याने सगळी हकीकत सांगितली. त्यावेळी हरकाऱ्यांनी बातमी आणिली की तिकडे युद्धाची तयारी झाली आहे. आणि सारे सैन्य तोफखाना पुढे ठेवून त्याच्या पाठोपाठ स्वार होऊन येत आहे. त्यावेळी रात्रीच्या चार घटिका राहिल्या असता ही बातमी ऐकताच शुजाउद्दौला घोड्यावर स्वार होऊन बादशहाच्या तंबूकडे गेला. त्याने तंबूच्या खोजासराला सांगितले की बादशहाला लवकर उठवा. जरूरीची बातमी द्यायची आहे. हे ऐकताच बादशहा महालातून बाहेर आला. त्याने विचारले की काय परिस्थिती आहे. शुजाउद्दौल्याने म्हटले की बोलण्याची ही वेळ नाही. आपण ताबडतोब स्वार व्हा आणि फौजेला तयारीचा हुकूम द्या. बादशहाच्या तंबूपाशी घोडे नेहमी तयार ठेवलेले असत. बादशहाने अंगावरील पोशाक न बदलता त्याच पोशाकात घोड्यावर स्वार होऊन कूच केले. आपल्या तळाच्यासमोर तो अर्धा कोस आला. तेथे त्याने सैन्याला तयार होण्याचा हुकूम सोडला.

नंतर अहमदशहाने शुजाउद्दौल्याला विचारले की ही बातमी तुम्हाला कोठून मिळाली. शुजाउद्दौला म्हणाला की ही बातमी मला माझ्या एका कारभाऱ्यांकडून मिळाली. अहमदशहा म्हणाला की तो कोठे आहे. त्याला बोलवा. एक शुतर सवार (उंटस्वार) पाठवून मला बोलावण्यात आले. मी येऊन शुजाउद्दौल्याच्या जवळ उभा राहिलो. अहमदशहाने विचारले की काय खबर आहे. मी सांगितले की ते लोक तयार झाले आहेत. लवकरच युद्ध पेटेल.

त्याच वेळेला काही दुराणी स्वार तेथे येऊन म्हणाले की आम्ही छावणीत होतो. मराठ्यांना आम्ही पळवून त्यांचे सामान लुटून आणिले आहे. यावर बादशहाने माझ्याकडे पाहून म्हटले की हे लोक काय म्हणत आहेत. त्यावर मी म्हणालो की जे आहे ते आता दिसूनच येईल. खरे खोटे काय ते कळून येईल.

ही बोलणी चालू होती. मराठ्यांचे सैन्य आपल्या छावणीच्या समोर दीड कोसावर आले. त्यांनी आपल्या तोफा साखळ्यांनी बांधल्या होत्या. त्यांनी तोफांचा एक मारा केला. तोफांचा आवाज ऐकल्यावर अहमदशहाने आपले पाय ओढून घोड्यावर घेतले. त्याने आपले पागोटे आपल्या मांडीवर घेतले. हुक्क्याचा एक दम भरून तो त्याने आपल्या खिदमतगाराला दिला. पागोटे (कुलाह) आपल्या डोक्यावर चढविले. आणि शुजाउद्दौल्याकडे पाहून त्याने म्हटले "तुझ्या दिवाणाने सांगितले ते खरे ठरले." मग अहमदशहाने शहापसंदखानाला बोलाविले. तो आपल्या गोटात होता. त्याने नजीबुद्दौल्याच्या डावीकडे उभे राहावे असे बादशहाने त्याला फर्मावले. मुख्य वजिराने सैन्याच्यामध्ये आपल्या पथकासहित रहावे. आणि एका सरदाराने हाफिज रहमतखान, दूंदेखान वगैरेंच्या म्हणजे सैन्याच्या उजव्या बाजूस राहावे असा त्याने हुकूम दिला.

तोपर्यंत सूर्याची किरणे पसरू लागली होती. मराठ्यांचे ध्वज दिसू लागले. त्यांनी तोफखाना आपल्या तोंडावर ठेविला होता. आणि ते दमादमाने पुढे सरकत होते. अहमदशहा घोड्यावरून आपल्या फौजेची पाहणी करीत हिंडला. सैन्याच्या मुख्य तळापुढे एक कोसावर त्याचा तंबू होता. त्यात तो दाखल झाला. आणि मग युद्धाला

सुरुवात झाली. पूर्वेकडे तोंड असलेल्या मराठ्यांच्या सैन्याची रचना खालीलप्रमाणे होती. (शर्करू) इब्राहीमखान गार्दी, दमाजी गायकवाड, विठ्ठल शिवदेव, भाऊ, विश्वासराव आणि हुजरातीचे पथक, यशवंतराव पवार, शमशेर बहादुर वगैरे सरदार, मल्हारराव, जनकोजी शिंदे. तोफा सांखळ्यांनी बांधून सगळ्या सैन्याच्या समोर ठेविल्या होत्या. याशिवाय युद्धाची इतर हत्यारे (बाण शुतरनाळे वगैरे) होते.

अहमदशहाचे सैन्य पश्चिमेकडे तोंड करून होते (मगरबरुया) त्यांनीही तोफा सांखळ्यांनी बांधून आपल्या समोर ठेविल्या होत्या. बाण वगैरे त्यांनी तोफांच्या जवळ ठेविले होते. जवळच जंबूरकचे उंट उभे करण्यात आले होते. त्याजवळ शेरबच्चा अफगाणीचे पायदळ होते. दूंदेखान, हाफिज रहमतखान, त्यांच्यापासून थोड्या अंतरावर अहमदखान बंगश. नंतर शहावली खान, मग शुजाउद्दौला, नंतर नजीबुद्दौला नंतर शहापसंतखान, याला नजीबुद्दौल्याच्या डावीकडे ठेवण्यात आले होते. मराठ्यांनी तिकडे हल्ला करू नये हा हेतु होता. दूंदेखानाच्या दळाच्या उजवीकडे बर्खुर्दारखान. अमीरबगखान वगैरेची पथके होती. ती इब्राहीमगार्दीच्या समोर आणि काहीशी बाजूला पसरली होती.

सहा जमादिसानी, पौष शुद्ध अष्टमी १८१७ बुधवारी तोफा, बाण आणि बंदुकींचा सारखा मारा सुरू झाला. त्यांच्याकडून तोफा, जंबूरक, बाण वगैरेतून पावसाप्रमाणे गोळ्यांचा वर्षाव होत होता. पण इकडे कोण जाया झाले नाही. उभय दळे हळूहळू एकमेकाकडे सरकत होती. असे होत होत उभयतामधे फार थोडे अंतर राहिले. मराठ्यांच्या तोफा जाड होत्या. त्यांचे गोळे बादशाही छावणीतून अर्ध्या कोसावर पडू लागले. इकडून फार थोड्या तोफा सोडण्यात आल्या. पण शहावली खानाच्या दळाकडून तोफा खूप चालल्या कारण तेथेच उभय दळात हाणामारी झाली.

तिकडे इब्राहीमखान गार्दी सदाशिवभाऊच्या समोर गेला आणि म्हणाला ''रामराम महाराज, तुम्ही माझ्यावर रागावला होता. कारण मी तुमच्याकडून पगाराबाबत दरमहा सहा लाख रुपये घेत असे. या महिन्यात तुमचा खजिना लुटला गेला त्यामुळे आम्हाला पगार मिळाला नाही. काही हरकत नाही. आज मी आपले कर्तव्य बजावतो.'' असे म्हणून तो घोडा उडवीत आपल्या दळात आला. त्याने ताबडतोब हातात निशान आणि बंदूक घेऊन दूंदेखान व हाफिज रहमतखान याच्या सैन्यावर जोराचा हल्ला केला. थोडावेळ तोफांचे आवाज थांबले. इब्राहीमखानाने दोन पल्टणी अहमदशहाची पथके काही समोर आणि काही बाजूला होती. त्यांच्या तोंडावर ठेवून दिली. त्यांनी आपल्यावर डाव्या बाजूने हल्ला करू नये म्हणून ही योजना होती. उरलेल्या सात पल्टणीनिशी इब्राहीमखान हा रोहिल्यांवर तुटून पडला. इकडूनही रोहिले पुढे होऊन शत्रूला भिडले. या निकराच्या युद्धात रोहिल्यांची आठ नऊ हजार माणसे ठार अगर जखमी झाली. रोहिल्यांची स्थिती अत्यंत संकटाची झाली. हाफिज रहमतखान, दूंदेखान व अहमदखान याजपाशी फार थोडी माणसे राहिली. त्या दिवशी हाफिज रहमतखान आजारी होता. तो पालखीत स्वार झाला. आणि म्हणाला, ''माझी पालखी दूंदे खानाच्या समोर घेऊन चला. त्याच्यासमोर मला मरण येऊ द्या.'' युद्ध अतिशय निकराचे झाले. एकाची दुसऱ्याला वार्ता नव्हती. दूंदेखान घोड्यावरून उतरून म्हणाला की मित्रांनो मला हाफिज रहमतखानाची खबर कळवा.

इब्राहीमखानाने दोन पल्टणी बादशाही फौजेवर हल्ला करण्याकरिता नेमल्या होत्या. त्यांनी खूप मर्दुमकी गाजवून शत्रूंना हैराण केले. दीड घटकापर्यंत गोळा गोळी आणि शस्त्रांची हाणामारी चालू होती. इब्राहीमखानाच्या सहा पल्टणी जखमी झाल्या अगर मारल्या गेल्या. दमाजी गायकवाड वगैरे सरदार इब्राहीमखानाच्य कुमकेस होते त्यांनीही शौर्याची शर्थ केली. स्वत: इब्राहीमखान यास गोळी, बाण आणि बरछी यांच्या दोन तीन जखमा झाल्या.

दमाजी गायकवाड यास तीन जखमा झाल्या. इतर सरदारांचीही तीच स्थिती झाली.

इकडे हुजरातीचे पथक घेऊन सदाशिव भाऊ, विश्वासराव आणि इतर सरदार शहावलीखानावर घसरले. इतक्या निकराचे युद्ध झाले की आकाश आणि पृथ्वी दिसेनाशी झाली. आणि युद्ध पाहून आकाशाचे डोळे दिपून गेले. शहावलीखानाबरोबर दहा बारा हजार स्वार, सात आठ हजार विलायती आणि काबुली शेर बच्च्यांची पथके पायदळ आणि स्वार, आणि एक हजार जंबूरकचे स्वार होते. जलौघाप्रमाणे मराठ्यांनी त्यांना गिळून टाकले. वजीराचा चुलत भाऊ अताईखान हा मारला गेला. आणि जवळ जवळ तीन हजार दुराणी मराठ्यांच्या निर्दय शस्त्रांना (तेगे बेदरेग) बळी पडले. दुराणींची फौज मागे हटली. शहावली खानापाशी शे दोनशे स्वार आणि पन्नास एक जंबूरकचे उंट राहिले. शहावली खानाच्या अंगात पूर्ण चिलखत होते. तो घोड्यावरून उतरून खाली जमिनीवर बसला.

त्यावेळी शुजाउद्दौल्याने मला म्हटले, ''शहावलीखानाच्या दळाचा ध्वनी कानी पडत नाही. काय प्रकार आहे? त्याची बातमी घेऊन ये.'' त्याप्रमाणे मी घोडा उडवीत त्या ठिकाणी पोहोचलो. मी पाहिले की शहावलीखान जमिनीवर बसला असून तो तोंडात माती घालून घेत होता. त्याच्या तोंडातून कफ बाहेर पडत होता. तो शिपायांना शिव्या देऊन म्हणत होता की ''विलायत (स्वदेश) लांब आहे. कुठे चाललात'' पण त्याचे कोण ऐकणार?

मला पाहून तो म्हणाला, ''माझा मुलगा (मानलेला) शुजाउद्दौला याला लवकर जाऊन सांगा की मी मरत आहे. माझी मदत कर'' मी परत येऊन शुजाउद्दौल्याला हकीकत कळविली. शुजाउद्दौला म्हणाला की यावेळी येथून हलणे योग्य होणार नाही. शत्रूचे सैन्य आपल्या जवळ पोहोचले आहे. न जाणो त्यांना विचार सुचला तर ते हल्ला करतील आणि मग सर्वनाश होईल. त्यानंतर परिस्थिति अतिशय आणीबाणीची झाली. आणि मला निरोप पोहोचविणे झाले नाही. शुजाउद्दौल्यापाशी दोन हजार स्वार, एक हजार पायदळ, हे सैन्य होते. याशिवाय वीस तोफा होत्या. बंदुकी आणि तोफा भरून तो तयारीने राहिला. पण शत्रूचे सैन्य त्याच्या बाजूने आले नाही. मधूनमधून लांब दुरून भाले बरछ्या आणि तलवारी सूर्यप्रकाशात तळपताना दिसत. शत्रू चालून येतो असे वाटे पण सगळे सुरक्षित पार पडले.

डाव्या बाजूस नजीबुद्दौला होता. त्याच्यापाशी सहासात हजार पायदळ होते. नजीबुद्दौला पायदळ सैन्य घेऊन हळूहळू पुढे सरके. त्याचे शिपाई आणि बेलदार पुढे जाऊन मोर्चे तयार करीत. आणि नंतर त्याचे सैन्य पुढे सरकून मोर्च्याच्या आश्रयाला दबा धरून बसे. अशा पद्धतीने नजीबुद्दौला दीड कोस पुढे सरकला. आणि शत्रू सैन्यापासून गोळ्यांच्या टप्प्यापर्यंत पोहोचला. नजीबुद्दौला म्हणे की या युद्धातील मी नवरदेव आहे. ही सगळी जबाबदारी माझ्या डोक्यावर आहे. बाकीची माणसे म्हणजे वऱ्हाडी मंडळी आहेत. जे काय होणार ते माझ्यामुळे होईल किंवा मला होईल. त्याचा अनुभव आणि शहाणपण ही किती म्हणून काय विचारावे. त्याच्या तोडीचा दुसरा कोणी नव्हता. त्याला रुबाबही बराच होता. त्याच्या समोर जनकोजी शिंद्याचे सैन्य होते. दोघांच्यात हाडवैर होते. रोहिल्यांच्यापाशी बाणांचा साठा होता. प्रत्येक वेळेस ते हजार हजार बाण सोडीत. त्यांच्या दणदणाटाने आकाश आणि पृथ्वी दिसेनाशी होत आणि कान फाटून जात. शत्रूने पुढे होण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण बाणांच्या माऱ्यामुळे त्याला संधी सापडली नाही. मराठ्यांची स्थिती खालीवर होऊ लागली.

नजीबुद्दौल्याच्या डावीकडे शहापसंदखान होता. तो अनुभवी आणि कसलेला होता. त्याच्यासमोर असलेल्या मराठ्यांच्या सैन्याला हातपाय हलविण्यास मुळीच अवकाश मिळाला नाही.

सकाळपासून मध्यान्हापर्यंत युद्ध निकाराने चालू होते. परिस्थिति विचित्र वाटू लागली. मराठ्यांचे शौर्य आणि धाडस यावरून ते विजयी होत आहेत असे दिसून आले. दोन प्रहरी अहमदशहाला आढळून आले की शहावलीखान, रोहिले आणि उजव्या बाजूचे बादशाही सरदार (बर्खुर्दारखान वगैरे) यांची सैन्ये मोडली आहेत. हे ऐकताच अहमदशहाने नसक्चींचे पथक बोलाविले. दोनहजार नसक्ची हजर झाले. अहमदशहाने हुकूम दिला की पाचशे नसक्चीनी तळावर जावे आणि जबरदस्तीने (कुऱ्हाडीच्या मागच्या बाजूने आघात करून) बाहेर काढावे. दीडहजार नसक्चींना त्याने हुकूम दिला की युद्धातून जे पळून चालले आहेत त्यांना कुऱ्हाडीने बदडून काढून परत युद्धात पाठवावे. नसक्चीनी बादशहाच्या आज्ञेची अंमलबजावणी केली आणि जवळजवळ सातहजार माणसे एका ठिकाणी जमा झाली. तळावरून काही आली आणि काही बादशहाच्या राखीव पथकापैकी होती. या सैन्यापैकी चार हजार शिपाई उजवीकडे रोहिले आणि बर्खुर्दारखान यांच्या मदतीस पाठविण्यात आले. दहा हजार सैन्य शहावलीखानाच्या मदतीस पाठविण्यात आले. त्यांना हुकूम देण्यात आला की चहूबाजूने शत्रूवर निकराने तुटून पडावे. शहापसंदखान आणि नजीबुद्दौला यांना फर्मावण्यात आले की शहावलीखान हा हल्ला चढवील त्यावेळी त्यांनी सुद्धा हल्ला चढवावा.

सारांश दोनप्रहरी चार घटिका गुदरल्या असता शहावलीखानाबरोबर असलेल्या फौजेने मराठ्यांच्या मुख्य दळावर हल्ला केला. त्या दळात सदाशिव भाऊ व विश्वासराव हे होते. त्याचवेळी उजव्या व डाव्या बाजूची सैन्येही त्यांच्यावर तुटून पडली. नजीबुद्दौल्यानेही हल्ला केला आणि त्याचवेळी आपल्या पायदळाला बाण उडविण्याची त्याने आज्ञा केली. एका वेळेस हजारो बाण उडविण्यात आले. त्या योगाने उभयदळांना आकाश आणि पृथ्वी दिसेनाशी झाली. शहावलीखान शत्रूवर तुटून पडला. दोन घटिका तुंबळ युद्ध झाले. तलवारी, भाले, बरछी, परशु इत्यादी शस्त्रांनी उभयदळांनी जी निकर केली त्याचे वर्णन करणे अशक्य आहे. मराठ्यांनी तलवारी आणि भालेबरछांनी सीमेपरते शौर्य दाखविण्यात कसूर केली नाही. त्यांनी निकराने हल्ले केले. त्यात त्यांचे अनेक लोक मारले गेले. दिवस मावळण्यास एक प्रहर दोन घटिका राहिल्या असता विश्वासराव मारला जाऊन घोड्याखाली आला. भाऊला ही बातमी कळल्यावर त्याने आज्ञा केली की विश्वासरावाला खाशा हत्तीवर घालावे. त्यावर अंबारीच्या मागे खवाशीत बाबू पंडित बसला होता. यानंतर भाऊने कमरेला तलवार आणि हातात भाला घेऊन शहावलीखानाच्या दळावर त्वेषाने हल्ला केला. एक घटिका पर्यंत निकराचे युद्ध झाले. नंतर डोळ्याचे पाते लवते न लवते तोच मराठ्यांची फौज कापुरासारखी एका एकी नाहीशी झाली. मैदानावर कोणी राहिले नाही. ठिकठिकाणी प्रेतांच्या राशी मात्र पडल्या होत्या.

हे पाहून इकडील शिपाई आणि स्वार हे पाठलाग करू लागले. त्यांना लुटीचीही आशा होती. पाठलाग करीत ते पानीपत गावाच्याही पलीकडे गेले. जेथे जेथे मराठे पळत होते तेथे त्यांना गाठून मारण्यात आले. चांदणी रात्र होती. दहा बारा कोस पर्यंत सैन्याने पाठलाग करून कत्तल आणि लूट केली. जमीन प्रेतांनी भरून गेली. त्या दिवशी मराठ्यांच्या सैन्यातील आणि बाजार बुणग्यातील जवळजवळ एक लाख माणूस मारले गेले. जे जगले त्यापैकी अनेकांना आसपासच्या प्रांतातील जमीनदारांनी नागविले आणि मारले. मराठ्यांच्या छावणीत जाऊन बादशाही फौज आणि रोहिले यांनी लूट करून अनेकांना कैद केले. एकेकाच्या हाताला जी लूट लागली आणि जी माणसे कैद झाली त्यांची काय गणती करावी. एकेका स्वाराने सामानाने लादलेले दहा दहा वीस उंट आणले. पकडून आणलेल्या घोड्यांची गणती काय करावी? ते घोडे म्हणजे शेळ्या-मेंढरासारखे होते. हत्ती पकडण्यात

आले. दास आणि दासी पाहता जवळजवळ चाळीस हजार माणसे कैद करण्यात आली. जवळजवळ आठ हजार माणसे सर्वस्वी नागविली जाऊन शुजाउद्दौल्याच्या आश्रयाला आली. शुजाउद्दौल्याने त्यांच्या रक्षणार्थ आपली पथके नेमली. त्यांना कोणी मारू नये म्हणून ही व्यवस्था होती. पण दुराणीच्या फौजेत मराठ्यांचे शे दोनशे माणूस पकडून आणीत आणि छावणी भोवती त्यांना ठार मारीत. दुराणी शिपाई म्हणत की आम्ही स्वदेशातून निघताना आमचे आई-वडील आणि बहिणी आणि बायका यांनी आम्हाला ताकीद केली की आम्हाला पुण्य लागावे म्हणून विजय मिळाल्यावर आमच्या नावाने इतके-इतके काफर तुम्ही मारावे. म्हणून त्यांनी हजारो माणसे मारली. बादशहा आणि सरदार यांचे तंबू सोडले तर सगळीकडे डोक्यांच्या राशी पडल्या होत्या. मराठ्यांवर तर तो कल्पांत कोसळला होता.

सगळे सरदार बादशहासमोर गेले आणि त्यांनी विजयाबद्दल त्याचे अभिनंदन केले. बादशहाने स्वार होऊन मैदानाची दुरून पाहणी केली आणि तो आपल्या छावणीच्या तंबूत दाखल झाला. सरदार लोक आपापल्या तंबूकडे गेले.

अजून दिवस मावळण्यास एक घटिका अवकाश होता. बर्खुर्दारखानाच्या दुराणी शिपायांनी विश्वासरावाचा हत्ती आणि त्याच्या अंगावरील अलंकार काढून घेऊन विश्वासरावाचे शव पालखीत घालून शुजाउद्दौल्याकडे आणले. शुजाउद्दौल्याने त्यांना दोन हजार रुपये बक्षीस म्हणून दिले. आणि शव आपल्या रक्षणाखाली घेतले. इब्राहीमखान गार्दी जखमी होऊन शुजाउद्दौल्याचा सरदार शुजाफुलीखान याच्या हातात सापडला. त्याने त्याला गुप्तपणे आपल्या तंबूत ठेविले आणि याची खबर शुजाउद्दौल्याला दिली. शुजाउद्दौल्याने इब्राहीमखानाला गुप्त रीतीने ठेऊन त्याचा औषधोपचार करा अशी आज्ञा केली. नंतर अहमदशहाने शुजाउद्दौल्याला आज्ञा केली की विश्वासरावाचे प्रेत आम्ही पाहू इच्छितो. ते पाठवून द्या. त्याप्रमाणे शुजाउद्दौल्याने प्रेत बादशहाकडे पाठविले. शहावलीखान आणि इतर अफगाण आणि हिंदुस्थानी सरदार यांनी विश्वासरावाचे प्रेत पाहिले. आणि ते म्हणू लागले की अशा वर्णाचा आणि सुंदर बांध्याचा मनुष्य आमच्या आजपर्यंत पाहण्यात आला नाही. त्याचा वर्ण चंपकफुलासारखा होता. तो नाजुक बांध्याचा होता. त्याची गात्रे रेखीव होती. त्याचे हात मांडीपर्यंत पोहोचले होते. त्याचे डोळे अर्धे उघडे होते. मृत असूनही त्याच्या चेहेऱ्यावर कांती कायम होती. असे वाटे की तो झोपेत आहे. त्याच्या मानेवर दोन्ही कानाच्यामध्ये तलवारीची जखम होती. ही जखम अर्ध्या बोटाएवढी खोल होती. त्याच्या भुवईपाशी बाणाची एक जखम होती. तेथे एक बोटभर कातडे निघाले होते. पण ते शरीराला चिकटून होते. त्याच्या अंगावर रक्ताचा एकही डाग नव्हता.

दुराणी शिपायांनी एकच गर्दी केली. ते म्हणू लागले की हा दख्खनचा बादशहा होता. त्याचे प्रेत वाळवून देशी नेले पाहिजे. शेवटी विश्वासरावाचे प्रेत तेथून काढून बर्खुर्दारखानाचा दिवाण मोतीलाल याच्या तंबूत ठेवण्यात आले. शुजाउद्दौल्याला ही बातमी कळताच तो अहमदशहाकडे गेला आणि शहावलीखानाच्या संमतीने म्हणाला ‘‘वैर हे जिवंतपणी असते. हिंदुस्थानात परंपरा अशी आहे की विजयानंतर शत्रूच्या मृत सरदाराचे दहन अगर दफन त्यांच्या पद्धतीप्रमाणे करावे. असे करण्यातच लौकिक आहे. याच्याविरुद्ध वागले तर बदनामी होईल. आपण या देशात थोडेच दिवस राहाणार आहात. आम्हाला नेहमी त्यांच्याशी (मराठ्यांशी) संबंध आहे. विश्वासरावाला आमच्या ताब्यात देण्यात यावे. हिंदुधर्माप्रमाणे त्याचे दहन करवू.'' नजीबुद्दौल्याने अशीच विनंती केली. इतर सरदारांनीही पण असेच सांगितले.

एकदा मला नजीबुद्दौल्याचा दिवाण मेघराज याच्याबरोबर बर्खुर्दारखानाचा दिवाण मोतीलाल याजकडे जाणे

घडले. दुसऱ्या खेपेस मी एकटाच गेलो. तेव्हा दिवाणाने (मोतीलाल) म्हटले की तुम्ही याच कामासाठी (विश्वासरावाचे प्रकरणी) आला आहात की दुसरे काही आहे. मी म्हटले दुसरे काय असणार. पण मी हजर आहे.

मोतीलालाने मला गुप्तपणे तंबूत नेले. तंबूच्या एका भागात राजा बाबू पंडित हा जखमी होऊन बसला होता. त्याच्याशी थोडे बोलणे झाले. त्यानंतर दुसऱ्या तंबूत मला नेण्यात आले. तेथे जनकोजीराव जखमी होऊन बसला होता. त्याच्या डोक्यावर एक बुऱ्हाणपुरी शेला होता. आणि पायावर गुजराती मश्रूचा जांध्या (मांडचोळणा) होता. त्याच्या हातावर एक गोळीची आणि एक भाल्याची अशा जखमा होत्या. त्याने आपल्या फेट्याने हाताला बांधून हात लटकत ठेविला होता. जनकोजी हा तरुण आणि देखणा असून वीस वर्षाचा होता. मला पाहून त्याने मान खाली घातली. मी म्हटले ''रावसाहेब, असे काय करता, तुम्ही शूराला जे करता येणे शक्य आहे ते केले आहे. तुमच्या शौर्याच्या कथा दीर्घकाळपर्यंत जगाच्या पाठीवर टिकतील. परमेश्वरी इच्छेपुढे इलाज नाही.'' जनकोजीने म्हटले, ''मी युद्धात पडलो असतो तर बरे झाले असते. पण नशिबाने हे असे घडले. आता हे लोक माझ्याकडून रकमेची अपेक्षा करीत आहेत. ते काही कठीण नाही. पण या ठिकाणी रकम मिळत नाही. तुम्ही माझ्या वडिलांना ओळखत होता. शुजाउद्दौलाच्या आणि माझ्या घराण्यात वडिलांपासून स्नेह आहे. माझ्या वडिलांनी त्यांच्या वडिलांचे काम केले आहे. यावेळी नबाबसाहेबांनी मज पीडिताची मदत केल्यास बरे होईल.''

मी म्हटले. ''नबाबसाहेब या वेळी मागे पुढे करणार नाहीत. किती रकम मागतात'' मोतीलाल म्हणाला की सातलाख रुपये मागतात असे दिसते. पण यावरच अडतील असे नाही, कमी जास्तीवरही याचा निकाल होऊ शकेल.

मी निरोप घेऊन निघालो. तो शुजाउद्दौल्याकडे आलो. त्यावेळी शुजाउद्दौला आणि नजीबुद्दौला हे एका मसनदीवर बसून नाच पहात होते. मी सगळी हकीकत सांगितली. नजीबुद्दौला हा अतिशय हुशार आणि चौकस होता. जनकोजी कैद झाल्याचा त्याला वहीम होता. तो हेराकडून बातम्या मिळवी. मला माहीत होते की त्याचे आणि शिंदे घराण्याचे हाडवैर होते. म्हणून मी त्यावेळी जनकोजीसंबंधी काही बोललो नाही. मैफिलीतून उठून गेल्यानंतर ते दोघे दुसरीकडे बसले. त्यावेळी नजीबुद्दौला शुजाउद्दौल्याला म्हणाला की यांच्या चेहेऱ्यावर असे वाटते की हा तुम्हाला काही गोष्टी सांगू इच्छितो पण मी येथे असल्यामुळे सांगू इच्छीत नाही. शुजाउद्दौला म्हणाला की तुमच्यात आणि माझ्यात परकेपणा थोडाच आहे. असे म्हणून त्याने मला बोलाऊ पाठविले. आणि मला गंगेची शपथ घातली. आणि म्हटले की काय असेल ते बोला, निरुपाय होऊन मी हकीकत सांगितली.

नजीबुद्दौला हा धूर्त आणि धोरणी होता, हे ऐकताच तो आनंद दर्शवून म्हणाला,

''वा: उत्तम, लोक अशाच वेळी दुसऱ्यावर उपकार करतात. आपण याचा निर्णय घ्या. जी रक्कम ठरेल त्याची निम्मी रक्कम मी देईन.'' असे तो वरकरणी बोलला पण शुजाउद्दौल्याच्या येथील बैठक आटोपल्यावर नजीबुद्दौला शहावली खानाकडे गेला आणि त्याने त्याला सगळी हकीकत सांगितली. नजीबुद्दौला हा शिंद्याचा काटा काढू इच्छित होता. आणि शहावलीखानाचे बर्खुर्दारखानाशी वाकडे होते. यामुळे शहावलीखान बादशहाकडे गेला आणि सगळी हकीकत त्याने बादशहाच्या कानावर घातली. अहमदशहाने बर्खुर्दारखानाला बोलावू पाठविले. त्याने या गोष्टीचा साफ इन्कार केला. मलासाक्षीकरिता बोलावण्यात आले. तरी बर्खुर्दारखान कबूल होईना. शेवटी बादशहाने त्याच्या गोटाचा झाडा घेण्यासाठी नसक्ची नेमले. मग बर्खुर्दारखानाने आपल्या माणसांबरोबर सांगून पाठविले की जनकोजीचा ताबडतोब वध करून तेथेच पुरून टाका. त्याचा कुणालाही पत्ता देखील लागता कामा

नये. परमेश्वराच्या इच्छेने जनकोजीची अशी गत झाली.

इब्राहीमखान गार्दी जखमी होऊन शुजाउद्दौल्याच्या लष्करात आला होता. त्याला गुपचुपपणे आपल्या सुभ्यात रवाना करावे असे शुजाउद्दौल्याने ठरविले होते. ही बातमी अहमदशहाच्या सरदारांना कळली. त्यांनी ती बादशहापर्यंत पोहोचविली. अहमदशहाने शुजाउद्दौल्याला बोलावू पाठवून त्याला लघळपणे म्हटले ''तुम्हाला मी आपला मुलगा समजतो. तुमच्यामुळे हा जय मिळाला आहे. खरे सांगा इब्राहीमखान तुमच्या लष्करात आहे की नाही.'' शुजाउद्दौल्याने प्रथम इन्कार केला. मग अहमदशहाने शपथ घातली तेव्हा तो हो म्हणाला. त्याच वेळी पूर्वी ठरल्याप्रमाणे दुराणी शिपायांनी गर्दी केली आणि ओरडू लागले की इब्राहीमखान आमचा शत्रु आहे. त्याच्यामुळे आम्ही लोक मारले गेलो. त्याला आमच्या हवाली करा. नाहीतर ज्याने त्याला आपल्यापाशी ठेविले असेल त्याच्याशी आम्ही लढू. शुजाउद्दौल्यालाही त्वेष चढला. त्याच्यात आणि दुराणी शिपायात कटकट होणार असा रंग दिसू लागला. शहावलीखानाने शुजाउद्दौल्याला एकातांत नेले. आणि म्हटले की एक आठवड्याकरिता इब्राहीमखानाला तुम्ही माझ्या हवाली करा. नंतर त्याला बरा करून सुरक्षित तुमच्या हवाली करतो. शुजाउद्दौला म्हणाला ''न जाणो तुम्ही दगा कराल.'' यावर शहावलीखानाने कुराणाची शपथ घेतली. यावर निरुपाय होऊन शुजाउद्दौल्याने इब्राहीमखानाला शहावलीखानाच्या हवाली केले.

अहमदशहाने इब्राहीमखानाला आपल्या समोर बोलाविले आणि विचारले ''तू इब्राहीमखान आहेस काय'' तो म्हणाला ''हो.'' अहमदशहा म्हणाला, ''तुझी ही काय बहादुरी आहे (जीवंत राहिलास)'' तो म्हणाला, ''परमेश्वरी इच्छेपुढे कुणाचेच काही चालत नाही. माझे मालक माझ्या आधी दोन घटिका रणात पडले. मी या परिस्थितीत सापडलो. आता आयुष्य राहिले आणि बादशहांनी चाकरीत घेतले तर यापेक्षाही जास्त कामगिरी करून दाखवीन.'' नंतर अहमदशहाने त्याला शहावलीखानाकडे त्याची वास्तपुस्त करण्याकरिता म्हणून हवाली केले. तेथे त्याच्या जखमेवर विष बांधण्यात आले आणि त्याला वाईट अन्न देण्यात आले. अहमदशहा दिल्लीत दाखल झाल्यानंतर सात दिवसांनी इब्राहीमखान वारला.

विजयानंतर दुसऱ्या दिवशी अहमदशहाने उंची जामानिमा केला. हिंदुस्थानच्या बादशहाकडून नादिरशहाने घेतलेली आणि त्याच्याकडून मिळालेली रत्ने त्याने आपल्या अंगावर धारण केली. आणि नंतर तो घोड्यावर स्वार होऊन निघाला. त्याने युद्ध भूमीची पाहाणी केली. ठिकठिकाणी प्रेतांच्या राशी पडल्या होत्या. अशा बत्तीस राशी होत्या. काहीत पाचशे, तर काहीत सातशे, तर काहीत हजार प्रेते होती. तीन-चार राशीत तर दीड-दीड हजार प्रेते होती. त्या लोकांनी कंबरा कसून अत्यंत शौर्य गाजवून आपले प्राण सोडले होते. भाऊने आपल्या छावणी भोवती खंदक खणला होता. तो सगळा प्रेतांनी भरून गेला होता. याशिवाय पानीपत गावाभोवती आणि जंगलांत प्रेते पडली होती. त्यांची मोजदाद करणे अशक्य आहे.

अहमदशहाने पानीपत गावात जाऊन बू अली कलंदर या साधूच्या समाधीचे दर्शन घेतले. तो आपल्या डेऱ्यात गेला.

शुजाउद्दौल्याने शेकडो भिस्ती (पाणी वाहाणारे) आपल्याबरोबर घेतले आणि रणांगणावर मराठे सरदारांची प्रेते शोधून काढण्याचा प्रयत्न केला. विशेषत: भाऊचे प्रेत शोधून काढण्याचा खूप प्रयत्न केला. शशधर पंडित आणि गणेश पंडित हे मराठ्यांचे वकील आणि इतर काही माणसे कैद होऊन आली होती. ते लोक भाऊ आणि इतर सरदारांच्या जवळ नेहमी असत. त्यांना बरोबर घेऊन शुजाउद्दौला भाऊच्या प्रेताचा कसून शोध करू लागला.

यशवंतराव पवार, जाधव वगैरेंची प्रेते आढळली. कोणी कुठपर्यंत काय काय पाहू शकेल. दुसऱ्या दिवशी तपास काढता एका माणसाने सांगितले की मैदानावर पावकोसाच्या अंतरावर पुष्कळ प्रेते पडली आहेत आणि ती सरदारांची दिसतात. शुजाउद्दौला तेथे पोहोचला. आणि एक प्रेत काढून त्याला धुण्यात आले. प्रेत काढतांना त्यावरून मूल्यवान मोती खाली पडले. त्यावरून हा सरदार आहे याची खात्री पटली. शुजाउद्दौल्याने ते मोती, शशधर पंडित बरोबर होता, त्याला दिले. त्याने प्रेत पाहून हे भाऊचेच प्रेत आहे असे सांगितले. त्यात एक काळा तीळ लहान पैशाएवढा, पाठीवर मुजफ्फरखानाने केलेली कट्यारीची जखम, पायावर मत्स्याची खूण, अशा खुणा शरीरावर दिसल्या. भाऊ पस्तीस वर्षाचा तरुण आणि मजबूत शरीराचा होता. तो रोज बाराशे सूर्यनमस्कार घालीत असे. नमस्कारामुळे त्याचे दंड आणि मांड्या यावर घट्टे पडलेले होते.

त्यावेळी एक दुराणी शिपाई तेथे आला. तो दूर उभा राहून हे सर्व पाहात होता. तो हसला. मी शुजाउद्दौल्याला म्हटले की हा दुराणी शिपाई बऱ्याच वेळेपासून उभा असून हसत आहे. कदाचित या प्रेतासंबंधी त्याला काही माहिती असावी. शुजाउद्दौल्याने त्या दुराणी शिपायाला बाजूला नेऊन पुसले. तो म्हणाला, ''युद्धाच्या वेळी मी याला पाहिले होते. हा एका मोठ्या घोड्यावर स्वार होता. युद्धात याच्या मांडीखाली दोन घोडे ठार झाले. दुसऱ्या खेपेस हा घोड्यावर स्वार झाला त्यावेळी याला दोन जखमा झाल्या. एक जखम गोळीची आणि दुसरी भाल्याची, त्यामुळे तो घोड्यावरून खाली आला. त्याचवेळी त्याच्या फौजेचा मोड झाला. हा तरुण धीराने वागत होता. त्याच्या अंगावर जड जवाहीर होते. आणि हातात भाला घेऊन तो हळूहळू मैदानातून बाहेर चालला होता. तो आम्ही चार स्वार त्याच्या अलंकाराच्या आशेने त्याच्यापाशी आलो. आम्ही त्याला घेरले. मी त्याला विचारले ''मिया, तू कोण आहेस? तू कोणी सरदार असलास किंवा भाऊ असलास तरी खरे सांग. तुला अभय आहे. तू म्हणशील तेथे आम्ही तुला पोहोचवू.'' तो काहीच बोलला नाही. माझ्या बरोबरीचा एक स्वार रागावला. त्याने एक बाण मारला. या माणसाने त्याला आपल्या भाल्याने जखमी केले. निरुपाय होऊन त्याला ठार मारण्याचे आम्ही ठरविले. त्याने दोघांना भाल्याने जखमी केले. शेवटी आम्ही त्याचे डोके कापले. ते डोके एका माणसापाशी आहे. ही शेवटची गोष्ट त्याने लपवून ठेविली, कारण शेवटी शीर त्याचेपाशीच सापडले. सारांश शुजाउद्दौल्याने ते प्रेत आणि संताजी वाघाचे प्रेत (त्याच्यावर तलवार आणि इतर शस्त्रांच्या जवळजवळ चाळीस जखमा होत्या), अशी दोन प्रेते हत्तीवर घालून आणली. आणि अहमदशहाला सगळी हकीकत कळविली. अहमदशहाने शुजाउद्दौल्याच्या भिडेमुळे आज्ञा केली की ती प्रेते आणि विश्वासरावाचे प्रेत यांचे हिंदूंच्या पद्धतीप्रमाणे दहन करण्यात यावे. हिंदूंचे जे जे संस्कार असतील ते करण्यात यावे. त्याने वीस नसक्ची व्यवस्थेकरिता तैनात केले. दहन समयी कोणी गडबड करू नये म्हणून ही व्यवस्था होती.

त्याप्रमाणे ती तीन शवे शुजाउद्दौल्याने माझ्याकडे दिली आणि म्हटले की तुम्ही त्यांच्या जातीचे आणि देशाचे आहात. तुमच्या पद्धतीप्रमाणे दहनविधी पार पाडा. राजा अनूपगीर आणि बादशहाचे वीस नसक्ची माझ्या बरोबर देण्यात आले. बादशहा आणि शुजाउद्दौला यांच्या छावणीच्या मध्ये एके ठिकाणी ती शवे नेण्यात आली. गंगाजलाने त्यांना स्नान घालण्यात आले आणि चंदनाची चिता रचून त्याचे दहन करण्यात आले. त्यावेळी भाऊच्या लष्करातून पळून आश्रयाला आलेली दोन हजार माणसे माझ्या बरोबर होती. सगळ्यांची खात्री झाली की हे शव भाऊचेच होय.

दहन केल्यानंतर दिवस मावळण्यास दोन घटिका राहिल्या असता आम्ही आपल्या स्थळी आलो.

रात्रीच्या वेळी शुजाउद्दौल्याने दुराणी शिपायाने काय केले याची हकीकत शहावलीखानास सांगितली. तो दुराणी शिपाई बरखुर्दारखानाच्या गोटांतील होता. शहावलीखानाने त्याला बोलावून त्याचे समाधान केले की शवावरील अलंकार तू घेतले असशील तर ते आम्ही तुझ्याकडून काढून घेऊ अशी भीती तू मुळीच बाळगू नकोस. मी तुला क्षमा करतो. पण शीर कुठे आहे ते सांग. ते घेऊन ये. दुराणी शिपायाने रुमालात शीर घालून ते वजीरासमोर टाकले. मराठ्यांचा वकील राजा बाबू पंडित हा कैद झाला होता. त्याला बोलावून ते शीर दाखविण्यात आले. त्याने पाहून म्हटले की हे शीर भाऊसाहेबांचेच होय. ते माझे मालक होते. त्यांचे उपकार माझ्यावर आहेत. कृपाकरून ते माझ्या हवाली करा. म्हणजे मी त्याचे विधिपूर्वक दहन करीन. वजीर हसला. त्याने ते शीर राजा बाबू पंडित याच्या हवाली केले. आणि आपले नसक्ची त्याच्या बरोबर दिले. राजा बाबू पंडिताने ते डोके शाही छावणीच्या बाहेर नेले आणि त्याचे दहन केले. त्यावेळी भाऊ मारले गेले याची खात्री झाली. ही झाली युद्धाची आणि भाऊच्या मरण्याची तपशीलवार हकीकत. लांब लांबून माणसे आली. त्यांच्याशी अधिक तपास केला तेव्हा समजले की मल्हारराव, दमाजी गायकवाड, विठ्ठल शिवदेव वगैरे सरदार जिवंत निसटले. भाऊची लग्नाची दुसरी बायको पंचवीस वर्षाची होती. तिला एका सेवकाने घोड्यावर बसवून नेले. रात्रंदिवस प्रवास करून ती सूरजमलपाशी पोहोचली. राजा सूरजमलने तिचा आदर सत्कार केला. तिला वस्त्रे, पालखी, प्रवासखर्च आणि संरक्षणासाठी माणसे तिच्याबरोबर देऊन त्याने तिला झांशीला पोहोचविली. तेथून ती दक्षिणेकडे गेली. शमशेर बहादुरला जंबूरकच्या गोळीची जखम झाली होती. त्या अवस्थेत तो दीग येथे पोहोचला. राजा सूरजमलने त्याचे उपचार केले. पण तो बरा न होता मृत्यू पावला. त्याची कबर दीग येथे बांधण्यात आली.

विजयानंतर पाच दिवसांनी अहमदशहा दिल्लीकडे रवाना झाला. चार मजला करून तो दिल्लीत दाखल झाला. हिंदुस्थानात राज्य कायम करावे असा त्याने विचार केला. पण परमेश्वराची तशी इच्छा नव्हती. शुजाउद्दौला दिल्लीला पोहोचल्यावर, मराठ्यांच्या लष्करातून पळून आलेली जवळ जवळ तेवीस हजार माणसे, यांना त्याने आपली माणसे बरोबर देऊन, माहोदल आणि पुलोल ही जाटांच्या मुलुखात होती तिकडे पाठविली.

दिल्लीस पोहोचल्यानंतर आठ दिवसांनी परमेश्वरी योगायोगाने दुराणी शिपायांनी दंगा केला. ते म्हणाले ''दोन वर्षे झाली. तुम्ही आम्हाला स्वदेशातून आणले. तुम्ही वचने दिली होती. या अवधीत तुम्ही आमचा पगार दिला नाही. पगार नसल्यामुळे आमची ही स्थिति झाली आहे. तुम्हाला जय मिळाला आहे. आता स्वदेशाला परत चला. आम्हीही आपापल्या घरी जाऊन बायकापोरांना भेटू.'' काही दिवस असाच गोंधळ चालला होता.

याच सुमारास एका बाईवरून दुराणी शिपायांनी शुजाउद्दौल्यावर आळ देऊन त्याच्याशी भांडण सुरू केले. याने चिडून जाऊन शुजाउद्दौला शहावली खानाला म्हणाला, ''हीच का तुमची वचने. मला बोलाविलेत आणि आता माझ्याशी अशी वागणूक करता काय.'' शहावली खानाने त्याला समाधानाच्या बऱ्याच गोष्टी सांगितल्या. तो म्हणाला की अहमदशहाला तुझे फार अगत्य आहे. हे दुराणी शिपाई म्हणजे शुद्ध सैतान आहेत. यानंतर वजीराने शुजाउद्दौल्याला आलिंगन देऊन त्याला निरोप दिला.

तेथून परत डेऱ्यास आल्यावर शुजाउद्दौल्याने आपल्या मित्रांशी आणि मुत्सद्यांशी सल्ला मसलत केली. सर्वांनी सल्ला दिला की आता येथे राहणे योग्य नाही. त्याच दिवशी तीन प्रहरी दिल्लीहून तो निघाला. पहिल्या दिवशी त्याने पंधरा कोसाची मजल मारली. असेच मजल दर मजल करीत पाचव्या दिवशी शुजाउद्दौला आणि त्याच्या बरोबरीचे सैन्य गंगेवर मेहदीघाट येथे पोहोचले. होळीच्या एक दिवस आधी त्यांनी गंगा ओलांडली आणि

सुरक्षितपणे ते आपल्या सुभ्यात पोहोचले.

या नंतरच्या आलेल्या बातम्यांवरून कळले की अहमदशहाने ठरविले की हिंदुस्थानात राहिले तर आपल्याच फौजेकडून आपल्याला धोका आहे. त्याने हिंदुस्थानच्या राज्याचा विचार टाकून देऊन स्वदेशाकडे कूच केले. एक वर्षात झालेल्या खर्चाबाबत त्याला नजीबुद्दौल्याने चाळीस लाख रुपये दिले.

मराठे आणि अहमदशहाच्या युद्धाची हकीकत मी एकोणीस वर्षानंतर लिहिली आहे. जे जे पाहिले ते मांडण्यात काही कसूर केली नाही. मराठ्यांचे गर्वहरण करून त्यांचा निकाल लावण्याकरिता परमेश्वराने शहा दुराणीला आणिले.

तारीख नऊ रबिउस्सानी १२२७ हिज्री रोजी (१८१२) लखनौ येथे लिहिली गेली.

(येथे काशिराजाच्या बखरीचा अनुवाद संपला. ब्राउन आणि जदुनाथ यांनी ज्या प्रतीवरून इंग्रजी अनुवाद केले ती अगर त्या प्रती लंडन येथे आहेत. जदुनाथांनी अनुवादिलेली प्रत इ. स. १७८५ त लिहिली गेली आहे. रामपूरची प्रत इ. स. १८१२ ची आहे. दोन्ही प्रतीतील मजकूर सर्वसामान्यपणे तोच असला तरी काही ठिकाणी थोडा बहुत बदल आढळतो, तो किती आणि कोठेकोठे आहे हे ब्राउन आणि जदुनाथांचे अनुवाद वरील मराठी अनुवादांशी ताडून पाहिल्यास दिसून येईल.)

## अहवाले नजीबदौला

('अहवाले नजीबदौला' या ग्रंथाचा कर्ता बिहारीलाल याचे घराणे नजीबखानाचे पिढीजाद नोकर होय. त्याचा चुलता मनसुखराय हा नजीबखानाचा मुलगा जाबिताखान याचा कारभारी होता. बिहारीलालने इ. स. १७८७ मध्ये नजीबखानाचे छोटेसे चरित्र फारसी भाषेत लिहिले. तो ग्रंथ अद्याप प्रसिद्ध झाला नाही पण त्याचा इंग्रजी अनुवाद सर जदुनाथ सरकार यांनी केला आहे. त्यातून पानीपतसंबंधीचा मजकूर पुढे दिला आहे.)

काही काळाने माधवराव शिंद्यांचा सरदार दत्ता पाटील याने नजीबखानाकडे वकील पाठवून हरिद्वार आणि ज्वालापुर ही हिंदूंची तीर्थक्षेत्रे आपल्याला देण्यात यावी अशी मागणी केली. नजीबने मागणीला नकार दिला. यातूनच नजीबखान आणि मराठे यात विरोध निर्माण झाला. नजीबखानाने शुक्रताल तेथे ठाण मांडून दहाबारा हजार स्वार आणि पायदळासहित मराठ्यांशी लढाई चालू केली. याठिकाणी गंगेच्या काठावर पुष्कळ खोल डोह आहेत. नजीबखानाने सादुल्लाखान, दुंदीखान, हाफिज रहमत आणि सरदारखान बख्शी या रोहिले सरदारांना लिहिले की तुम्हाला आपला प्रदेश वाचवायचा असेल तर मला मदत करा. नाहीतर मराठे मला हाकलून लाविल्यानंतर तुम्हाला सोडणार नाहीत. अशाच प्रकारची पत्रे त्याने शुजाउद्दौल्याला लिहिली. इ. स. १७५९ चा पावसाळा त्याने मराठ्यांशी लढण्यात घालविला. मराठ्यांपाशी सत्तर हजार सैन्य होते. हाफिज आणि इतर रोहिले सरदार चांदपुर आणि इतर परागण्यात निवळ बसून राहिले. नजीबला कोणीच येऊन मिळाले नाही. फक्त आम्ही येत आहोत या अर्थाची पत्रे त्यांनी पाठविली. शेवटी मराठ्यांनी सबलगडच्या घाटापाशी रोहिल्यांच्या मुलुखात प्रवेश केला. तेथे सरदारखान बख्शी रोहिला होता. मराठ्यांनी गंगेच्या डाव्या काठावरील सर्व महाल लुटले. आणि मग हाफिज आणि इतर सरदारांना टाळून त्यांनी पुढे कूच केले आणि जलालाबादचे गाव जाळून फस्त केले.

नबाब शुजाउद्दौला आणि नजीबखान यांचा स्नेह होता. म्हणून नजीबखानाच्या मदतीला तो धावून गेला. त्याचे सैन्य मुरादाबादेपर्यंत आले असे पाहू मराठे काहीसे मागे हटले. यापूर्वी हाफिज रहमतखान आणि इतर रोहिले

सरदार गंगेच्या काठावर पोहोचले होते. शुजाचे सरदार उमरावगीर वगैरे हे पण गंगेच्या काठावर पोहोचले. तोपर्यंत मराठ्यांनी गंगा ओलांडली होती.

नजीबखान मराठ्यांच्या तावडीत सापडला त्यावेळेपासून त्याने अहमदशहाला सतत पत्रे पाठविली, ''दक्षिणी मराठ्यांनी मला कोंडले आहे. आपल्या जातीच्या लोकांना वाचवायचे असेल तर यावे'' अशा अर्थाची पत्रे गेली. अहमदशहाने पत्र पाहताच तडक कूच केले आणि तो कुंजपुऱ्यास पोहोचला. अहमदशहा येत आहे हे लोकांस खरे वाटले नाही. ते म्हणाले की नजीबखानाच्या सांगण्यावरून कुंजपुऱ्याच्या रोहिल्यांनी अफगाणासारख्या टोप्या वापरण्यास केली आहे. यावरून अहमदशहाचे सैन्य येत आहे अशी हूल उठली आहे. पण जेव्हा अहमदशहाने हिंदुस्थानच्या सरदारांना लिहिलेली पत्रे येऊन थडकली तेव्हा सर्वांना वस्तुस्थिति कळून आली. शुजाउद्दौला घाबरला. त्याने नजीबखानाला म्हटले ''मला आपल्या राज्यात पुष्कळ कामे आहेत. मी जातो. आता काय अफगाणांचा बादशहाच तुमच्या मदतीला येत आहे.'' असे बोलून तो आपल्या प्रांताकडे परतला. अहमदशहा येत आहे हे पाहून मराठ्यांचे धैर्य खचले आणि ते मागे हटले. अहमदशहाने कुंजपुऱ्याच्या घाटावरून यमुना ओलांडली. आणि सहारणपूर गाठले. तेथे नजीबखान, हाफिज रहमत, दुंदीखान आणि इतर रोहिले सरदार अहमदशहाला जाऊन मिळाले. नजीबखान आणि दत्ताजी पाटील यात लढाई झाली. त्यात दत्ताजी मारला गेला. मूर्तुजाखान बारेच नावाचा समाना गावचा सरदार होता. त्याने दत्ताजीचे डोके कापून आणिले.

त्यानंतर भाऊ, समशेरबहादुर आणि इतर मराठे सरदार एक लाख पायदळ आणि घोडेस्वारांचे सैन्य घेऊन नजीबखानाविरुद्ध आले. पानीपतजवळ मराठ्यांनी आपली छावणी कायम केली. तेथे त्यांची अहमदशहा, नजीबखान, शुजाउद्दौला आणि कटेहर (रोहिलखंड)च्या रोहिले सरदारांबरोबर युद्धे झाली. सात-आठ दिवसांनी मराठा सैन्याची फार कुचंबणूक होऊ लागली. बाहेरून मराठा सैन्यांनी छावणीतील सैन्याची कुमक करण्याचा प्रयत्न केला. पण अहमदशहाच्या दुराणींनी त्यांचा नाश केला. गोविंदपंत बुंदेले हा तीस हजार स्वार आणि पायदळ घेऊन ग्वालेरीच्या बाजूने मराठ्यांना मदत करण्यास आला होता. अहमदशहाला ही बातमी कळताच त्याने हाजी अताईखान आणि सरफराजखान यास त्यांच्याविरुद्ध पाठविले. त्यांनी संबलका या गावाहून गोविंदपंताविरुद्ध कूच केले. गोविंदपंत तेथून चाळीस कोसाच्या अंतरावर होता. पण अहमदशहाच्या सैन्याने एका रात्रीत ती मजल मारली. आणि सकाळी ते गोविंदपंताच्या सैन्यावर तुटून पडले. त्याचे सैन्य गाफिल होते. काहीजण झोपेत होते तर काही पूजेत गुंतले होते. दुराणीच्या पाच हजार शिपायांनी गोविंदपंतांच्या तीस हजार सैन्याची कत्तल केली. आणि त्यांची डोकी कापून हिंदान नदीत फेकून दिली. अशा रीतीने हा हा म्हणता बुंदेल्यांचा नाश करून दुराणीची फौज परत आली.

नजीबखानाने आपल्या प्रदेशातून अहमदशहाच्या छावणीत रसदेचा पुरवठा केला. प्रथम प्रथम तुटवडा होता. पण मराठ्यांचे सैन्य मात्र हलाखीला पोचले. -

चुलता इब्राहीमखलीलखान युद्धात मारला गेला. नजीबखानाचे सैन्य मराठ्यांच्या छावणीत घुसले होते ते रात्र झाल्यामुळे परत आले. नजीबखानाचे जवळ जवळ सातशे शिपाई या चकमकीत मारले गेले. कित्येक मराठेही मारले गेले. नजीबखान आपल्या तळाला परत आला.

मराठ्यांनी छावणी केल्यानंतर तळाभोवती जवळ जवळ सातशे तोफा चढविल्या. गार्दी पायदळ जवळ जवळ तीस हजार होते. मराठ्यांचे सैन्य एकंदरीत सत्तर ते ऐंशी हजार होते. दुराणींनी त्यांचा इतका कोंडमारा केला की मराठ्यांच्या छावणीत रसद पोहोचणे अशक्य झाले. प्रत्येक चकमकीत दुराणींना यश मिळत गेले. शेवटी

निवळ उपासमार झाल्यामुळे मराठे आपल्या छावणीतून बाहेर पडले. नजीबखान आणि मल्हारराव यांचा स्नेह होता. म्हणून त्याने मल्हाररावला मराठा सैन्यातून पळून जावे, आपण आडकाठी करणार नाही, असा निरोप पाठविला. दुराणींचे आणि दुंदीखानाचे शूर सैन्य मराठ्यांवर तुटून पडले. मराठ्यांचा पराजय झाला. त्यांची पन्नास हजार माणसे आणि जनावरे या लढाईत पडली. मराठ्यांनी पळ काढण्यास सुरुवात केली. वाटेल त्या लोकांनी त्यांना लुबाडले. दुराणीच्या सैन्याने त्यांचा पाठलाग केला आणि सोनपतच्या आसपास त्यांची कत्तल केली. दुंदीखानाचे कित्येक लोक लढाईत पडले. रोहिले आणि दुराणी यांच्या हाती कोट्यावधी रुपयांची संपत्ती पडली. पाडाव झालेले घोडे रुपयाला एक या हिशेबाने विकले गेले कारण उपासमारीमुळे त्यांच्यात पळण्याचे त्राण राहिले नव्हते.

**शहाअलमनामा**

(शहाअलमनाम्याचा लेखक गुलामअलीखान हा शहाआलम बादशहाचा मुलगा मिर्जा जवानबख्त जहांदारशहा याच्या पदरी होता. त्याने इ. स. १७९० च्या सुमारास शहाआलम बादशहाच्या कारकिर्दीचा इतिहास लिहिला आहे. या ग्रंथाच्या तीन खंडापैकी पहिला भाग एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगालने इ. स. १९१४ मधे प्रसिद्ध केला आहे. यात पानीपतसंबंधी मजकूर आला आहे. मूळ फारशीवरून केलेला मराठी अनुवाद खाली दिला आहे.)

(१७०) भाऊ आणि विश्वासराव हे मराठ्यांचे उमदे सरदार होते. पंजाबमधून मराठ्यांची फौज दुर्दशा पावून आली होती. त्या पराजयाचा सूड घेण्याच्या उद्देशाने त्यांच्याबरोबर फौज रवाना झाली. बाळाजी हा त्यांचा मुख्य होता. त्याने दोनतीन लाखाची जंगी आणि तोफखान्याने सुसज्ज असलेली फौज त्यांच्याबरोबर पाठविली आणि तो स्वत:ही त्यांच्या मागोमाग निघाला. भाऊ आणि विश्वासराव हे दिल्लीपाशी पोहोचले. नदीला पूर आल्याने अहमदशहाला आपल्या सैन्यासह नदी ओलांडणे शक्य झाले नाही. तो नदीपलीकडे छावणी करून राहिला. नजीबखान त्याच्याबरोबर होता. दिल्लीचा किल्लेदार वजीर शहावलीखानाचा आप्त याकूबअलीखान हा होता.

(१७१) शुजाउद्दौला, हाफिज रहमतखान, दूंदेखान आणि इतर सरदार अहमदशहापाशी होते. त्यावेळी अहमदशहाचा तळ कोल (अलीगड) व जालेश्वरच्या भागात होता. सूरजमल जाट मराठ्यांच्या धर्माचा असल्यामुळे त्यांना मिळाला आणि सगळ्या कलहाचे मूळ असलेला गाजिउद्दीन हाही त्यांना मिळाला. त्यानेच सूरजमलचे मन वळवून बादशहाच्या चाकरीतून त्याला परतविले. त्याचे मन वळविल्यावर ते दोघे मराठ्यांच्या छावणीकडे रवाना झाले. दिल्लीला आल्यानंतर त्यांनी याकूब अलीखानाशी झगड्याचा प्रसंग आणला. मराठ्यांच्या असंख्य सैन्याशी टक्कर घेण्याचे याकूब अलीखानाला सामर्थ्य नव्हते. म्हणून तो किल्ल्यात राहिला आणि शक्य तो बंदोबस्त त्याने केला. इतक्यात मराठ्यांनी शहरात लूट मार करण्यास सुरवात केली. त्यांच्या पेंढाऱ्यांनी लोकांच्या घरात सापडेल ते नेले.

(१७२) यानंतर मराठे नदीच्या बाजूने किल्ल्याकडे आले. त्यांनी तटावर गोळे टाकले. त्यांची दोन तीनशे माणसे असदबुरुजाकडून चढून आत उतरली आणि त्यांनी लूटमार करण्यास सुरवात केली. हे पाहून याकूब अलीखानाने त्यांना हाकलून लाविण्याकरिता शिपाई पाठविले. त्यांनी मराठ्यांना थोड्याशा मारामारीनंतर पकडले. आणि कित्येकांना ठार मारले. यानंतर याकूब अलीने किल्ल्याचा कडक बंदोबस्त केला. या सुमारास भाऊने त्याच्याबरोबर तडजोडीचे बोलणे लाविले आणि आपला बंदोबस्त किल्ल्यात राहावा अशी मागणी केली. याकूबअलीने पाहिले की किल्ल्यात शिबंदी थोडी आहे. धान्याचा साठाही कमी आहे. साधनसामग्रीही नाही आणि नदीपलीकडून

मदत येण्याचाही संभव नाही. या सर्व गोष्टींचा विचार करून तो तडजोडीला कबूल झाला. त्याने आपल्या माणसांसहीत किल्ला रिकामा करून मराठ्यांना दिला आणि स्वत; नदी पार करून अहमदशहाच्या छावणीत पोहोचला.

गाजिउद्दीनाने एका राजपुत्राला शहाजहान हे नाव देऊन बादशाहीवर बसविले होते. हे पूर्वी सांगितले आहे. आलमगीर (दुसरा) हा मारल्यानंतर त्याने हा बनाव घडवून आणला होता. शहाजहान हा निष्क्रीय आणि निकामी होता. तो केवळ नामधारी बादशहा होता.

(१७३) मराठ्यांनी हे पाहून त्याला गादीवरून काढण्याचे ठरविले. गाजिउद्दीनाचे कुटील हेतू त्यांनी ओळखले होते. सूरजमलच्या कारस्थानांचीही त्यांना माहिती झाली. त्यांनी गाजिउद्दीन आणि सूरजमल यांना कैद करण्याचे ठरविले. हे त्यांना कळताच ते रातोरात पळून सूरजमलच्या मुलुखात जाऊन बसले. सूरजमलच्या किल्ल्यातून साधन सामग्री चांगली होती. तेथे पोहोचून त्याने मराठ्यांना पुष्कळ लंगड्या सबबी सांगितल्या. भाऊचा मुख्य उद्देश अहमदशहाशी लढण्याचा होता. त्यामुळे सूरजमलशी त्याने भांडण उपस्थित न करता त्याला स्नेहाची पत्रे पाठविली.

बादशाही नोकर सैफुद्दौला सेफुद्दीन महंमदखान बहादुर आणि ताज महंमदखान खवास यांनी ही संधी चांगली आहे हे पाहून भाऊबरोबर बोलणी सुरू केली आणि मिर्जा जवान बख्ताला यौवराज्यावर बसविण्याची खटपट चालविली.

(१७४) काही लाख रुपये तूर्त देण्याचे आणि नंतरही कृपा करण्याचे त्यांनी अभिवचन दिले. असे म्हणून त्यांनी मराठ्यांचे मन वळविले. परमेश्वरकृपेने आणि बादशहाच्या भाग्याने सर्व काही मनासारखे घडून आले. या नंतर भाऊने शहाजहान (दुसरा) बादशहाला गादीवरून काढून त्याला महालात परत पाठविले आणि मिर्जा जवान बख्त जहांदारशहाला मसनदीवर बसविले आणि जीनत महाल इचा मानसन्मान केला.

(१७५) भाऊने सर्वांना जवानबख्ताची ताबेदारी करावी अशी आज्ञा केली. स्वत: मराठे सरदारांनी जवानबख्ताला मुजरा केला. त्यांना आणि नारोशंकर याला खिलतीचे पोशाक आणि जवाहीर, चेगा इत्यादी अलंकार देण्यात आले. इतरांना दोनशेपर्यंत दुशाली देण्यात आल्या.

काही काळाने मराठ्यांच्या फौजेचा प्रवासाचा थकवा दूर झाला. मराठे सरदारांच्या मनात युद्धाचे विचार खेळू लागले. ताज महंमदखान खवास याने त्यांना समजाविण्याचा प्रयत्न केला की अहमदशहाच्या फौजेशी लढणे योग्य नाही.

(१७६) त्याचा काही उपयोग झाला नाही. दिवाणेखासच्या चांदीच्या छतावर त्यांची नजर पडली. ते त्यांनी काढून घेतले आणि कोट्यावधि रुपयांचा माल त्यांनी बावीस लाख रुपयाला विकला.

यानंतर मराठ्यांचे असंख्य सैन्य सज्ज होऊन पानीपतच्या दिशेने चालू लागले. दिल्लीत हे सैन्य सुमारे दीड महिने होते. लाहोरपर्यंत धडक मारावी आणि तो मुलूख उध्वस्त करावा असा त्यांचा बेत होता. समदखान हा अहमदशहातर्फे सिरहिंदचा अधिकारी होता. त्याने कुंजपुरा येथे मराठ्यांशी लढाई केली. निकराचे युद्ध होऊन मराठ्यांचा जय झाला. दुराणीचे अनेक लोक मारले गेले. खुद्द समदखान शौर्याने लढता लढता मारला गेला.

(१७७) ही बातमी अहमदशहाला मिळताच त्याने कोलहून मराठ्यांच्या दिशेने कूच केले. अघाडीला नजीबखान; अहमदखान बंगश, हाफिज रहमतखान आणि दूंदेखान हे सरदार होते. त्यांच्या कुमकेला शुजाउद्दौल्याची

नेमणूक होती. पावसाळ्यामुळे नदीला इतका पूर होता की त्यावर पूल बांधणे कठीण होते. सैन्याला पार करता येईल असे दिसेना. पावसाळा संपेपर्यंत त्या दिशेने खटपट करणे जमेना.

या सुमारास मराठ्यांचा उमदा सरदार गोविंद पंडित हा इटावा वगैरे प्रांताच्या अधिकारावर होता. रसद आणि खजिना घेऊन तो दक्षिण्यांच्या छावणीकडे निघाला होता. ही बातमी अहमदशहाला कळताच त्याने गोविंदपंताचा बीमोड करण्याकरिता सरदारांना आज्ञा केली. त्याप्रमाणे अहमदशहाचे सरदार तडक कूच करून गोविंदपंतावर तुटून पडले. गोविंदपंत पळ काढण्याच्या प्रयत्नात होता. पण ते साधले नाही.

(१७८) तो व त्याची दोन-तीन हजार माणसे मृत्युमुखी पडली. त्याचे सैन्य गारत करून अहमदशहाची फौज छावणीला परतली.

यानंतर अहमदशहाच्या फौजेने सुलभतेने यमुना ओलांडली. मल्हारराव होळकर हा एक अनुभवी सरदार होता. त्याने सल्ला दिला की आपण गनिमीकाव्याने लढावे. अफगाणास्तानातून आलेल्या ताज्या दमाच्या फौजेशी लढण्याची आपल्याला कल्पनाही करवत नाही. पण गर्वाने भरून गेलेल्या भाऊला त्याचा सल्ला काय रुचणार. त्याने मल्हाररावावर राग केला आणि त्याला टाकून बोलला. भाऊ म्हणाला की आमची फौज जंगी आहे. जबरदस्त तोफखाना आणि युद्धोपयोगी सामान आमच्या जवळ आहे. मोठेमोठे सरदार आमच्या बरोबर आहेत. अहमदशहाचे सैन्य विजयी होईल असे तुला कसे वाटते? आम्ही लढू. जय मिळाला तर काबुलपासून ईराण पर्यंतचा मुलूख हातात येईल. आणि मेलो तर कल्पांतापर्यंत आमचे नाव गाजत राहील. तुमचा विचार शिपाईगिरी आणि सरदारी याला सोडून आहे.

(१७९) इतकेच नव्हे तर त्याने मराठ्यांची अब्रू मातीत मिळेल. सारांश भाऊला आपल्या सैन्याचा आणि पराक्रमाचा भारी मद चढला होता. तो कोणाचाही सल्ला ऐकेना. त्याने पानीपतला मजबूत छावणी बांधली आणि तेथे तो आपले सैन्य आणि गार्दी यांच्या सहित राहिला.

रोज उभयपक्षाच्या निकराच्या चकमकी झडू लागल्या. मराठे बाण, बंदुकी आणि तोफांच्या द्वारे प्राण पणाला लावून लढू लागले. अहमदशहाचे सैन्यही तितक्याच निर्धाराने लढू लागले. ते लढत लढत मराठ्यांना गोटात घालीत. पण मराठ्यांची छावणी अतिशय मजबूत होती. त्यावर लहान मोठ्या तोफा चढविण्यात आल्या होत्या. त्या तोफा म्हणजे लोखंडाचे डोंगरच होते. त्यांच्या माऱ्यापुढे अहमदशहाचे बेत टिकेनात. त्याच्या इच्छेला फळ येईना. हळूहळू पावसाळा संपेपर्यंत ही मोहीम रेंगाळू लागली. अशा रीतीने सहा महीने ही मोहिम लांबली.

(१८०) रोज लढाया होत. अहमदशहाच्या फौजेने हल्ले करून अनेकांना मारावे, मराठ्यांची रसद लुटावी, असे चाले. मराठ्यांच्या छावणीभोवती त्यांनी अखंड कडे बांधल्यासारखे केले आणि मराठ्यांची रसद अजिबात बंद केली. त्यामुळे त्यांची माणसे आणि जनावरे यांची उपासमारीने अत्यंत हलाकीची स्थिती झाली. मराठ्यांच्या सैन्यात यामुळे भयंकर गोंधळ उडाला आणि त्यांच्यात दुर्बलतेची चिन्हे दिसू लागली.

बाळाजीच्या कानावर ही हकीकत गेली. त्याने बैलाच्या पाठीवर पाच लाख रुपये लादून पाठविले. दिल्लीचा किलेदार नारोंकर याने ही रकम मराठ्यांच्या छावणीत पाठविण्याचे ठरविले. पण अफगाणांच्या भीतीने तो विचारांत पडला. पण मराठ्यांना पैशाची निकड होती म्हणून त्याने दीड लाख रुपये पाठविण्याची व्यवस्था केली. दीडशे शिपाई जमवून त्याने प्रत्येकापाशी एकएक हजार रुपये दिले आणि त्यांची रवानगी केली. ते लोक रात्रीच्या अंधारात रवाना झाले. दुर्दैवाने ते चुकून अहमदशहाच्या लष्करात शिरले. भल्या पहाटे त्यांनी छावणीतून अल्लाहोअकबर

आणि या अली या घोषणा ऐकल्या तेव्हा ते घाबरले.

(१८१) त्यांना पाहून अफगाणांनी त्यांची सरसकट कत्तल करून त्यांचा खजिना हस्तगत केला. यानंतर दोन हजार रोहिल्यांनी मराठ्यांच्या छावणीवर हल्ला केला. ते छावणीत घुसले आणि कित्येकांना ठार मारीत ते तोफखान्यापर्यंत आले. मराठ्यांत भयंकर गडबड उडाली. पण इब्राहीमखान गार्दी व मल्हारराव होळकर आणि इतर सरदार शूर आणि निर्धाराचे होते. भाऊचा त्यांच्यावर विश्वास होता. त्यांनी निकर करून रोहिल्यांना चहूबाजूंनी कोंडले. रोहिल्यांची या माऱ्यामुळे अत्यंत कठीण अवस्था झाली. ते निकराने लढू लागले पण त्याचा काही उपयोग न होता दोन हजार रोहिले मारले गेले. मराठ्यांपैकी एक मातबर सरदार आणि चार पाच हजार माणसे ठार अगर जखमी झाली.

(१८२) या गोष्टीचा मराठ्यांच्या मनावर फार परिणाम झाला. या हानीमुळे ते फार सचिंत झाले. रसद बंद होऊन गेल्याने त्यांची स्थिती हलाखीची झाली होती. आता लढण्याशिवाय काही उपाय राहिला नाही हे त्यांना दिसून आले. त्याप्रमाणे त्यांनी पूर्ण तयारी केली. ते अहमदशहाच्या सैन्यावर तुटून पडले. नजीबखान आणि सुजाउद्दौला आघाडीला होते. हाफिज रहमतखान, दूंदेखान, अहमदखान बंगश हे त्यांच्या पाठीशी होते. ते आपापल्या फौजा घेऊन पुढे झाले. आणि निकराने लढू लागले. अहमदशहा आपले अफगाण, किजलबाश आणि गुलामांची पलटण घेऊन मध्ये उभा राहिला.

(१८३) मैदानात युद्धाची एकच रणधुमाळी माजली. अजगरासारख्या तोफा ओकू लागल्या. जंबूरक हे सैनिकांचे प्राण हरण करू लागले आणि बाणांचा पाऊस पडू लागला. आणि बंदुकीच्या गोळ्या सुटून प्रत्येकाच्या कानात मृत्यूची बातमी सांगू लागल्या. युद्धाच्या भेरी आणि कर्णे यांच्या आवाजाने वीरांना स्फुरण येऊ लागले. सैन्याचा नाश करण्याकरिता प्रत्यक्ष मृत्यूच रणांगणात येऊन ठाकला. बाणांचा पाऊस पडू लागला आणि शिंपल्यात जलबिंदू जाऊन बसावे त्याप्रमाणे बाण शिपायांच्या तनुरूपी शिंपल्यात जाऊन बसू लागले. तल्वारीच्या आघातांनी वीरांच्या शरीराचे तुकडे होऊ लागले आणि घोड्यांच्या खोगिरी त्यांच्या रक्ताने रंगविल्या गेल्या. वीरांच्या आरोळ्यांनी दशदिशा दणाणून गेल्या.

(१८४) या पानावर लेखकाने कवितेत युद्धाचे वर्णन केले आहे. कवितेत चाळीस ओळी आहेत. ठरीव ठशाची वर्णने आहेत.

(१८५) लढाई अत्यंत निकराची झाली. परमेश्वरी इच्छेने जय मिळावयाचा होता. मराठ्यांचे सैन्य प्रचंड असूनही काही उपयोग झाला नाही. युद्धाच्या धुमश्चक्रीत भाऊ आणि विश्वासराव हे अनुभवी, शूर आणि निर्धाराच्या सरदारांना बरोबर घेऊन इतक्या त्वेषाने लढत होते की असे दृश्य काळाने आता पर्यंत पाहिले नसेल. या पूर्वीच्या कोणत्याही युद्धात असे जय्यत सैन्य मैदानात आले नसेल. भाऊ वगैरे सरदारांना बंदुकीच्या गोळ्या लागून ते गतप्राण झाले. दक्षिण्यांनी पाठ फिरविली आणि विजयाचा वारा अफगाणांच्या ध्वजाला फडकवू लागला.

शत्रूची अगणित लूट अफगाणांच्या हाती पडली. जड जवाहीर, सोने नाणे, आणि इतर जिनसा असा अंदाजे तीन-चार कोटीचा माल अफगाणांच्या हाती पडला. पानीपत पासून दिल्ली पर्यंत दहा पंधरा हजार दक्षिणी अफगाणांच्या तल्वारींना बळी पडले. नारोशंकराने हे सर्व ऐकिले. प्रतिकाराची शक्ती आपल्याला नाही हे पाहून तो लाल किल्ला सोडून पळून गेला.

(१८६) जीनत महालने आस्थेने नारोशंकराला सल्ला दिला की तुम्ही आपली चीजवस्तू आणि सरदारांचे

कबीले वगैरे घेऊन, अहमदशहाचे सैन्य येऊन दाखल होण्यापूर्वीच येथून त्वरित निघून जावे. पानीपताहून पळून येणाऱ्यांना लोकांनी नागविले पण जीनतमहालच्या कृपेने नारोशंकराला उपसर्ग झाला नाही. हबशखान हा लाल किल्ल्यांत नोकरीला होता. त्याने आपल्या माणसांना बरोबर घेऊन नारोशंकराशी पगारबाकीबद्दल झगडा केला. आणि त्याच्याकडून काही हजार आश्रफ्या उपटल्या. नारोशंकराने दिल्ली सोडताना सुरक्षिततेच्या दृष्टीने साडेतीन लाख रुपयाची रोकड आणि जिनसा जीनतमहालपाशी ठेव म्हणून ठेविल्या होत्या. गडबडीत त्या आपल्या बरोबर नेणे नारोशंकराला जमले नाही.

पण अहमदशहा दिल्लीला आल्यावर हे सर्व त्याच्या सैन्याच्या हाती पडले.

इब्राहीमखान गार्दी याचा वध करण्यात आला. त्याच्याबद्दल रदबदली झाली पण त्याचा उपयोग झाला नाही. अहमदशहाने हबशखानाकडून जवळ जवळ दहा हजार अश्रफ्या हिसकावून घेतल्या.

जीनत महाल आणि जवानबख्त हे अहमदशहाला बारा कोसावर नरेला या गावी सामोरे गेले आणि ज्याफत म्हणून अहमदशहाला एक लाख रुपये आणि वजीर शहावलीखान यास पन्नास हजार रुपये दिले.

## मनाजिल अल्फतूह

(महंमद जाफर शाम्लू हा इराणच्या बादशहाच्या पदरी होता. अहमदशहाच्या पानीपतच्या युद्धप्रसंगी तो हजर असून या युद्धावर त्याने एक छोटासा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाचे नाव मानजिलल्फतूह म्हणजे यशाचे टप्पे हे होय. हा ग्रंथ अद्यापी अप्रकाशित आहे. यातील पानीपत प्रसंगाचा इंग्रजी अनुवाद ईलियट आणि डौसनच्या ग्रंथाच्या आठव्या खंडात देण्यात आला आहे. सदर ग्रंथाची फोटोस्टाट प्रत महाराष्ट्र राज्याच्या सरकारी दप्तरखान्याचे संचालक डॉ. पी. एम. जोशी यांच्या प्रयत्नाने पाहाण्यास मिळाली. प्रस्तुत अनुवाद मूळ फारसीवरून करण्यात आला आहे.)

(२९) अहमदशहाने उन्हाळा साबितगड येथे काढला. पावसाळा जवळ आला तसे अहमदशहाने कूच करून अनूपशहर येथे छावणी केली. त्याने आज्ञा केली की प्रत्येकाने गवताची झोपडी तयार करावी. म्हणजे पावसाळ्यात तंबू वगैरे खराब होणार नाहीत. कामगारांनी तडकाफडकी गवताची छपरे तयार केली. तोच बातमी आली की विश्वासराव आणि त्याचा नायब भाऊ हे शहाजहानाबादेत दाखल झाले आहेत. त्यांच्याबरोबर जवळजवळ साडेतीन लाख स्वार शिपाई आहेत. याच सुमारास शुजाउद्दौला हा तीस हजार स्वार आणि पायदळ आणि पन्नास तोफा घेऊन अहमदशहाच्या लष्करात दाखल झाला.

(३०) अहमदशहाने शुजाउद्दौला आणि शहापसंदखान यांस आज्ञा केली की तुम्ही येथून निघून तडक शहादऱ्याला पोहोचावे आणि तेथे तंबू उभारावे. शहादरा हे ठिकाण यमुनेच्या काठी असून दिल्लीच्यासमोर आहे. म्हणजे दिल्लीच्या किल्ल्यात आपले लोक आहेत त्यांना धीर येईल. आज्ञेप्रमाणे ते दोघे निघाले. पावसामुळे जिकडे तिकडे पाणीच पाणी झाले होते. काही ठिकाणी तर पाणी घोड्यांच्या छातीपर्यंत लागत होते. हिंडन आणि काली या नद्यांना पूर आला होता. रस्ते कोठेच दिसत नव्हते. अत्यंत अडचण सोसून ते शहादऱ्याला पोहोचले. तेथे त्यांनी तंबू उभे केले. दिल्लीच्या किल्ल्यात अडकलेले अब्दालीचे शिपाई आणि किजलबाश हे नावांतून नदी पार करून छावणीत आले. पावसाळा होता आणि यमुनेला पूर आल्यामुळे मराठ्यांना यमुना पार करणे योग्य वाटले नाही. कुंजपुरा येथे अब्दुस्समदखान, कुतुबजंग, नजाबतखान वगैरे अफगाण सरदार दहा पंधरा हजार सैन्यासहित जमले होते.

(३१) अब्दालीच्या छावणीत जाऊन मिळावे तर नदी पार करणे अशक्य होते म्हणून ते विवंचनेत कुंजपुऱ्यास राहिले होते. ही बातमी भाऊ आणि विश्वासराव यांना लागली. कुंजपुऱ्यातील अफगाण सरदारांचा बीमोड करावा म्हणून त्यांनी तिकडे कूच केले. कुंजपुऱ्यास मराठे पोहोचल्यावर तेथे मोठी लढाई झाली. मराठ्यांची संख्या अधिक होती. त्यांनी अफगाणावर विजय मिळवून सर्वांची कत्तल केली. अब्दुस्समद आणि कुतुबजंग हे मारले गेले. नजाबतखान कैद झाला.

त्यावेळी मराठ्यांची शक्ती इतकी वाढली होती की त्यांनी अटकेपर्यंतचा सगळा मुलूख आपल्या ताब्यात आणिला होता. सारांश अफगाण सरदारांचा पराजय आणि त्यांचा वध यांची हकीकत अहमदशहाला कळली. त्याने पुष्कळ खेद केला. पण त्याचा काय उपयोग. आता पावसाळा संपत आला होता.

(३२) अहमदशहाने शहादऱ्याहून कूच करून कुंजपुऱ्याचा रोख धरला. ही बातमी मराठे सरदारांना लागताच ते कुंजपुऱ्याहून निघून पानीपतला येऊन पोहोचले. अहमदशहापाशी खालीलप्रमाणे सैन्य होते. स्वत: अहमदशहापाशी साठहजार स्वार आणि वीसहजार पायदळ, दोनहजार उंटावरील जंबूरकधारी स्वार आणि दोनशे तोफा. शुजाउद्दौल्यापाशी तीसहजार स्वार आणि पायदळ व पन्नास तोफा, अहमदखान बंगश याजपाशी पंधरा हजार स्वार आणि पायदळ आणि साठ तोफा, नजीबखान याजपाशी तीस हजार स्वार आणि पायदळ आणि तीस तोफा, हाफिज रहमतखान याजपाशी पंचवीस हजार स्वार आणि पायदळ पंचवीस तोफा, दूंदेखान याजपाशी बारा हजार स्वार आणि पायदळ आणि दहा तोफा.

(३३) असदुल्लाखान याजपाशी वरीलप्रमाणे म्हणजे बारा हजार स्वार आणि पायदळ आणि दहा तोफा.

हे सगळे सैन्य घेऊन अहमदशहाने तीन दिवसांत यमुना ओलांडली आणि मराठा सैन्याच्या समोर आपली छावणी उभी केली.

काका पंडित नावाचा बारा हजार स्वारांचा सरदार होता. मराठ्यांनी त्याला गाजीउद्दीन नगरकडे पाठविले. अहमदशहाच्या छावणीत रसद येत होती ती बंद पाडावी ही कामगिरी त्याला देण्यात आली. याचा परिणाम असा झाला की तीन दिवसांत अहमदशहाच्या छावणीत धान्याचा तुटवडा पडला. रुपयाला एक शेर अशी धारण झाली. यामुळे सैन्यात घबराट निर्माण झाली.

या नंतर अहमदशहा शिकारीचे निमित्त करून बाहेर पडला. शिकारीत असता त्याने हाजी नवाब अल्कुजाई याला सांगितले की दोन हजार शिपाई बरोबर घे आणि अमक्या अमक्या दिशेला शिकार करून ये. अहमदशहाने हाजी अल्कुजाईला एकांतात सूचना केली की काका पंडितावर हल्ला करून त्याला शिक्षा करावी आणि हाकलून लावावे.

(३४) त्याप्रमाणे हाजी नवाबखान याने यमुना ओलांडली आणि एक दिवसात त्याने गाजिउद्दीन नगर गाठले. त्यांच्यात आणि मराठ्यांच्यात दोन प्रहर युद्ध होऊन मराठ्यांचा पराजय झाला आणि त्याचे अनेक लोक तल्वारींना बळी पडले. काका पंडित या युद्धात मारला गेला आणि मराठ्यांचे उरलेले सैनिक पळून गेले. हाजी नबाब हा विजय मिळवून आणि बंजाऱ्यांना घेऊन छावणीत आला. अहमदशहाच्या छावणीत आता सुबत्ता झाली.

मराठे आणि अफगाणांच्या छावण्यात तोफांच्या दोन गोळ्यांच्या टप्प्याचे अंतर होते. उभय सैन्याच्या आघाडीच्या चकमकी रोज होता.

एकदा मराठ्यांचे हजार स्वार दिल्लीहून खजिना घेऊन येत होते. प्रत्येक स्वारापाशी दोन दोन हजार रुपये होते.

(३५) अब्दालीकडील सैन्याच्या भीतीने ते रात्री प्रवास करीत होते. पहाटेच्या वेळी डोळ्यांवर झोप असल्यामुळे ते रस्ता चुकले आणि अब्दालीच्या छावणीत आले. त्यांच्या बोलण्यावरून ते मराठ्यांच्या छावणीत खजिना घेऊन चालले आहेत असे कळले. लगेच अफगाण वीर त्यांच्यावर तुटून पडले आणि सूर्योदयापर्यंत त्यांनी तीन चारशे लोकांना ठार मारले. शहावलीखान वजीर याचा खोजा आका संदल हबशी हा होता. त्याने एका मराठा स्वाराला ठार मारून दोन हजार रुपये लुले. बाकीचे मराठे पळून आपल्या छावणीत गेले.

अशाच प्रकारे एक दिवस हजार दोन हजार मराठे रसद आणि चारा गोळा करण्याकरिता बाहेर पडले त्यावेळी अब्दालीचे अफगाण आणि हिंदुस्थानी शिपायी यांनी त्यांना गारद केले.

(३६) शेवटी परिस्थिती अशी झाली की मराठ्यांच्या छावणीतून कोणी बाहेर पडेनासे झाले. छावणीतील मजूर मात्र लपत छपत बाहेर जाऊन गवत कापून आणीत. हे अहमदशहाने पाहिले. त्याने आज्ञा केली की सरदार जहानखान आणि हाजी नबाबखान अल्कुजाई यांनी रोज मराठा सैन्याभोवती दोन कोसांच्या अंतरावर उत्तर आणि दक्षिण या दोन्ही दिशेने घिरट्या घालाव्या आणि छावणीतून रसद आणावी. म्हणून कोणी बाहेर पडले तर त्याला ठार करावे. त्याप्रमाणे दोघे सरदार दोन महिनेपर्यंत मराठा छावणी भोवती घिरट्या घालीत आणि रसद आणण्याकरिता म्हणून बाहेर पडलेले कोणी दिसले की त्यांना गाठून ठार करीत आणि परस्परांना भेटून एक पूर्वेकडे तर दुसरा पश्चिमेकडे कूच करी.

(३७) सारांश रसदेच्या तंगीमुळे मराठ्यांच्या लष्कराचे हाल झाले आणि युद्ध करण्याच्या उद्देशाने त्यांचे सैन्य छावणीतून बाहेर पडले. त्यांच्या घोड्यांच्या टापांनी उडालेला धुराळा आकाशापर्यंत पोहोचला. तो इतका की दिवसाच्या ऐवजी रात्रीचा अंधार भासू लागला. एकत्र बसलेली माणसेही परस्परांना दिसेनाशी झाली. शहापसंदखान हा सेनापति, पाग्याचा मुख्य आणि हरकाऱ्यांचा प्रमुख होता. त्याला अहमदशहाने हुकूम केला की जाऊन काय खबर आहे ती घेऊन ये. मराठ्यांच्या लष्कराची काय हालहवाल आहे त्याची बातमी आण.

शहापसंदखान, प्रस्तुत लेखक, आणि इतर काही धराची माणसे असे ऐन अंधारात निघालो. आमच्या माणसांना मराठ्यांशी नेहमी प्रसंग पडत असल्यामुळे त्यांची माहिती होती. त्यांच्या (मराठ्यांच्या) छावणीच्या दिशेने आम्ही निघालो.

(३८) चार घडीत (घटका) आम्ही अर्धा कोस मजल मारली. तोच मराठ्यांच्या तोफांचे आवाज माझ्या आणि माझ्या सोबत्याच्या कानी पडले. आमच्या घोड्यांचा टापांचे आवाज त्यांच्या गोलंदाजांच्या कानावर गेले. त्यांना वाटले की अहमदशहाची फौज अंधारात चाल करून येत आहे. त्यांनी काही तोफा उडविल्या. त्यांचे गोळे आम्हा लोकांच्या जवळून गेले. पण आम्हाला इजा न होता आम्ही परतलो आणि अहमदशहाला कळविले की मराठी फौज युद्धाकरिता तयार होऊन येत आहे.

अहमदशहाने आपल्या सैन्याची रचना केली. आपल्या उजव्या बाजूस त्याने शहावलीखान वजीर यास नेमले. शहावलीखानाच्या बाजूला अहमदखान बंगश, बंगशच्या बाजूला हाजी नवाबखान अल्कुजाई, त्यांच्या पलीकडे हाफिज रहमतखान, त्याच्या पलीकडे अजमतखान अलीजाई आणि त्याच्या पलीकडे असदुल्लाखान आणि दूंदेखान, अशी योजना होती.

सैन्याच्या मध्यभागी स्वत: अहमदशहा होता. आघाडीला त्याच्यासमोर दोनहजार जंबूरकधारी असे उंटावरील स्वार होते.

(३९) त्याच्या मागे वीसहजार जेजलची यांची पायदळ फौज होती. त्यांच्या मागे अहमदशहाचे अधिकारी होते. त्यांच्या मागे नगारखाना होता. अहमदशहाच्या पाठीशी दहाहजार किजलबाश स्वार होते. त्यांच्या मागे दुराणी आणि गिलजाई फौजेचे ठाण होते. उजव्या फळीच्या मागे हाजी जमालखान बारकुजाई याला एक मैलाच्या अंतरावर उभे करण्यात आले होते. हेतु हा की समोरील पथकांवर शत्रूने हल्ला केला तर त्यास ताबडतोब मदत करावी.

अहमदशहाच्या डाव्या बाजूची सैन्य रचना अशी होती. प्रथम शुजाउद्दौला, त्याच्या जवळ जहानखान, त्याच्याजवळ नजीबखान.

(४०) नजीबखानाच्या जवळ शहापसंदखान, आणि त्याच्या जवळ मुल्ला सरदार रोहिला. डाव्या फळीच्या पाठीशी नसरुल्लाखान नूरजाई हा नेमण्यात आला होता. समोरील पथके मागे हटली तर त्यांना त्याने मदत करावी असे ठरले होते.

उभय दळे एकमेकासमोर उभी राहिली. काही काळापर्यंत उभय सैन्ये अशीच समोरा समोर उभी होती. सैन्याच्या हालचालीमुळे धुराळा आकाशापर्यंत गेला. नंतर उभय दळे परस्पराच्या जवळ येताच दोन्ही सैन्यातील वीर परस्परांवर तुटून पडले. आणि एकमेकांवर शस्त्रांनी आघात करू लागले. फिरंगी जातीतील गोलंदाजांनी तोफांचा भडिमार करण्यास सुरवात केली. बाण फेकणाऱ्यांनी द्रुतगतीचे आणि बहिरीससाण्याप्रमाणे उडणारे बाण फेकून वीरांचे प्राण हरण केले.

(४१) पण वीरांनी गोळ्यांच्या वर्षावांची मुळीच पर्वा केली नाही. हे गोळे आपले काय करणार असे त्यांना वाटले. पण त्या प्रखर संघर्षाच्या धुमश्चक्रीत शूरवीरांना धाक होता तो तोफांचा आणि बंदुकींचा होता.

सारांश दिवस मावळण्यास तीन घटिका असेपर्यंत युद्ध चालू होते. उभय सैन्यातील शूरवीर तल्वारी आणि भाले यांनी लढत होते. जखमी लोकांचे विव्हळणे चालू होते. सुरवातीला भाऊ आणि विश्वासराव यांनी इतके मोठे आणि सतत हल्ले केले की अहमदशहाला आपला निभाव लागणार नाही असे वाटले. त्याने माणसे पाठवून बायकांना घोड्यावर स्वार होऊन तयार राहाण्याची व्यवस्था केली. काफरांचा विजय झाला. तर त्यांनी ताबडतोब निघून जाऊन सुरक्षित स्थळ गाठावे अशी व्यवस्था करण्यात आली. महमूदखान गुर्दबल्बास हा खोजा आणि जनानखान्याचा रक्षक होता. त्याच्याबरोबर आठ नऊ हजार किजलबाशाचे तडफदार सैन्य होते. तो अहमदशहाच्या मागे ठाण मांडून होता.

(४२) त्याने निर्धाराने पुढे होऊन अशी तल्वार चालविली की सारे जण थक्क झाले. त्याच्या सततच्या हल्ल्याचा असा परिणाम झाला की मराठे आपल्या जागेवरून पुढे हलू शकले नाहीत.

याच वेळी जंबूरकधारी आणि जेजलची यांना अहमदशहाने आज्ञा केली की तुम्ही शत्रूवर जेजले जंबूरक यांचा मारा करून त्यांचा नाश करा. त्याप्रमाणे त्यांनी भडीमार केला.

(४३) अहमदशहाच्या सुदैवाने जंबूरकची एक गोळी विश्वासरावाच्या कपाळावर बसली. आणि दुसरी भाऊच्या बगलेला लागली. त्यामुळे ते दोघेही ठार झाले. इतरही किजल बाशांच्या शस्त्राघातांनी मृत्युमुखी पडले. सारांश, आपले सरदार मारले गेले असे मराठी सैन्याने पाहिले आणि त्यांनी पळ काढण्यास सुरुवात केली. एका क्षणात रणमैदान रिकामे झाले.

हरकाऱ्यांनी शहापसंदखानास कळविले की मराठे रणांतून पळून गेले आहेत आणि मैदानात कोणी राहिले

नाही. जनकोजी आणि मल्हारराव हे मातबर मराठे सरदार होते. आपल्या लाख स्वारानिशी ते निर्धाराने शहापसंदखानाशी झुंजत होते.

(४४) मराठ्यांचा मोड झाला हे शहापसंदखानाने ऐकले. त्याने हिंमत करून आपल्या समोर असलेल्या मराठा सरदारांवर हल्ला चढविला. दोन घटका युद्ध झाले. शेवटी ते रणांगण सोडून पळून गेले. शहापसंदखानाबरोबर ईराणी दुराणी शिपायी होते. त्यांनी मराठ्यांचा पाठलाग सुरू केला. मी (प्रस्तुत लेखक) मात्र शहापसंदखानापाशी उभा होतो. शेवटी शहापसंदखान म्हणाला की मी अहमदशहाचे अभिनंदन करण्यास जात आहे. तूही जा आणि स्वत:करिता लूट घेऊन ये.

मला परवानगी मिळताच, मी, माझा चुलतभाऊ आणि एक नोकर असे आम्ही घोड्यावरून निघालो. आम्ही मराठ्यांच्या छावणीत पोहोचलो. तेथे तीस हजार माणसे, पाठीशी बंदुकी आणि हातात तल्वारी धरलेली अशी फिरत होती.

(४५) आम्ही तिघे त्यांच्या रांगेतून घुसलो आणि सामानाचे लादलेले चवदा उंट घेऊन बाहेर पडलो. ती माणसे तीस हजारावर होती. ती इतकी घाबरली होती की त्यांना आपली शस्त्रे चढविण्याचे भान राहिले नाही. यापेक्षा आश्चर्याची गोष्ट घडली ती अशी की आम्ही आपल्या छावणीकडे परत येत असता वाटेत आम्हाला एक मराठा सरदार भेटला. तो सैन्याच्या पिछाडीवर नेमलेला होता. त्याच्याबरोबर सहासात हजार माणसे होती आणि तो पळून जाण्याच्या तयारीत होता. आम्हाला त्यांच्याकडून उपसर्ग होऊ नये म्हणून आम्ही त्यांच्या दिशेने आमच्या बंदुकी चालविल्या मग ते लोक दुसऱ्या दिशेने निघून गेले. आम्ही त्यांच्याकडून दोन उंट घेतले. एकावर नगारे होते आणि दुसऱ्यावर रसद होती.

(४६) हे सगळे घेऊन आम्ही रात्रीच्या पाच घटका झाल्या तसे छावणीत सुरक्षित आलो. त्यावेळी अहमदशहा आणि इतर हिंदुस्थानी सरदारांच्या गोटातून नगाऱ्याचे गगनभेदी ध्वनी निघत होते. या लढाईत पेशव्यांचा मुलगा समशेरबहादुर आणि इब्राहीमखान गार्दी (हा तीस हजार तेलंगे गार्दी यांचा मुख्य होता) आणि गुजरातचा सुभेदार हे मारले गेले. मराठा सैन्य साडेतीन लाख होते. त्यापैकी पन्नास हजार सैन्य मोठ्या कष्टाने दक्षिणेत पोहोचले. बाकीचे युद्धात अगर वाटेत गाजींच्या समशेरींना बळी पडले.

मी स्वत: डोळ्यांनी जे पाहिले आणि तेथे हजर असलेल्या हरकाऱ्यांकडून जे ऐकले आहे तेच लिहिले आहे. या युद्धाबद्दल मला जितकी माहिती आहे तितकी कुणालाच नाही.

(४७) हरकारे सगळे माझ्या हाताखाली होते. आणि मी शहापसंदखानाचा कारभारी होतो आणि हरकाऱ्यांनी आणलेली प्रत्येक बातमी माझ्या मार्फतीनेच शहापसंदखानापाशी पोहोचत होती. मी वर दिलेल्या मजकुरास सोडून कोणी दुसरे काही सांगेल तर ते खोटे समजावे. ईराणी आणि दुराणींनी दिल्लीच्या पलीकडे असलेल्या वल्लभगड आणि फरीदाबादपर्यंत म्हणजे पानीपतपासून साठ कोसापर्यंत मराठ्यांचा पाठलाग केला आणि सापडले त्यांची घोडी वगैरे काढून घेऊन त्यांना ठार मारले.

(४८) मी महंमदबेगखान हमदानीबरोबर महादजी शिंद्यांच्या छावणीत काही दिवस होतो. शिंदे याचा पाय इतका अधू होता की त्याला जागेवरून उठविण्यास दोन माणसे लागत. एकाने याचे कारण विचारले. शिंद्याने दीर्घ निश्वास सोडून सांगितले की दैव विरुद्ध झाले तर युक्तीचे काही चालत नाही.

(४९) मी बारा हजार रुपये देऊन भीमथडी घोडी घेतली होती ती वाऱ्यापेक्षाही चपळ होती. भाऊ

आणि विश्वासराव हे मारले गेले त्यावेळी माझी आणि जनकोजीची ताटातूट झाली. मी रणांगणांतून पळू लागलो. एक मोगल, तुर्की घोड्यावर स्वार असलेला माझा पाठलाग करू लागला. प्रत्येक वेळेस मी मागे वळून पाही तो त्याचा घोडा पुढे चालून येत असलेला दिसे. शेवटी माझी घोडी थकली. त्या स्वाराने मला गाठले आणि घोडी आणि सामान काढून घेतले. जाताना त्याने माझ्या पायावर तल्वारीने वार केला आणि म्हटले की हा वार जन्मभर तुझ्या आठवणीत राहील. त्या वेळेपासून मला ही पीडा आहे म्हणून तो प्रसंग मला आठवतो.

दुसरी गोष्ट अशी की मराठे पळत असता काही जण सोनपतच्या सराईत जेवणासाठी थांबले.

(५०) इतक्यात अब्दालीचे शिपाई पाठोपाठ पोहोचले. सराईत रक्षकांनी भीतीने दरवाजे बंद केले. मराठे पळू पाहात होते पण सराईचे दरवाजे तर बंद होते. एका मराठे स्वाराने भिंतीवरून आपली घोडी उडविण्याचा प्रयत्न केला. घोडीने बहिरी ससाण्याप्रमाणे झेप घेतली. पण भिंतीच्या तटावर अडकून ती मरण पावली. तीस वर्षापूर्वी माझे त्या भागात जाणे घडले. तटावर त्या घोडीच्या हाडांचा सांपळा मला दिसला. त्या घोडीने दाखविलेली कामगिरी चहूकडे प्रसिद्ध आहे.

या गोष्टी ११७४ हिज्रीत (१७६०-६१) मध्ये घडल्या.

## फ्र्यांकलिनकृत शहा आलमच्या कारकिर्दीचा इतिहास

(इ. स. च्या अठराव्या शतकात फ्र्यांकलिन नावाचा एक लष्करी अधिकारी ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरीत क्याप्टनच्या हुद्द्यावर होता. हिंदुस्थानात त्याने अनेक वर्षे काढली. त्याने इ. स. १७९८ मधे शहा आलमच्या कारकिर्दीचा इतिहास लिहून काढला. या ग्रंथाच्या लेखनात आपण खालील फारसी हस्तलिखितांचा उल्लेख केला असे तो म्हणतो.

गुलाम अलीखान हा शहा आलमचा मुलगा मिर्जा जवान बख्त जहांदारशहा याच्या पदरी होता. त्याने शहा आलम नामा नावाचा ग्रंथ लिहिला आहे. मनूलाल हा शहा आलमच्या पदरी होता. त्याने शहा आलमच्या कारकिर्दीच्या पहिल्या तेरा वर्षांची हकीकत दिली आहे. फ्र्यांकलिनने त्याच्याही हस्तलिखिताचा उपयोग केला आहे. फ्र्यांकलिनच्या ग्रंथात पानीपत संबंधीचा मजकूर संक्षेपाने आला आहे. तो खालील प्रमाणे आहे. पाने १८ ते २५.)

निजामाशी तह केल्यानंतर बाळाजी हिंदुस्थानातील मोहीम तडफेने चालविण्यास मोकळा झाला. त्याने एक लाख सैन्य जमविले आणि ते आपला मुलगा विश्वासराव याच्या आधिपत्याखाली देऊन पाठविले. विश्वासरावाच्या बरोबर शमशेर बहादुर, सदाशिवराव, इब्राहीमखान गार्दी, अंताजी माणकेश्वर, अप्पाजी, जयाजी, रघोजी ही प्रमुख मंडळी होती. ते सर्व प्रथम जाटांच्या मुलुखात पोहोचले. वजीर गाजिउद्दीन, जाट आणि मल्हारराव होळकर हे त्यांना बिया नदीच्या काठांवर भेटले. उभय सैन्यांच्या (अफगाण आणि मराठे) मध्ये यमुना नदी होती. पावसामुळे नदीला पूर आला असल्यामुळे दोन्ही सैन्यांना स्वस्थ बसून राहावे लागले.

या काळात विश्वासरावाने अब्दालीला सुचविले की नादिरशहाच्या काळात जो तह झाला होता तो कायम राहावा. अब्दालीने तिरस्काराने ही सूचना फेटाळली. त्याने उलट मागणी केली की मराठ्यांनी आपल्या मुलुखास परत जावे, पुन्हा नर्मदा ओलांडू नये. आपली सत्ता कर्नाल पानीपतपर्यंत चालावी, साम्राज्याचा वसूल बादशाही अधिकाऱ्यांनी करावा आणि त्यांनी मराठ्यांना चौथाईची ठरलेली रक्कम द्यावी, आणि मराठ्यांनी वसूलीच्या कामात लक्ष दखल देऊ नये.

दोन्ही पक्ष आपापल्या मागण्यावर अडून राहिल्यामुळे तहाची बोलणी थांबली.

शहाजहानाबाद (दिल्ली) हे अब्दालीचा सरदार याकूब अलीखान याच्या ताब्यात होते. त्याच्यापाशी दोन हजारांचे सैन्य होते. त्यात पाचशे अफगाण होते. शिबंदीची दुर्बल अवस्था लक्षात येताच विश्वासरावाने दिल्ली शहराला वेढा घालून ते आपल्या ताब्यात घेतले. याकूबखान आणि त्याच्या शिपायांची मालमत्ता घेऊन त्यांना काढून लावण्यात आले. दिल्ली ताब्यात आल्यावर विश्वासरावाने गाजीउद्दीन वजीराची नेमलेली माणसे बडतर्फ केली. खुद्द वजीरासही त्याने उपेक्षेने वागविले त्यामुळे तो नाराज झाला. आणि मराठ्यांच्या छावणीपासून दोन कोसावर त्याने आपला तळ हलविला.

शुजाउद्दौल्याला वजीर म्हणून नेमावा म्हणून याच सुमारास मराठ्यांनी त्याच्याशी खाजगी बोलणी सुरू केली असावीत. या अवधीत शुजाउद्दौला अब्दालीच्या छावणीत आला होता. रोहिल्यांच्या सल्ल्याने अब्दालीने शुजाउद्दौल्याला मराठ्यांशी बोलणी करण्याकरिता पाठविले. यावेळी अटी घालवण्यात आल्या होत्या. जाटांनी या बोलण्यात मध्यस्थाचे काम करावे असे ठरले. विश्वासरावाने शुजाउद्दौल्याला वजीर या नात्याने सन्मानाने वागविले. गाजिउद्दीन वजीराचा वकील राजा दिलेरसिंग होता. त्याला विश्वासरावाने आपल्या छावणीतून काढून लाविले. गाजिउद्दीनने पाहिले की कोणत्याच पक्षाला आपण नकोसे झालो आहोत आणि आपली आता दाद लागणे शक्य नाही. तो तेथून निघून जाटांच्या मुलुखात त्यांच्या आश्रयाला राहिला.

शुजाउद्दौलाने तहाची काय बोलणी केली याचा तपशील समजला नाही. या वाटाघाटीत दोन महिने गेले. तरीही तहाचा रंग हिसेना. पण शुजाउद्दौला अगदीच स्वस्थ होता असे दिसत नाही. अबदालीला येऊन मिळालेल्या लोकांचे वेगवेगळे हितसंबंध होते. पण गाजिउद्दीनला विरोध करण्यात सगळ्यांचे एकमत होते. शुजाउद्दौल्याचे उद्देश म्हणजे आली गौहर (शहाआलम) ची मोहीम यशस्वी करणे आणि स्वत:करिता कायम वजीरी करून घेणे हे होते. गाजिउद्दीन तर बडतर्फ झालाच होता. आली गौहरला बादशहा म्हणून अब्दालीने मान्यता दिली होती. आता आपले आसन स्थिर करण्याकरिता फक्त मराठ्यांची संमति त्याला हवी होती. मराठ्यांशी बोलणी करण्यात शुजाउद्दौल्याचा हाच उद्देश असावा असे दिसते. याचा परिणाम असा झाला की विश्वासरावाने आली गौहरला बादशहा म्हणून मान्यता दिली. आणि त्याच्या गैरहजेरीत त्याच्या मुलाला प्रतिनिधी म्हणून नेमले. या नेमणुकीच्या मागे एक अट होती. ती ही की या बाबत विश्वासरावाला पाच लाख रुपये देण्यात यावे. मोगल राजपुत्राच्या आईने या मोबदल्यात मराठ्यांना पाच लाख रुपयांचे जडजवाहीर दिले. या प्रकाराने अब्दालीला काळजी उत्पन्न झाली. शुजाउद्दौल्यानेच हे सर्व घडवून आणले या कल्पनेने तो त्याच्यावर चिडला. आणखी एका घटनेमुळे त्याचा शुजाउद्दौल्यावरील संशय बळावला. दिल्लीच्या वायव्येस सात दिवसांच्या प्रवासावर कुंजपुरा नावाचे रोहिल्यांचे ठिकाण आहे तेथे अब्दालीतर्फे, पानीपतचा फौजदार अब्दुस्समद खान आणि रोहिल्यांतर्फे कुतुबखान हे राहात होते. मराठ्यांनी कुंजपुऱ्यावर चाल केली. त्या शहराला वेढा घालावा असा त्यांचा बेत होता. अब्दुस्समदखान आणि कुतुबखान यांनी लढाई दिली. पण त्यांचा पराजय होऊन ते कुंजपुऱ्याकडे परत आले. मराठ्यांनी त्यांना फुरसद न देता हल्ला करून कुंजपुरा घेतला आणि तेथील शिबंदीची आणि रहिवाशांची कत्तल केली. शहर त्यांच्या ताब्यात आले. तेथे त्यांना अलोट संपत्ती मिळाली. अब्दुस्समदखान आणि कुतुबखान यांना कैद करून विश्वासरावाकडे पाठविण्यात आले. त्याने अब्दुस्समदखानाचा वध करविला आणि कुतुबखानाला कैदेत टाकले. अब्दालीला या हानीची बातमी लागली. त्याला अतिशय संताप आला. नदीला पूर असल्यामुळे ती त्याला ओलांडता येईना.

म्हणून त्याने शुजाउद्दौल्यावर आपला राग काढला. तू बेमान फितूर आहेस असे म्हणून त्याने त्याला छावणीतून निघून जाण्यास सांगितले. पण रोहिल्यांनी मध्यस्थी केली म्हणून त्याने शुजाउद्दौल्याला क्षमा करून परत बोलाविले. पण त्याच्यावरचा त्याचा संशय जाईना म्हणून त्याने शुजाउद्दौल्याला आपल्या छावणीत राहू दिले नाही. कुंजपुऱ्यासारखे स्थळ हातचे गेले आणि शत्रू अगदी बिनधोकपणे विजय मिळवीत आहे हे पाहून त्याच्यावर ताबडतोब सूड घेण्याचा अब्दालीने निश्चय केला. तो हत्तीवर स्वार होऊन नदीला कोठे उतार मिळतो काय हे पाहण्याकरिता पाण्यात उतरला. पण त्याला कोठेही उतार सापडेना. कोठेही जा, नदीचे पाणी हत्तीपेक्षा उंच वाहात असलेले त्याला दिसले. विलंब होतो हे पाहून त्याने आपल्या सैन्याला आपल्या मागोमाग येण्याची आज्ञा केली आणि स्वत: पाण्यातून पोहून त्याने परतीर गाठले. आपल्या नेत्याचे धाडस पाहून अब्दालीचे सैन्य त्याच्या मागोमाग पाण्यात उतरले आणि विशेष हानि न होता सगळे सैन्य परतीरावर जाऊन थांबले. जी काही हानी झाली ती शुजाउद्दौल्याच्या सैन्याची झाली.

आपल्या सैन्याची जमवाजमव करून अब्दालीने राजधानीकडे चाल केली. पण तेथील बंदोबस्त उत्तम होता. अब्दालीपाशी तोफखाना नसल्यामुळे त्याने शहरावर हल्ला केला नाही. परत फिरून त्याने मराठ्यावर हल्ला केला. त्यात त्यांचा पराजय झाला. पण ही लढाई निर्णायक स्वरूपाची होती असे वाटत नाही. काहीच्या मते त्यात मराठ्यांचाच जय झाला. पण हे असंभवनीय वाटते. या वेळेपासून जानेवारीच्या सुरुवातीपर्यंत विशेष असे काही घडले नाही. दोन्ही सैन्ये आपापल्या छावणीत होती. अब्दालीची छावणी पानीपतच्या पूर्वेत सेहालेह येथे चार कोसावर तर मराठ्यांची छावणी पानीपतजवळ सेघेर येथे होती. डिसेंबर महिन्यात अब्दालीला पंधरा हजार फौजेची कुमक आली. याच सुमारास मराठ्यांना दक्षिणेतून सदतीस लाख रुपये आले. त्या खजिन्याच्या रक्षणाकरिता आठ हजारचे सैन्य होते. अब्दाली आणि त्याच्या सहकाऱ्यांच्या मानाने मराठ्यांचे बळ इतके कमी होते की ते छावणीतून बाहेर निघण्याची हिंमत करीनात. ते आपल्या छावणीत बसून राहिले. अब्दालीने भोवतालचा मुलूख आपल्या ताब्यात घेतला आणि मराठ्यांची रसद पूर्णपणे बंद केली.

कुंजपुऱ्याचा जमीनदार दलीलखान रोहिला याने मराठ्यांना ज्या ज्या खेड्यातून रसद मिळण्याचा संभव होता ती सर्व उध्वस्त केली. अब्दालीच्या इतर पथकांनीही असेच केले. मराठ्यांना काही हालचाल करण्याची हिंमत झाली नाही. त्यांची गुरेढोरे आणि माणसे उपासाने मरू लागली, छावणीत रसद अगदी शिल्लक नाही अशी त्यांची अत्यंत हलाखीची स्थिती झाली, अशा परिस्थितीत विश्वासरावाने सगळ्या सरदारांना एकत्र बोलावून त्यांचा सल्ला घेतला. सर्वांच्या मते ठरले की उमासमारीपेक्षा युद्ध करणे बरे. हा निर्णय घेतल्यावर मराठ्यांचे सैन्य छावणीतून बाहेर निघाले आणि त्यांनी चवदा जानेवारीच्या पहाटे शत्रूवर चाल केली. अब्दालीच्या छावणीपासून ते दोन कोसावर आले तो अब्दालीने त्यांच्याशी सामना देण्याकरिता कूच केले. उभय सैन्ये समोरा समोर आली. दुपारपर्यंत त्यांनी परस्परांवर तोफांचा भडिमार केला आणि मग परस्परांना भिवून त्यांनी हत्यारे चालविली. लढाई अत्यंत निकराची झाली आणि जयाचे पारडे कधी इकडे तर कधी तिकडे झुके. दिवसाच्या उत्तरार्धात मराठ्यांना जय मिळणार असा रंग दिसू लागला. ते अब्दालीच्या छावणीत घुसून आले. ऐन याच वेळी शुजाउद्दौल्याच्या पदरी असलेल्या फकीरांच्या (गोसावी?) दळाने मराठ्यांवर इतक्या त्वेषाने हल्ला केला की युद्धाचा रंग पालटला. इतका निकराचा हल्ला मराठ्यांना सहन झाला नाही. ते मागे हटले. अब्दालीच्या सैन्याने त्यांचा पाठलाग सुरू केला आणि मराठ्यांनी पळण्यास सुरवात केली. युद्धात आणि पाठलागात हजारो मराठे मारले गेले. हा पाठलाग दुसऱ्या दिवशीही

चालू होता. मैदानातून वाचून पळालेल्यांना जमीनदारांनी लुबाडले किंवा मारले. त्यातून बचावलेले आपापल्या सरदारांना जाऊन मिळाले. त्यातून बहादुर आणि इब्राहीमखान गार्दी आपल्या शिपायांबरोबर मारले गेले. विश्वासरावाचा प्रमुख सरदार सदाशिवराव याने आपली बायका माणसे शत्रूच्या हाती पडू नये म्हणून त्यांना विष घालून मारले आणि स्वत: नारनोलच्या दिशेने दक्षिणची वाट धरली. विश्वासराव, मल्हारराव, जनकोजी आणि इतर सरदार मारले गेले असे म्हणतात पण नक्की काय ते समजत नाही. पण अब्दालीला पूर्ण विजय मिळाला याबद्दल सर्वांचे एक मत आहे.

## गुलिस्ताने रहमत

(हाफिज रहमतखानाचा मुलगा मुस्ताजब अलीखान याने गुलिस्ताने रहमत या नावाने आपल्या बापाचे चरित्र लिहिले आहे. ग्रंथाचा लेखन काल १२०७ हिज्री म्हणजे इ. स. १७९३ हा आहे. या ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर इलियट याने इ. स. १८१४ त केले. इंग्रजी अनुवाद लंडन येथून इ. स. १८३१ मधे प्रसिद्ध झाला. त्यातील पानीपत संबंधीच्या मजकुराचा मराठी अनुवाद खाली दिला आहे.)

(५९-६७) पावसाळ्यात, सदाशिवराव भाऊ, विश्वासराव, समशेर बहादूर हे असंख्य मराठा सैन्य बरोबर घेऊन दत्ताजीच्या वधाचा सूड घेण्याकरिता दक्षिणेतून रवाना झाले. जनकोजी आणि मल्हारराव होळकर त्यांना वाटेत येऊन मिळाले. हे सैन्य ११७३ हिज्रीच्या जिल्हज महिन्याच्या एकोणीस तारखेस दिल्लीस आले. पावसाळा संपून अनुकूल मोसम येईपर्यंत मराठे दिल्लीला छावणी करून राहिले. ११७४ हिज्रीच्या सफर महिन्याच्या एकोणतीस तारखेस भाऊने मुहीयुस्सल्तनतला गादीवरून काढून त्याच्या जागी मिर्जा जवान बख्त याला त्याचा बाप आली गौहर हा बंगालमध्ये होता म्हणून आली गौहर (शहा आलम) चा नायब म्हणून नेमले.

कुंजपुऱ्याचा किल्ला यमुनेच्या तीरावर असून कर्नालनजीक आहे. तेथे अब्दालीच्या फौजा असून त्यांचे नेतृत्त्व समदखान, मूमीखान, कुतूबखान आणि नजाबत खान यांच्याकडे होते. किल्ला हवाली करण्याबद्दल नजाबत खानाने मराठ्यांच्या कडून लांच घेतली होती. किल्ल्यावर हल्ला करण्याकरिता दिल्लीहून मराठ्यांची फौज रवाना झाली. समदखान आदि सरदार मराठ्यांशी लढण्याकरिता किल्ल्यातून बाहेर पडले. किल्ल्यात कोणी तरी राहिले पाहिजे, या सबबीवर नजाबत खान बाहेर निघाला नाही. अल्प युद्धानंतर दुराणींचा पराजय झाला आणि ते किल्ल्याकडे परत येऊ लागले. पण त्या हरामखोर नजाबतने किल्ल्याचे दरवाजे बंद केले. हे पाहून समदखान वगैरेनी मराठ्यावर चाल करून प्रखर लढा दिला आणि अनेकांना मारून स्वत: रणांगणात पडले. फितुरी नजाबत खानाने किल्ला मराठ्यांच्या हवाली केला. पण त्याचे उपकार न मानता मराठ्यांनी त्याला सर्वस्वी नागविले आणि त्याला पकडून ठार केले.

कुंजपुरा मराठ्यांच्या हाती पडला हे ऐकून अहमदशहाच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. त्याने सैन्य सज्ज करण्याचे ताबडतोबीचे हुकूम दिले. सैन्यात एक लाख शिपाई होते. अहमदशहा-तीस हजार स्वार, हाफिज रहमत-स्वार आणि पायदळ तीस हजार आणि नजीबखान-पंधरा हजार, शुजाउद्दौला-सात हजार आणि अहमदखान पाच हजार आणि इतर सरदारांची पथके होती ती वेगळी. हे सगळे सैन्य यमुनेच्या काठावर आले. त्याने नावांचे तीन पूल तयार केले आणि बागपतपाशी नदी ओलांडली. ही बातमी मराठ्यांस कळताच ते पानीपतला आले आणि गावाच्या समोर त्यांनी छावणी केली. अहमदशहाने मराठ्यांच्या छावणीसमोर आपली छावणी केली. उभयदळाच्या

अघाडीच्या पथकांत रोज चकमकी होऊ लागल्या.

भाऊला वाटले की आपले सैन्य शत्रूपेक्षा जास्त आहे. आपण शत्रूची रसद तोडू शकू आणि शत्रूची हलाखीची स्थिती झाली म्हणजे आपण त्यांच्यावर हल्ला करू आणि मग आपल्याला हटकून जय मिळेल. या विचाराने त्याने युद्ध करण्याचे लांबणीवर टाकण्याचे ठरविले. अहमदशहाने रसद आणण्याकरिता सैन्याची एक तुकडी नेमली होती. ती अडविण्याकरिता भाऊने चार सरदार नेमून त्यांच्याबरोबर मोठे घोडदळ दिले होते. त्यांच्या चकमकी नेहमी होत. एवढ्या मोठ्या सैन्याला रसद आणावयाची ती लांबून आणावी लागे. यामुळे अहमदशहाच्या सैन्यात रसदेची टंचाई झाली. भाऊचा उद्देश पूर्णपणे सफळ झाला नाही. शत्रूची रसद तोडण्याकरिता त्याला अधिक सैन्य वापरण्याची आवश्यकता वाटली. म्हणून त्याने छावणीभोवती खंदक खणला आणि तेथे त्याने आपल्या तोफा उभ्या केल्या. तोफांची संख्या सातशे होती. त्या इब्राहीमखान याच्या हाताखाली होत्या. त्यांचे रक्षण करण्याकरिता बारा हजार पायदळ शिपाई नेमले होते. असा बंदोबस्त केल्यामुळे भाऊला दूरदूरपर्यंत घोडदळ पाठवून शत्रूची रसद अडविण्याचे काम करणे सोपे झाले. या कामावर गोविंदरावाची नेमणूक करण्यात आली. त्याच्या दिमतीस पंचवीस हजार स्वार देण्यात आले. कटेहर (रोहिलखंड) आणि अंतर्वेदीतून अहमदशहाकडे येणारी रसद तोडण्याचे त्याला काम देण्यात आले. भाऊची ही योजना इतकी यशस्वी झाली की अहमदशहाच्या छावणीत धान्य रुपायाला एक शेराच्या हिशेबाने विकू लागले. गोविंदरावाने रोहिलखंडावर हल्ला करण्याची आवई घातली.

याच सुमारास हाजी अताईखान आणि करीमदादखान हे सहा हजाराचे सैन्य घेऊन कंधारहून आले होते. गोविंदरावाने रसद तोडण्याचे काम यशस्वीपणे चालविले आहे हे ऐकून त्याच्यावर हल्ला करण्याचे काम त्यांनी पत्करले आणि त्याच्या दिशेने कूच केले. चाळीस कोसाची मजल मारून त्यांनी यमुना पार केली आणि पहाटे गाजीउद्दीन नगर गाठले. त्यांनी गोविंदपंताच्या सैन्यावर हल्ला करून त्याची दणादाण उडविली. गोविंदपंताचे शिर कापून ते त्यांनी अहमदशहाकडे छावणीतून निघाल्याच्या दुसऱ्याच दिवशी पोहोचविले. दोन दिवसात त्यांनी ऐंशी कोसाची मजल मारली, एक मोठी नदी पार केली आणि प्रखर लढाई केली.

त्यावेळेपासून अहमदशहाच्या छावणीत रसद वेळेवर येऊ लागली. जहान खानाबरोबर सहा हजार स्वार देण्यात येऊन मराठ्यांची रसद तोडण्याचे काम त्याला सांगण्यात आले. शहापसंदखानाने आपल्या सहा हजार सैन्यानिशी मराठ्यांच्या छावणी भोवतीचा दहा कोसापर्यंतचा प्रदेश उध्वस्त करून टाकला. तिसरी सहाहजारी तुकडी बहादुरखानाकडे देण्यात येऊन मराठ्यांच्या छावणीभोवती सतत घिरट्या घालून लोकांची येजा बंद करणे, बाहेर कोणी दिसला की कापून काढणे इत्यादी कामे त्याला सांगण्यात आली. मराठ्यांच्या रसदीवर हल्ले करण्यात जहानखानाला उत्तम यश आले. मराठ्यांना मधूनमधून रसद पोहोचत असली तर त्यांची स्थिती अत्यंत हलाखीची झाली. रसदेच्या रक्षणार्थ त्यांची अनेक माणसे लढून मेली. याशिवाय रोगराई आणि उपासमारीने कित्येक लोक मेले.

इनायतखान (हाफिज रहमत खानाचा मुलगा आणि ग्रंथकर्त्याचा भाऊ) हा वयाने लहान असल्यामुळे त्याला बरेलीत ठेवण्यात आले होते. पण बापाकडे पानीपतवर जाण्यासंबंधी त्याचा उत्साह इतका दांडगा होता की दोनशे स्वारशिपाई घेऊन तो अहमदशहाच्या छावणीत आला. त्याचा उत्साह आणि तडफ पाहून अहमदशहाला आनंद झाला. त्याने त्याला मानाचा पोशाख आणि उत्कृष्ट तल्वार दिली. यावेळी इनायतखानाची आई वारल्याची

बातमी हाफिज रहमतखानाला प्रथमच कळाली. अहमदशहाने दुखवट्याकरिता आपले सर्व सरदार त्याच्याकडे पाठविले. पण ही वेळ खेद करीत बसण्याची नव्हती. हाफिज रहमतखानाने सैन्याचे नेतृत्त्व आपल्याकडे चालू ठेविले. पण पत्नीवियोगाचे दु:ख आणि कामाची दगदग यामुळे तो अतिशय आजारी पडला. यामुळे त्याने आपल्या दळाचे नेतृत्त्व आपला चुलत भाऊ दूंदीखान आणि मुलगा इनायतखान यांजकडे सोपविले.

बहादुरखान, शहापसंदखान आणि जहानखान यांच्या प्रयत्नाने मराठ्यांची परिस्थिती अत्यंत कठीण झाली. एक एक दिवसाची मजल मारली तरी जळणाचे लाकूड अगर गवत दृष्टीस पडेनासे झाले. मराठ्यांनी सैन्याची एक तुकडी धूळकोटपर्यंत पाठविली. ती छावणीकडे परत येत असता जहानखान आपल्या दहा हजार सैन्यासहित त्यांच्यावर तुटून पडला. त्याने पांच हजार माणसे मारली आणि त्यांची घोडी आणि रसदेचे उंट आणि बैल आपल्या छावणीत नेली. मराठ्यांना आता युद्ध सुरू केल्याशिवाय गत्यंतर राहिले नाही. सहा जमादिलावल ११७४ हिज्री रोजी भाऊ आपल्या सर्व सैन्यासहित छावणीच्या बाहेर पडला. तोफखाना आणि पायदळ ही इब्राहीमखानाच्या हाताखाली देण्यात आली होती. त्याने सुरवातीसच दूंदेखानाच्या दळावर तोंफाचा भडिमार केला. त्याला उत्तर म्हणून इकडूनही तोफा चालू झाल्या पण त्याचा विशेष परिणाम झाला नाही. मराठे जवळ येतील आणि मग तलवारी घेऊन आपण त्यांच्यावर तुटून पडू या विचाराने रोहिले सरदार प्रतीक्षा करू लागले. पण इब्राहीमखानापाशी मोठ्या तोफा होत्या. लांबून रोहिल्यांवर मारा करणे त्याला फायद्याचे होते. त्याचा भडिमार इतका प्रखर होता आणि रोहिल्यांचे इतके नुकसान झाले की दळातील कित्येक शिपाई मागे हटले आणि अहमदखान बंगष त्यांच्या मदतीला येत होता त्याच्या आश्रयाला राहिले. पण ही मदत येण्याची दूंदेखान आणि इनायतखान यांनी वाट पाहिली नाही. त्यांनी इब्राहीमखानाच्या सैन्यावर हल्ला चढविला. यावेळी उभय पक्षातील असंख्य माणसे ठार झाली. आफगाणांच्या शौर्याला फळ आले. त्यांनी मराठ्यांचा तोफखाना काबीज केला आणि त्यांना मागे रेटले. याचवेळी भाऊ ऐंशी हजार स्वारांसहित पुढे झाले. मराठा पायदळाला कुमक मिळताच ते परत आले आणि त्यांनी अफगाणांवर हल्ला चढविला. आता अफगाणांवर मागे हटण्याची पाळी आली. तरी दूंदीखान, शेख कबीर आणि सय्यद मासूम हे आपल्या जागी ठाण मांडून शत्रू सैन्यावर बंदुकीचा मारा करीत होते.

या आणीबाणीच्या प्रसंगी अहमदखान बंगश त्या जागी आला. यामुळे अफगाणांना पुन्हा ठाण मांडून लढणे शक्य झाले. पण त्यांचे भयंकर नुकसान झाले होते आणि शत्रूसैन्य संख्येने इतके अधिक होते, की त्यांचा निश्चित पराजय झाला असता. पण अहमदशहा एका टेकडीवर उभा राहून ही हालचाल काळजीपूर्वक पाहात होता. त्याने अताईखान आणि करीमदादखान यांच्या नेतृत्त्वाखाली सहा हजार स्वार रोहिल्यांच्या मदतीस पाठविले. त्यांनी मराठ्यांवर निकराचा हल्ला चढविला. त्यात अहमदशहाचा शूर सरदार अताईखान हा ठार झाला. शहापसंदखानाने सहा हजार सैन्य घेऊन मराठ्यांच्या पिछाडीवर हल्ला केला. त्याने त्यांची छावणी, बाजार इत्यादी उध्वस्त केली. अहमदशहाने उत्तम नेमबाज लोक निवडले. मराठ्यांचे सरदार हत्तीवर असल्यामुळे सहज ओळखू येत. त्यांच्यावर गोळ्या झाडण्याचा हुकूम देण्यात आला. भाऊ जनकोजी, मल्हारराव, रघुनाथराव (येथे विश्वासराव पाहिजे), शमशेरबहादुर हे सगळे, एक मल्हारराव वगळता मारले गेले. आपले पुढारी मारले गेले हे पाहून मराठ्यांनी पळ काढण्यास सुरवात केली. अहमदशहाच्या सैन्याने त्यांचा पाठलाग केला. रणांगणावर मृतांचे ढीग पडले. अहमदशहाचे सगळे घोडदळ मराठ्यांच्या पाठलागावर निघाले. तीन दिवसपर्यंत पाठलाग चालू होता. दिल्लीची वाट असंख्य प्रेतांनी भरून गेली. प्रत्यक्ष मैदानावर पंचवीस हजार प्रेते मोजण्यात आली, हत्ती, घोडे, उंट, बैल, सोनेनाणे आणि

तोफा याची लूट तर अगणित हाती पडली. हिंदुस्थानात इतकी मोठी लढाई कधी झाली नाही. आणि इतकी मोठी सैन्ये समोरासमोर कधीच आली नव्हती. पूर्वी दिल्लीत इमादुल्मुल्काने नजीबखानाशी विरोध केला होता. त्या वेळी मल्हाररावाने नजीबखानाला मदत केली होती. त्याचा मोबदला म्हणून नजीबखानाने मल्हाररावाला रणांतून पळून जाण्यास मदत केली.

इब्राहीमखान आणि त्याचा मुलगा हे इनायतखान आणि दूंदीखान याच्या हाती सापडले होते. त्याला अहमदशहाच्या सूडापासून वाचवावे असा बेत केला. पण अहमदशहाला इब्राहीमखान छावणीत आहे असे कळले. त्याने कसून चौकशी केली आणि मग हाफिज रहमतखानाला कबूल करावे लागले की बादशहाचा राग शांत होईपर्यंत आपण त्याला लपवून ठेविण्याचे ठरविले होते. अहमदशहाने सांगितले की काफरांशी मिळून मुसलमानांचा नाश करू पाहणाऱ्याला जीवंत ठेवणे शक्य नाही. त्याच्यावर दया दाखविली तर पुढे मागे आपण लांब आहोत असे पाहून तो पुन्हा युद्ध करण्यास मागे पुढे पाहणार नाही. अहमदशहाने इब्राहीमला ठार मारण्याची आज्ञा केली. त्याच्या मुलाला हाफिज रहमत खानाने सोडून दिले.

काही दिवसांनी अहमदशहा दिल्लीस पोहोचला. आणि तेथून कंधारला परतण्याची त्याने तयारी केली. सरदारांना निरोप देताना त्याने सांगितले की हिंदुस्थानात येण्यात आपला उद्देश मराठ्यांचा नाश आणि मुसलमानी सत्तेची स्थापना हा होता. तो पूर्ण झाला आहे. आता एकी राहिली तरच त्यांचे वर्चस्व टिकेल. शुजाउद्दौला हा भांडणे लाविल्याशिवाय राहाणार नाही हे ओळखून त्याने त्याला आपल्याबरोबर कंधारला नेण्याचे ठरविले. पण हाफिज रहमतखानाने आपले आणि शुजाउद्दौल्याचे घनिष्ठ संबंध ओळखता, अहमदशहाला विनंती केली की शुजाउद्दौल्याला अवधकडे परत जाऊ द्यावे. अहमदशहा या गोष्टीला नाखुशीने कबूल झाला. पण शुजाउद्दौला अफगाणांना स्वस्थ बसू देणार नाही, असा धोक्याचा इषारा त्याने हाफिज रहमतखानाला देऊन ठेविला.

## तारीखे हुसेनशाही

(या ग्रंथाचा कर्ता इमामुद्दीन हुसेनी हा १२१२ हिज्री म्हणजे इ. स. १७९६-९७ मध्ये अहमदशहा अब्दालीचा नातू शहाजमान याच्या बरोबर लाहोर ते पेशावरच्या प्रवासात होता. पेशावर येथे पोहोचल्यावर त्याने अब्दालीच्या घराण्याचा इतिहास लिहून काढला. त्यानंतर तो लखनौला परत आला. तेथे त्याने आपला ग्रंथ आपला गुरू सय्यद ख्वाजा अबु मुहसिन यास दाखविला. तो त्याला पसंत पडला. अबु मुहसिनने त्याला म्हटले की अहमदशहा आणि त्याचा मुलगा तैमुर यांच्या हकीकतीचे एक पुस्तक माझ्यापाशी आहे. त्याचे तू साध्या फारसीत भाषांतर कर. आणि आपल्या पुस्तकात समाविष्ट करून एक ग्रंथ तयार कर.

गुरूच्या आज्ञेप्रमाणे इमामुद्दीन हुसेनी याने पुढील वर्षी ग्रंथ तयार करून त्याने नावे तारीखे हुसेनशाही ठेविले. या ग्रंथाचा उपयोग अब्दुलकरीम अलवी याने इ. स. १८४२ मधे लिहिलेल्या आपल्या अब्दाली घराण्याच्या चरित्रात केला आहे. तसेच सुल्तान महंमद खान याने इ. स. १८६३ मधे तारीखे सुल्तानी या नावाचा अब्दाली घराण्याचा इतिहास लिहिला त्यातही तारीखे हुसेनशाहीचा उपयोग करून घेण्यात आला आहे.

हा ग्रंथ अद्याप अप्रकाशित आहे. महाराष्ट्र राज्याच्या सरकारी दप्तर खान्याचे संचालक डॉ. पी. एम्. जोशी यांच्या प्रयत्नाने या ग्रंथाची फोटोस्टाट प्रत मिळाली. या ग्रंथातील पानीपत संबंधीचा जो मजकूर आहे त्याचा मराठी अनुवाद खाली देण्यात येत आहे.)

(५४) पावसाळा संपला. दक्षिणेतील फौजा सर्व प्रकारच्या युद्ध सामग्रीने सज्ज होऊन, समुद्राच्या लाटाप्रमाणे आणि मुंग्या आणि टोळ यापेक्षाही अधिक अशा संख्येने युक्त होऊन इस्लामीयांचा बीमोड करणे आणि अहमदशहाशी युद्ध करणे हे उद्देश धरून उत्तर हिंदुस्थानच्या रोखाने निघाल्या. त्या शहाजहानाबाद येथे पोहोचल्या. या सैन्यात अनेक उत्कृष्ट आणि अनुभवी सरदार होते. विशेषत: त्यांचा सेनापती भाऊ नावाचा होता. त्याच्याबरोबर मराठा राष्ट्राचा प्रमुख बाजीराव याचा मुलगा विश्वासराव हा होता. जनकोराव आणि सुभेदार मल्हारराव यांचा उल्लेख पूर्वी आला आहे. बाजीरावाचा मुलगा शमशेर बहादुर हा मुसलमान होता. त्याची आई मुसलमान होती. हिंदूंच्यात अशी पद्धत आहे की एखादी मुसलमान बाई त्यांनी घरात घातली तर तिच्या पोटी झालेला मुलगा अगर मुलगी यांना ते मुसलमान करतात. इब्राहीमखान गार्दी याजपाशी बारा पल्टणी होत्या. प्रत्येक पल्टणीत एक हजार बंदुकधारी पायदळ शिपाई असतात. त्यांची युद्धपद्धती ही फिरंग्याप्रमाणे असते. याशिवाय इब्राहीमखानापाशी स्वारही होते. इब्राहीमखान हा मोठा धीराचा सरदार होता. त्याने दक्षिणेत उत्कृष्ट कामगिरी बजाविली होती. त्याच्या शौर्याचा प्रभाव साऱ्या मराठा सरदारांवर पडला होता. शिंदे पाटीलही सैन्यात होते. पण त्या वेळी त्यांच्या हातात सत्ता नव्हती. मराठा सैन्यात पाचशे तोफा होत्या. या तोफांचे तोफची हे बहुतेक फिरंगी ख्रिस्ती होते. सैन्यात बारा हजार राऊत आणि काही हजार (पान ५५) पट्टाबाज होते. दक्षिणेत तल्वार आणि भाले चालविण्यात निष्णात असणाऱ्याना पट्टाबाज म्हणतात. याशिवाय सैन्यात साधनसामग्री बरीच असून बुणगेही बरेच होते. एकंदरीत स्वार आणि पायदळ मिळून सैन्य इतके प्रचंड होते की त्याची गणती करणे अशक्य आहे. इतके मोठे सैन्य यापूर्वी कोणी डोळ्यांनी पाहिले नाही आणि त्याचा मजकूर म्हाताऱ्या माणसांकडून ऐकिला नाही. सर्व प्रकारच्या साधनांनी युक्त असलेले हे सैन्य शहाजहानाबादेपाशी येऊन पोहोचले. गाजीउद्दीन इमादुल्मुल्क आणि सूरजमल जाट हे या सैन्याला येऊन मिळाले.

सारांश त्या सर्व सरदारांनी मिळून लाल किल्ल्याला वेढा घातला. त्येवेळी लाल किल्ल्याचा किल्लेदार नवाब मुहसिनुल्मुल्क याकूब अलीखान हा होता. त्याने किल्ला लढविण्यास सुरवात केली. दिल्लीहून पूर्वेच्या दिशेला सुमारे दीडशे कोसावर शहाजहानपूर हे गाव आहे. तेथे याकूब अलीखानाचे घराणे काही पिढ्यापासून वास्तव्य करून होते. या पूर्वी याकूब अलीखान हा हाफिज रहमत खानातर्फे वकील म्हणून अहमदशहाचा वजीर शहावलीखान याच्याकडे गेला होता. हा आपल्या जमातीचा आहे हे पाहून शहावलीखानाने त्याला अहमदशहाच्या पदरी लाविले.

(५६) याकूब अलीखानाला दिल्लीची किल्लेदारी देण्यात आली. शहाबलीखान हा बामजई टोळीचा होता. याकूब अलीखान ही बामजई होता.

सारांश टोळधाडी प्रमाणे मराठ्यांनी लाल किल्ल्याच्या भोवती गर्दी केली. याकूब अलीखान आणि किल्ल्यातील इतर माणसे यांची स्थिति फार पेचाची झाली. याकूब अलीखान हा स्वाभावाने सालस आणि दयाळू होता. किल्ल्यातील लोकांचे त्याने हाल पाहिले. सर्व हकीकत त्याने अहमदशहाच्या आणि शहावलीखानाच्या कानावर घातली. आणि वेळ प्रसंग ओळखून त्याने किल्ला मराठ्यांच्या हवाली केला.

याच सुमारास इमादुल्मुल्क आणि सुरजमल जाट हे तेथून निघून भरतपूर कुंभेरीकडे रवाना झाले. याला काय कारणे घडली ते कळले नाही. मराठ्यांनी किल्ल्याचा बंदोबस्त केला आणि एकाला किल्लेदार म्हणून नेमला. त्यावेळी भाऊ आणि इतर मराठे सरदार आपसात बोलू लागले की अहमदशहाचा पराजय होऊन अफगाण सरदार मारले गेले आणि मुसलमानांचा बीमोड झाला की विश्वासरावाला हिंदुस्थानचा बादशहा बनवावा. आपल्याबरोबर

देवाची मूर्ती आणिली आहे तिची स्थापना जुम्मामशिदीत करावी आणि मशिदीचे मंदिरात रूपांतर करावे. नमाजाच्या अप्रिय अशा बांगेऐवजी तेथे शंखाचा ध्वनी चालू करावा.

पण परमेश्वरी योजना त्या मूर्ख जमातीच्या (मराठ्यांच्या) विचारावर हसत होती. यानंतर मराठ्यांचे सैन्य कुंजपुऱ्याकडे रवाना झाले.

(५७) अब्दुस्समदखान महंमदजई, मिया कुतुबशहा आणि मोमिनखान हे आपल्या सैन्यासहित तेथे जमले होते. त्यांचा तळ कुंजपुऱ्याच्या बाहेर होता. कुंजपुचा जमीनदार नजाबतखान गुरगश्ती हा त्यांना म्हणाला की मराठ्यांचे सैन्य मोठे आहे. तुम्ही किल्ल्यात या आणि तुमची फौज किल्ल्याबाहेर राहू द्या. अब्दुस्समदखान व इतर सरदार हे नजाबतखानाच्या म्हणण्याप्रमाणे किल्ल्यात गेले. मराठ्यांनी एकच गर्दी करून हल्ला केला. अफगाणांची फौज किल्ल्याबाहेर होती तिची पिछेहाट झाली. पण किल्ल्याचे दरवाजे बंद केले असल्याने त्यांना आत जाता येईना. यामुळे अनेक लोक मारले गेले. मराठ्यांनी किल्ला घेतला. अब्दुस्समदखान महंमदजई, मिया कुतुबशहा वगैरे सरदार हे नजाबतखानाच्या दगाबाजीमुळे जखमी होऊन मारले गेले. केलेल्या पापाची शिक्षा म्हणून की काय नजाबतखानही मारला गेला.

मराठ्यांची फौज कुंजपुऱ्याकडे रवाना झाली हे ऐकून अहमदशहाने अनूपशहराहून आपला मुक्काम हलविला. त्याच्याबरोबर नजीबखान, शुजाउद्दौला, अहमदखान बंगश, हाफिज रहमतखान, अलीमहंमदखान रोहिल्याचा मुलगा फैजुल्लाखान इत्यादी सरदार होते.

(५८) मराठ्यांना शिक्षा करून त्यांचा मोड करण्याच्या उद्देशाने ते सगळे रवाना झाले. अहमदशहाचे सैन्य बागपतला पोहोचले तोच बातमी आली की दुष्ट मराठ्यांच्या हातून अहमदशहाच्या एकनिष्ठ सरदारांचा पूर्ण निकाल लागला आहे. या बातमीने अहमदशहाला अतिशय वाईट वाटले आणि त्वेष आला. बागपत येथे यमुनेच्या काठावर उभे राहून अहमदशहाने नजर टाकली तो त्याला दिसून आले की यमुनेला मोठा पूर आला आहे. नावा नसल्या तर सैन्य नदीपार होणे कठीण होते. आणि इतक्या नावा मिळविणेही कठीण. अहमदशहाने आपल्या भात्यांतून बाण काढला आणि त्याच्यावर मंत्र फुंकून त्याने बिस्मिल्लाअ-रहमानु-रहीम हे शब्द उच्चारून तो बाण नदीत उडविला. त्यावेळी अहमदशहापाशी गुलामांच्या चार पल्टणी उभ्या होत्या. त्यांना अहमदशहाने आज्ञा केली की परमेश्वराचे नाव घेऊन तुम्ही नदीपार व्हावे आणि टेहाळणी म्हणून पैलतीरावर चार कोसाच्या अंतरापर्यंत उभे राहावे. कारण शत्रूचे बेसुमार सैन्य पंचवीस कोसांच्या अंतरावर ठाण मांडून आहे. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे गुलामांच्या पल्टणींनी नदी ओलांडली.

(५९) असे म्हणतात की नदीचे पाणी घोड्याच्या खोगिरापर्यंत येऊन लागले होते. यानंतर अहमदशहाने आज्ञा केली की प्रत्येक स्वाराने एक पायदळ शिपाई आणि थोडे सामान आपल्या पाठीमागे घोड्यावर घ्यावे. जड सामान हत्तीच्या पाठीवर ठेवण्यात येऊन नदीपलीकडे नेण्यात आले. अशा प्रकारे परमेश्वराच्या कृपेने आणि अहमदशहाच्या भाग्याने सर्व सैन्य सुखरूपपणे पार झाले.

हे झाल्यानंतर अहमदशहाच्या आज्ञेने सैन्याने श्रमपरिहार होऊन आपली तयारी पूर्वीप्रमाणे व्हावी या उद्देशाने एक दोन दिवस संथ आणि हळू प्रवास केला. आणि सराई संभलका या ठिकाणी अहमदशहाचे सैन्य येऊन ठेपले. तेथे त्यांना कळले की मराठ्यांचे पंचवीस हजार स्वार लढण्याच्या उद्देशाने संभलका आणि आसपासच्या भागात जमले आहेत. अहमदशहा घोड्याच्या जीन पोश (खोगिरी) वर बसून सैन्याच्या रचनेचा हुकूम देत होता.

सरदार शहापसंदखान हा देखणा, भव्य आणि पराक्रमी होता. तो त्यावेळी अहमदशहापाशी उभा होता. त्याचकडे वळून अहमदशहा म्हणाला की शहापसंदखान आजची आघाडीची (करावली) लढाई तुझी. ही जी कुत्री (मराठे) आज येथे जमली आहेत त्यांना शिक्षा करणे हे तुझ्याकडे सोपवीत आहे.

(६०) आज्ञेप्रमाणे शहापसंदखान याने अहमदशहाला कुर्निसात केला आणि आपले तीन-चार हजार स्वारांचे पथक घेऊन तो निघाला. मराठे आणि अफगाण यांची गाठ पडली. आपसात चांगलेच युद्ध झाले. शेवटी मराठ्यांना अफगाणांचा मारा सहन न होऊन ते मागे हटले. अफगाणांनी अनेकांना धुळीत मिळविले आणि अनेकांची डोकी कापली. शहापसंदखानाने कापलेली डोकी अहमदशहापाशी आणिली. असे म्हणतात की शहापसंदखानाच्या पथकातील तीन-चार हजार स्वारांपैकी प्रत्येक स्वारापाशी एक, दोन किंवा तीन पर्यंत मराठ्यांची डोकी होती. अहमदशहा अब्दालीला हा एक शकूनच वाटला. त्याने शहापसंदखानाची स्तुती करून त्याच्या बद्दल धन्योद्गार काढले आणि त्याला बक्षिसी देऊन त्याचा मानसन्मान केला.

शहापसंदखानाने विनंती केली की किब्लाये आलम, माझे प्राण आपल्या कारणी पडोत. या कुत्र्यांची (मराठ्यांची) युद्ध पद्धती मी आज पूर्णपणे पाहिली आहे. इन्शाल्ला भाग्याने या सर्व कुत्र्यांची कत्तल होईल. त्यावेळी अहमदशहाच्या तोंडून भविष्यवाणी बाहेर पडली की शहापसंदखान, या कुत्र्यांचा आणि काफरांचा पूर्ण नि:पात होण्यास अद्याप काही अवधि आहे. शेवटी ही दक्षिणी कुत्री पूर्णपणे नाश पावतील. अहमदशहाची ही भविष्यवाणी म्हणजे चमत्कारच समजला पाहिजे.

(६१) अहमदशहा आपले सैन्य आणि सरदार यासहित कूच करून आला ही बातमी भाऊ आणि इतर सरदार यांना लागली तेव्हा ते कुंजपुऱ्याहून निघून कर्नाल आणि पानीपतच्या मधे पोहोचले. पानीपत हे गाव दिल्लीहून पश्चिमेकडे चाळीस कोसांवर बसले आहे. अहमदशहाच्या आज्ञेप्रमाणे दुराणी सैन्याने मराठी सैन्याच्या भोवती लूटमार चालविली. मराठ्यांचे सैन्य प्रचंड होते. तरी त्यांनी सैन्याभोवती खंदक खणून छावणी उभी केली. आणि दमदमे बांधून अजगराच्या तोंडाप्रमाणे दिसणाऱ्या तोफा त्यांवर चढविल्या. अहमदशहाने या वेळी एक युक्ती केली. त्याने पश्चिमेच्या दिशेने कूच करण्याचे सोंग केले आणि मुक्कामावर त्याने हलके आणि कुचकामाचे सामान आणि निकामी घोडी आणि जनावरे ठेवून दिली. मराठे आणि हिंदुस्थानी आपसात बोलू लागले की असेच हळूहळू सरकत अहमदशहा शेवटी आपल्या देशाला निघून जाईल. मराठ्यांना ही बातमी लागताच त्यांनी अहमदशहाने टाकून दिलेल्या गोटावर चाल केली आणि तेथे सापडलेली घोडी, गुरे ढोरे आणि इतर सामान लुटून ते छावणीकडे परत येऊ लागले.

(६२) इतक्यात सरदार जहानखान हा जवळच दबा धरून बसला होता. त्याने मराठ्यांच्यावर एकाएकी हल्ला चढविला. मालमत्ता लुटून नेण्यात मराठे गुंतले होते. त्यांनी घोडी सामानाने लादलेली होती ती घाबरून इकडे तिकडे धावू लागली. अफगाणांनी मराठ्यांवर तुटून पडून सर्वांची कत्तल केली. असे म्हणतात की त्या चकमकीत मराठ्यांचा एकही मनुष्य निसटला नाही. युद्ध संपल्यावर सरदार जहानखान हा एक टेकडीवर बसून आपली तल्वार स्वच्छ करीत होता त्यावेळी रणांत पडलेल्यांना पाहण्याकरिता शुजाउद्दौला त्या ठिकाणी आला. शुजाउद्दौल्याने म्हटले की 'सरदार सलाम आलेकुम.' जहानखानाने म्हटले आलेकुम सलाम, यावे यावे, कुशल आहे ना. शुजाउद्दौला म्हणाला, हो बादशहाच्या कृपेने सगळे ठीक आहे. यावर जहानखान म्हणाला, बोला, नबाब मिर्जा, मी किती काफरांना मारले आहे, यावर शुजाउद्दौला म्हणाला की सुमारे पाच हजार काफर मारले गेले असतील, यावर

जहानखान हसला आणि थट्टेने म्हटला की,

(६३) नबाब फर्जंदखान बहादुर, प्रत्येक डोक्याला एक रुपाया देण्याचे तुम्ही कबूल केलेत तर मी तुम्हाला वीस हजार डोकी दाखवीत. असे म्हणून त्याने आपल्या फौजेला बोलाविले. फौजेतील शिपायांनी आपापल्या तोबऱ्यांतून (पिशव्या) डोकी काढून ती शुजाउद्दौल्यासमोर टाकली. असे म्हणतात की प्रत्येक तोबऱ्यांत तीन-चार डोकी होती. जहानखानाबरोबर एकंदरीत चार-पाच हजाराचे तरी सैन्य होते. शुजाउद्दौला हे पाहून थक्क झाला. त्याने जहानखानाच्या शौर्याची खूप तारीफ केली. मग ते दोघे मिळून छावणीला परतले. मग जहानखानाने कापलेली डोकी अहमदशहाला दाखविली. त्याने पण जहानखानाबद्दल धन्योद्‌गार काढले. नंतर ती सर्व डोकी मैदानात टाकून देण्यात आली. तेथे त्यांचे ढिगारे सर्वांच्या नजरेस पडत. अशा प्रकारे प्रत्येक हल्ल्यात दोन तीन हजार मराठे मारले जात. अफगाण सैन्यात कमी माणसे मारली जात.

या सुमारास अफगाण छावणीतील हिंदुस्थानी (रोहिले) सरदारांना बातमी लागली ती अशी - भाऊच्या आज्ञेने गोविंद पंडित नावाचा सरदार दिल्लीहून निघाला आहे. रोहिले आणि शुजाउद्दौला यांचा मुलूख लुटण्याचा त्याचा उद्देश आहे.

(६४) अहमदशहाला जे लोक मिळाले आहेत त्यांची मालमत्ता, आप्तइष्ट, बायका पोरे ही नष्ट करावी या हेतूने तो गाजिउद्दीन नगरपाशी तळ देऊन आहे. त्याच्या बरोबर चाळीस पन्नास हजाराची फौज आहे. या बातमीने अत्यंत अस्वस्थ होऊन रोहिले सरदार आणि शुजाउद्दौला यांनी ही हकीकत अहमदशहाला कळविली. त्यावेळी हाजी अताईखान आणि हाजी करीमदादखान हे सरदार नुकतेच अफगाणिस्तानातून आले होते. ते या वेळी अहमदशहापाशी हजर होते. रोहिले सरदार आणि शुजाउद्दौला इत्यादींची काळजी दूर व्हावी या हेतूने अहमदशहाने अताईखान आणि करीमदादखान यांना आज्ञा केली की तुम्ही ताबडतोब गोविंद पंडितावर चाल करून जावे आणि त्याचा मोड करून उद्या या वेळपर्यंत शत्रूची डोकी हजर करावीत. त्यावेळी दिवस मावळण्यास एक प्रहरापेक्षाही कमी असा अवधी होता. त्या उभय सरदारांनी हाफिज रहमतखानाचा मुलगा इनायतखान याच्या सैन्यांतून पाचशे स्वार आणि सहा हेर घेतले. आणि स्वतःचे तीन चार हजार स्वार बरोबर घेऊन ते कूच करून निघाले. त्यांनी यमुना ओलांडली आणि ऐन पहाटे गोविंद पंडितावर तुटून पडले.

(६५) त्यांनी त्याच्या सैन्याचा धुव्वा उडविला आणि गोविंद पंताचे डोके कापून घेतले. तसेच आणखी पाच हजार शत्रूंची डोकी कापून घेऊन ते दुसऱ्या दिवशी त्याच वेळी छावणीत परत आले. या घटनेने हिंदुस्थानी सरदारांची काळजी दूर झाली.

सारांश भाऊच्या आणि अफगाणांच्या आधाडीच्या चकमकी नेहमी होत. अफगाणांच्या छावणीत प्रत्येक जण आपापल्या मोर्च्यात ठाण मांडून राहात होता. परमेश्वरी संकेत पहा. एके रात्री दिल्लीहून मोठा खजिना भाऊच्या सैन्यात येत होता. योगायोगाने खजिन्याचे रक्षक मराठे हे चुकून रोहिल्यांच्या छावणीत आले. त्यांच्या पैकी एकाने दक्षिणी भाषेत विचारले की ही कोण्या सरदाराची पागा आहे. हे ऐकताच रोहिल्यांनी त्यांच्यावर हल्ला करून त्यांना ठार मारले आणि खजिना लुटला. या धुमश्चक्रीत दुराणी फौजेचे अफगाण शिपाई आले. सारांश सर्व मराठे शिपाई मारले गेले आणि संपूर्ण खजिना हस्तगत झाला.

असेच एके रात्री इब्राहीमखान गार्दी याचा भाऊ फत्तेखान याने तयारी करून रोहिल्यांच्या मोर्च्यांवर छापा घातला.

(६६) मोर्च्यातील लोक सावध होऊन लढू लागले. त्यांनी शत्रूची तीस निशाणे आणि काही तोफा हस्तगत केल्या. पराजय होऊन फत्तेखान आपल्या छावणीकडे परत गेला.

आणखी एकेदिवशी नजीबखान आणि इनायतखान यांचे रोहिले आपल्या मोर्च्यातून बाहेर पडले आणि लढत झगडत शत्रूच्या छावणीत घुसले. नजीबखानाच्या रोहिल्यांनी तशीच पुढे चाल केली आणि कित्येकांना मारीत ते मराठा छावणीतील बाजारापर्यंत पोहोचले. मराठ्यांच्या तोफावर बसून ते डफ वगैरे वाद्ये वाजवू लागले. इतक्यात चाळीस पन्नास हजार मराठे त्यांच्यावर तुटून पडले आणि त्यांनी अफगाणांना आपल्या छावणीत कोंडले. मराठ्यांनी आपल्या तलवारी आणि भाले चालविण्यास सुरवात केली. त्याप्रमाणे मोठे घनघोर युद्ध झाले. अफगाण निकराने लढले. परंतु हे संख्येने कमी होते. मराठ्यांचे सैन्य प्रचंड होते, मराठ्यांच्या स्वारांनी त्यांना अतिशय मार दिला. त्यामुळे अफगाणांची दुर्दशा होऊन ते मारले गेले. नजीबखानाच्या सैन्यापैकी जवळजवळ सहा हजार माणसे त्यादिवशी मारली गेली. नजीबखानाची सगळी शक्ती त्यांच्यामुळेच होती. वेढल्या गेलेल्या रोहिल्यांपैकी फक्त पाचशे माणसे जबर जखमा अंगावर घेऊन परत आली.

(६७) ते शिपाई जखमी झाले होते तरी त्यांचा उत्साह दांडगा होता. ते डफ बजावीत आणि नाचत बागडत आपल्या छावणीकडे परत येत होते. शुजाउद्दौल्याने त्यांना पाहिले आणि म्हटले की काय शूर माणसे आहेत ही. शुजाउद्दौला आणि नजीबखान यांचे मोर्चे जवळजवळ होते. त्यांचे तंबूही जवळजवळ होते. हाफीज रहमतखान हा आजारी असल्यामुळे प्रत्यक्ष युद्धात भाग घेऊ शकला नाही. पण त्याचा मुलगा इनायतखान आणि चुलतभाऊ दूंदेखान यांनी लढाईत उत्कृष्ट कामगिरी बजाविली. बहुतेक हिंदुस्थानी सरदारांनी या युद्धात चांगली कामे केली आणि प्रत्यक्ष लढाईत ते धीराने आपल्या जागी ठाण मांडून राहिले.

असे म्हणतात की जवळजवळ पाच महिनेपर्यंत मराठे आणि अफगाण यांच्यात चकमकी चालू होत्या. अफगाण फौजेने मराठा छावणीची रसद तोडली होती. त्यामुळे त्यांच्या छावणीत धान्याची आणि चाऱ्या कडब्याची इतकी टंचाई झाली की लोक जनावरांच्या हाडाचे पीठ करून भक्षू लागले. अनेक घोडी निकामी होऊन उपासमारीने मेली.

(६८) निरुपाय होऊन दक्षिणी सरदार हे तोफखाना आणि इतर सामग्री बरोबर घेऊन छावणीच्या बाहेर पडून युद्धाला प्रवृत्त झाले. मोठे घनघोर युद्ध होऊ लागले. काळाने यापूर्वी शस्त्रसौदामिनीचा असा लखलखाट कधीच पाहिला नसेल आणि आकाशाने यापूर्वी तोफांचा असा दणदणाट कानाने कधी ऐकिला नसेल. रणभूमीवर उडालेल्या धुराळ्याने सर्वत्र अंधार पसरला. पृथ्वी कंपायमान होऊ लागली. तल्वारी, बाण इत्यादी शस्त्रे वीराचे प्राण हरण करू लागली. यावेळी हाफिज रहमतखानाचा मुलगा इनायत खान हा तरुण होता.

(६९) आपण कामगिरी बजावून दाखववावी या ईर्ष्येने प्रेरित होऊन तो आपल्या काही हजार रोहिल्यांसहित मराठ्यांच्या गोटात घुसला आणि त्वेषाने लढू लागला. जवळ जवळ साठ हजार मराठे स्वारांनी त्याला वेढले. आणि त्याची बाहेर निघण्याची वाट बंद करून टाकली. नंतर तल्वारी, भाले, बरछी इत्यादींनी त्यांनी त्याच्या सैन्यावर मारा केला. अफगाण निर्धाराने लढत होते. तो वाघाचा बच्चा इनायतखान इतके ठाण मांडून लढत होता की आकाश आणि पृथ्वी हलली असती तरी तो रेसभरही विचलित झाला नसता. इतर हिंदुस्थानी सरदारही आपापल्या मोर्च्यावर हिंमतीने लढत होते. अहमदशहा अब्दाली एका उमद्या घोड्यावर स्वार झाला. त्याचे सैन्य तयार होऊन त्याच्या आज्ञेची वाट पाहू लागले. इतक्यात शुजाउद्दौला घोड्यावर बसून त्याठिकाणी आला आणि म्हणाला, ''कुर्बानत

शवम, मी तुमच्यावर कुर्बान होवो. सर्व मराठे आज छावणीतून बाहेर पडून युद्ध करीत आहेत.' अहमदशहाने विचारले की फर्जंदखान बहादूर, हे तू आपल्या डोळ्याने पाहिलेस काय. यावर शुजाउद्दौला म्हणाला की हो मी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे.

(७०) अहमदशहा म्हणाला की पुन्हा नीट चौकशी करून मला सांग. यावर शुजाउद्दौला तेथून निघून आपल्या मोर्च्याकडे गेला. याच सुमारास रोहिल्यांनी येऊन विनंती केली की इनायतखान हा शत्रूच्या तडाख्यात सापडला असून लवकरच त्याचा निकाल लागेल असे वाटू लागले आहे. त्याची कुमक लवकर व्हावी. यावर अहमदशहाने हाजी अताईखान यास फर्माविले की, अताईखान, तू जा आणि त्या कुत्र्यांना आपल्या तल्वारीचा प्रताप दाखीव. त्याप्रमाणे हाजी अताईखान हा आपल्या दोन-तीन हजाराच्या पथकासहित निघाला आणि त्याने शत्रूवर गोळ्यांचा वर्षाव केला. पण या धुमश्चक्रीत मराठ्यांची गोळी लावून अताईखान हा ठार झाला. हाजी अताई खान मदतीस आला म्हणून रोहिल्यांना हिंमत आली होती. पण तो मारला जाऊन त्याचे दळ मागे हटले हे पाहून ते फिरून निराश झाले. तरी इनायतखान मराठ्यांशी निकराने लढत होता. पण मराठे संख्येने अधिक होते त्यामुळे इनायतखानाच्या सैन्यातील लोक मारले गेले अगर जखमी झाले. हे पाहून अहमदशहाने आपल्या गुलामांच्या तीन पलटणी तिकडे रवाना केल्या. प्रत्येक पल्टणीत एक एक हजार स्वार असत.

(७१) या पल्टणीच्या प्रमुखांना मिंगाबाशी म्हणत. अहमदशहाने त्यांना आज्ञा केली "जा आणि त्या कुत्र्यांना शिक्षा करा." एक पल्टन आज्ञेप्रमाणे रवाना झाली. ती थोड्या अंतरावर गेली होती तोच तिच्या मागोमाग दुसरी पल्टण रवाना झाली. लगेच पाठोपाठ तिसरी पल्टण निघाली. एके ठिकाणी भाऊ आणि इतर सरदार हत्तीवर स्वार होते; आणि तेथे एकंदर तीनशे हत्ती होते त्या ठिकाणी अब्दालीची पहिली पल्टण पोहोचली. तिने बंदुकीच्या फैरी केल्या आणि ती मागे फिरली. लगेच तिच्या मागे असलेली पल्टण पुढे झाली आणि तिने गोळ्यांचा वर्षाव केला आणि ती पण मागे फिरून बंदुकी भरू लागली. या अवधीत तिसरी पल्टण पुढे होऊन गोळ्या झाडीत होती. नंतर पहिली पल्टण पुन्हा पुढे झाली. त्यानंतर दुसऱ्या पल्टणीने तिची जागा घेतली. असा सतत प्रकार चालू होता. या गोळ्यांच्या वर्षावामुळे, भाऊ, विश्वासराव आणि इतर अनेक सरदार मरण पावले. हत्ती मार खाऊन आपल्या सैन्यात सैरावैरा धावू लागले.

(७२) अफगाणांनी पुढे होऊन मराठी सैन्यावर तल्वारी चालविण्यास सुरवात केली. दक्षिण्यांचा फार मोठा पराजय झाला. त्याचे सैन्य मोठे आणि युद्ध सामग्रीही भक्कम, पण ते पळ काढू लागले. अफगाण, रोहिले आणि हिंदुस्थानी सैन्याने चोहोकडे कत्तल आरंभिली. इतके दक्षिणी मारले गेले की काळाने अशी कत्तल कधीच पाहिली नसेल. पृथ्वीला इतके रक्त यापूर्वी कधीच पिण्यास मिळाले नसेल. चाळीस पन्नास कोसापर्यंत प्रेते पडली असून, जगातील गर्वोन्मत्तांना धडा शिकवीत होती. सारांश मेलेल्यांची गणती करणे शक्य नाही. सारे मैदान प्रेतांनी आणि सारे वातावरण जखमी लोकांच्या आर्तस्वरांनी भरून गेले होते. असे म्हणतात की एक मल्हारराव सोडून दक्षिणी सरदारांपैकी एकही निसटला नाही. मल्हारराव याचे शुजाउद्दौला आणि नजीबखान यांच्याबरोबर सूत होते.

(७३) आणि त्यांचे मोर्चेही परस्परांसमोर होते. त्यामुळे मल्हारराव आपल्या माणसांसहित सुरक्षित निघून गेला. शिंदे पाटील याला पुढे हिंदुस्थानात मोठा अधिकार प्राप्त झाला. तो जखमी होऊन निसटला. एका स्वाराने त्याचा साठ कोसापर्यंत पाठलाग केला. त्याने पाटील बुवाला घोड्यावरून खाली ओढले आणि घोड्यावरील सोनेचांदी लुबाडून तो चालता झाला. पाटील बुवांना झालेल्या जखमांमुळे मरेपर्यंत त्याला दोन माणसांच्या

साहाय्याशिवाय उठता येत नसे. समशेर बहादुर जखमा खाऊन भरतपूर कुंभेरीकडे गेला. सूरजमलने त्याचा पुष्कळ उपचार केला पण काही उपयोग न होता तो मृत्यू पावला.

इब्राहीमखान गार्दी जखमी होऊन कैद झाला.

(७४) शुजाउद्दौला आणि इतर सरदार यांनी त्याच्याबद्दल अहमदशहापाशी बरीच रदबदली केली. पण उपयोग झाला नाही. अहमदशहा शुजाउद्दौल्याला म्हणाला की फर्जंदखानबहादुर मी या दुष्टाला (इब्राहीमखान) अनेक वेळेला लिहून कळविले की तू मुसलमान आणि अफगाण आहेस. तू माझ्या चाकरीत ये. तुला मी मोठा प्रांत देईन. या फुटक्या नशिबाच्या माणसाने मला उत्तर दिले की मी काफर आणि मुसलमान यांना ओळखीत नाही. मी भाऊसाहेबांबरोबर आहे. ते मला सांगतील त्यांच्याशी युद्ध करण्यास मी तयार आहे. म्हणून या रस्ता चुकलेल्या धर्मभ्रष्टाला वध हीच शिक्षा योग्य होय. अहमदशहाच्या आज्ञेने इब्राहीमखानाला मारण्यात आले. त्याच्या प्रेताला दोर बांधून ते छावणीतून फरफटत ओढण्यात आले. नंतर ते कावळे आणि गिधाडे यांचे भक्ष्य बनले. शत्रूचे हत्ती, घोडे, सोने, चांदी इत्यादी अगणित संपत्ती अफगाणांच्या हाती पडली. सारांश अहमदशहाच्या विजयाचा डंका अलम दुनियेत वाजू लागला.

(७५) अहमदशहाचे सर्व सरदारांनी अभिनंदन केले. त्यानेही सर्वांना वस्त्रे अलंकार देऊन त्यांचा गौरव केला. अहमदशहाने इनायतखानाला म्हटले की हा विजय तुला मुबारक असो आणि परमेश्वराची कृपा तुझ्यावर आणि तुझ्या बापावर सदैव असो.

नंतर तो सर्व सरदारांना म्हणाला की दिल्लीपासून बंगाल दख्खनपर्यंत मी सारे शत्रू नाहीसे केले आहेत. आता तुम्ही एकोप्याने आणि गुण्यागोविंदाने नांदून आमचे अभिष्ट चिंतन करावे. शुजाउद्दौला हा तुमच्या जमातीच्या (रोहिला) नाही. मी त्याला आपल्या बरोबर नेतो आणि तेथे त्याला समृद्ध राज्य देतो.

हे ऐकून सगळे परस्पर गप्प राहिले. कारण ते आतून या गोष्टीला कबूल होते. पण हाफिज रहमतखान म्हणाला की आमच्यात आणि शुजाउद्दौल्यात काही वैमनस्य नाही. त्याने अडचणीच्या वेळी आमची मदत केली आहे. आपण त्याला बरोबर घेऊन जाऊन तिकडे राज्य द्याल हे खरे असले तरी,

(७६) लोक हेच म्हणतील की सगळे अफगाण एक झाले आणि एक उरलासुरला मोगल राहिला होता त्याला त्यांनी काढून लाविले. हे आम्हाला बरे वाटत नाही. अहमदशहा म्हणाला की मी शुजाउद्दौल्याच्या विरुद्ध नाही. तुमच्या हिताकरिता मी असे म्हटले. तुम्हाला पटले नाही. पण लक्षात ठेवा की या गोष्टीचा परिणाम वाईट होणार आहे. यानंतर अहमदशहाने सगळ्या हिंदुस्थानी सरदारांना निरोप दिला आणि तो अफगाणिस्तानकडे रवाना झाला.

## डौ कृत हिंदुस्थानचा इतिहास

(अलेक्झांडर डौ हा अठराव्या शतकात हिंदुस्थानात ईस्ट इंडिया कंपनीच्या पदरी लेफ्टनंट कर्नलच्या हुद्यावर होता. त्याने फारसी साधनांवर आधारलेला असा हिंदुस्थानचा इतिहास तीन खंडात लिहिला आहे. या ग्रंथाची दुसरी आवृत्ती इ. स. १८०३ मधे प्रसिद्ध झाली. या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडाच्या पान चारशेचार वर तो म्हणतो–

''इराणचा नादिरशहा याने हिंदुस्थानवर स्वारी केली त्याला तीस वर्षे झाली. या काळात दिल्लीच्या दरबारात

जी स्थित्यंतरे झाली त्याची माहिती युरोपमधे नाही. आशियातही त्यांची हकीकत लिहून ठेविण्यात आली नाही. मोगलसाम्राज्यातील अंदाधुंदी अशीच चालू राहिली तर या काळात वावरणाऱ्या व्यक्तीबरोबरच या कालखंडाच्या स्मृती नष्ट होतील. म्हणून नादिरशहाच्या स्वारीनंतर घडलेल्या घटना प्रस्तुत ग्रंथकर्त्याने वर्णिल्या आहेत. या हकीकतीला आधार म्हणून ग्रंथकर्त्याने एका फारसी हस्तलिखिताचा उपयोग केला आहे. त्या ग्रंथात महंमदशहा बादशहाच्या कारकिर्दीच्या सहा वर्षांची हकिकत आली आहे. सध्याचे मोगल बादशहा (शहा आलम) यांचा चिटणीस रायरायान हा प्रस्तुत ग्रंथकर्त्याचा निकटचा मित्र आहे. त्याने मोगल राज्यातील अलीकडच्या काळातील हकिकती थोडक्यात लिहून काढल्या आहेत. त्याचाही उपयोग करून घेण्यात आला आहे.''

डौने हा मजकूर इ. स. १७६७ च्या सुमारास म्हणजे पानीपत नंतर सहा वर्षांनी लिहिला आहे. तो पानीपत संबंधी काय म्हणतो ते नजरेखाली घालण्यासारखे आहे. अर्थात रायरायान याने तो मजकूर अलाहाबाद येथे शहा आलमच्या दरबारी असताना लिहून दिला हे पाहता मजकुरात अनेक चुका आढळतात.)

डौ म्हणतो – (४७६) ''या सुमारास बातमी आली की दक्षिणेतून प्रचंड सैन्य घेऊन मराठे सरदार चालून येत आहेत. हिंदूंचे राज्य पुन्हा स्थापन करणे हा त्यांचा हेतु होता. या सैन्याचे आधिपत्य विश्वासराव, भाऊ आणि इब्राहीमखान गार्दी यांजकडे होते. अब्दालीने पराजित केलेले मराठ्यांचे सैन्य जमेत धरून एकंदर मराठी सैन्यात एक लाख घोडदळ होते मुसलमान सगळे घाबरून गेले. इस्लामच्या संरक्षणासाठी अब्दालीला जाऊन मिळणे त्यांना आवश्यक वाटले, शुजाउद्दौला, अहमदखान बंगश आणि इतर रोहिले सरदार हे आपापली सैन्ये घेऊन दिल्लीस रवाना झाले.

या सुमारास मराठ्यांनी जाटांच्या मुलखात प्रवेश केला. आपल्याला येऊन मिळावे अशी त्यांनी सूरजमलपाशी मागणी केली. हिंदू या नात्याने सूरजमलला वाटत होते की हिंदुस्थानात मुसलमानांचा नाश व्हावा. पण मराठ्यांच्या सत्तेचाही त्याला तिटकारा होता. म्हणून त्याने मराठ्यांची मागणी मान्य केली नाही. यामळे चिडून जाऊन मराठ्यांनी जाटांचा मुलूख उध्वस्त केला आणि सूरजमलला आपले पन्नास हजार सैन्य घेऊन मिळण्यास भाग पाडले. मराठ्यांच्या सैन्यात आता दोन लाख स्वार जमले. अबदालीच्या नेतृत्त्वाखाली जमलेले मुसलमान सैन्य दीड लाखाचे होते. या युद्धाकडे साऱ्या हिंदुस्थानचे डोळे लागले होते. सार्वभौम सत्ता मुसलमानांकडे चालू रहावी की हिंदूंच्या हातात परत यावी याचा निर्णय या युद्धाने होणार होता. मराठे येताहेत असे पाहून अब्दालीने दिल्ली सोडली आणि यमुना ओलांडून पलीकडील तीरावर आपली छावणी केली.

मराठ्यांनी लागलीच दिल्लीत प्रवेश करून शहर उध्वस्त केले. याचवेळी गाजिउद्दीनला कळून आले की अब्दाली आपल्याविरुद्ध असून नजीबुद्दौल्याचा हितचिंतक आहे. त्यामुळे त्याने मराठ्यांशी संधान बांधण्याचा प्रयत्न केला. पण त्यांनी त्याला धुडकावून लाविले. हे पाहून तो जाट राजाच्या आश्रयाला गेला. मराठ्यांना सोडून निघून जाण्याविषयी त्याने सूरजमलचे मन वळविले. त्याप्रमाणे सूरजमल आपल्या मुलुखाला गेला. गाजिउद्दीन पण त्याच्याबरोबर गेला. गाजिउद्दीनचे सार्वजनिक जीवन येथे संपले. इतर दुष्ट माणसांनी आपल्या दीर्घ आयुष्यात केली नाहीत इतकी दुष्कृत्ये आणि राजकारणे त्याने थोडक्या काळात केली. त्याच्या आजाने म्हणजे निजामुल्मुल्काने दक्षिणचा सुभा मिळविला. तसे करणे गाजिउद्दीनला जमले नाही. पण निजामुल्मुल्काचा धूर्तपणा, विश्वासघातकीपणा इत्यादी स्वभावविशेष त्याच्यात थोड्या फार प्रमाणात उतरले होते असे म्हणणे वस्तुस्थितीचे होईल.

दिल्लीत प्रवेश केल्यानंतर मराठ्यांनी शहाजहान बादशहाला कैदेत टाकले. त्याने काही आठवडेच राज्यपद

भोगले होते. मराठ्यांना काही मुसलमान अमीर उमराव मिळाले होते. त्यांचे समाधान करण्याकरिता मराठ्यांनी आलीगौहरचा मुलगा जवानबख्त याला गादीवर बसविले. आलीगौहरने यापूर्वीच बिहारमधे आपल्याला शहाआलम या नावाने बादशहा म्हणून जाहीर केले होते. जवानबख्ताला राज्य करण्याची पात्रता जरी असती तरी ज्यांच्यावर राज्य करावयाचे ते प्रजाजन कुठे होते. तो नाममात्र राजा होता. उध्वस्त झालेल्या राजधानीत त्याचे राज्य म्हणजे राज्यपदाची विटंबनाच होय.

जाट मराठ्यांना सोडून गेले हे ऐकल्यावर अब्दालीला यमुना ओलांडून मराठ्यांशी गाठ घेण्याची तळमळ लागली. या उद्देशाने तो नदीच्या काठाकाठाने कुंजपुऱ्याला पोहोचला. तेथे नजाबतखान हा रोहिला सरदार होता. अब्दालीने त्याला शरण येण्यास सांगितले. ते त्याने नाकारल्यावरून कुंजपुरा हल्ला करून घेण्यात आला. तेथील शिबंदीची आणि रहिवाशांची कत्तल करण्यात आली. मराठ्यांनी दिल्लीच्या बाजूने कूच केले. त्यांना आपल्या शक्तीवर फाजील विश्वास होता. म्हणून त्यांनी अब्दालीला रामऱ्याच्या उताराने यमुनापार होऊ दिले. पण त्याच्या धडाडीच्या हालचाली पाहून त्यांना थोडी काळजी वाटू लागली. म्हणून त्यांनी कर्नाल जवळ छावणी केली. महंमदशहा बादशहाने मागे तेथे छावणी केली होती. नादिरशहाने जेथे तळ ठोकला होता त्याच जागेवर अब्दालीने आपली छावणी केली.

उभय सैन्ये बारा दिवसापर्यंत आपापल्या छावणीत होती. या काळात मधूनमधून चकमकी होत होत्या. अब्दालीने मराठ्यांची रसद तोडली. मराठ्यांच्या छावणीत काहीही पोहोचू नये याचा त्याने कडक बंदोबस्त केला. मराठ्यांच्या छावणीत भयंकर दुष्काळ पडला. त्यामुळे अकराशे चौऱ्याहत्तर हिज्रीत वीस जमादिसानी रोजी ते आपल्या छावणीबाहेर पडले आणि त्यांनी अब्दालीवर हल्ला केला. त्यांचा पहिला हल्ला अत्यंत निकराचा होता. मराठ्यांनी निर्धाराने चाल केली. त्यांनी इतक्या प्रखरपणे अब्दालीवर हल्ला केला की त्याला मैदान सोडून पळून जाण्याची पाळी आली होती. पण शुजाउद्दौला आणि अहमदखान बंगश हे दहा हजार स्वारांसहित मराठ्यांच्या फळ्यावर तुटून पडले. यामुळे जयाचे पारडे एकदम बदलले. अब्दाली गोंधळला होता. त्याने जमवाजमव करून पुन्हा हल्ला केला. आणि मराठ्यांना परतविले. या युद्धाच्या बातम्या ज्या मिळाल्या आहेत त्या पाहता, या लढाईत आणि पाठलागात पन्नास हजार मराठे मारले गेले. ते काही असो. लढाई फारच निकराची झाली. कारण मराठ्यांचे सर्व सरदार लढाईत मारले गेले. एक मल्हारराव होळकर मात्र पहिल्या हल्ल्यातच मैदान सोडून पळून गेला. तीन दिवस मराठ्यांचा पाठलाग केल्यानंतर अब्दाली दिल्लीस परतला.''

(वरील मजकुरातील चुका हास्यास्पद आहेत. अब्दालीने कुंजपुरा घेऊन कत्तल केली. उभय सैन्याचा तळ कर्नालजवळ पडला. शुजाउद्दौला आणि अहमदखान बंगश यांच्यामुळे युद्धाची बिघडलेली घडी सावरली गेली वगैरे गोष्टी वस्तुस्थितीला सोडून आहेत. पानीपतच्या युद्धानंतर अवघ्या सात वर्षांच्या आत हा मजकूर लिहिला गेला हे पाहता एखाद्या वस्तुस्थितीविषयी गैरसमज किती लवकर उद्भवतात आणि पसरतात हे दिसून येईल.)

**(१) इमादुस्सादत**

(सय्यद गुलामअली नकवी हा रायबरेलीचा राहाणारा. गुलाम कादिरने शहा आलमचे डोळे काढले त्यावेळी गुलाम अली हा दिल्लीत होता. नंतर तो लखनौच्या नवाबाच्या आश्रयाला गेला. इ. स. १८०७ मध्ये त्याने इमानुस्सादत आणि त्यानंतर निगारनामाये हिंद हे दोन ग्रंथ लिहिले. पानीपत संबंधी त्यातील माहिती ही काशिराजाच्या

ग्रंथावरून घेतली असली तरी काशिराजाच्या ग्रंथात न आलेली थोडी बहुत हकिकत आपल्याला त्याच्या ग्रंथांतून आढळते. तितक्याच मजकुराचा मूळ फारसीवरून (इमादुस्सादत आणि निगारनाम्यातील पानीपतसंबंधीचे प्रकरण ही प्रसिद्ध झाली आहेत.) मराठी सारांश दिला आहे.)

**इमादुस्सादत (पान ७७ ते ८४)**

दत्ताजीच्या वधाची बातमी कळताच बाळाजी कोपायमान झाला. भाऊला बोलावून त्याने विश्वासरावाचा हात त्याच्या हातात देऊन म्हटले की आपल्या पुतण्याला बरोबर घेऊन जा. उत्तरेतील अफगाणेतर अमीर उमरावांना मिळवून घेऊन अफगाण जमातीची पाळेमुळे खणून काढा. मी तुमच्या पाठोपाठ जंगी फौज घेऊन निघतो. श्री भवनीच्या कृपेने मी तेथे पोहोचलो की कंधार हस्तगत करीन आणि अफगाणांचे बीज शिल्लक ठेवणार नाही. त्यानंतर बंगालचा जाफर अलीखान, शुजाउद्दौला सारखे एक दोन मुसलमान राहतील. ते शरण न आल्यास त्यांना अज्ञातवासात पाठवीन आणि शरण आले तर कबूतराप्रमाणे त्यांचे पंख कापून त्यांच्यावर लक्ष ठेवीन. नंतर विश्वासरावाला दिल्लीच्या गादीवर बसवून मी तीर्थयात्रेला निघेन. बाळाजीच्या आज्ञेप्रमाणे भाऊ विश्वासरावाला घेऊन निघाला. असे म्हणतात की भाऊ कमालीचा गर्विष्ठ आणि धर्मांध होता. त्याचे एक उदाहरण खालीलप्रमाणे आहे. मथुरेस आल्यानंतर भाऊचे लक्ष अब्दुलनबीच्या मशिदीकडे गेले. भाऊने सूरजमलला म्हटले "तुम्ही हिंदू राहिला कसे याचे आश्चर्य वाटते. तुमची धर्मावर श्रद्धा असती तर शहराच्या मधोमध असलेली ही मशीद प्रथम पाडून टाकली असती." सूरजमलने उत्तर दिले की, "महाराज, हिंदुस्थानची सत्ता बटकीसारखी आहे. आज अमक्याच्या हाती तर उद्या तमक्याच्या हाती अशी स्थिती आहे. माझ्या हयातीपर्यंत हे शहर माझ्या ताब्यात राहील अशी मला खात्री झाली तर ही मशीद पाडून जमीनदोस्त करीन. पण मी आज मशीद पाडावी आणि उद्या मुसलमानांचा ताबा झाला तर ते आपली प्रसिद्ध मंदिरे पाडतील आणि एका मशिदीच्या ऐवजी चार नव्या मशिदी उभ्या करतील. आता आपण आलाच आहात तर सर्व काही करणे सवरणे आपल्या हाती आहे" हे ऐकून थोड्यावेळाने भाऊने म्हटले "बरे आहे. अफगाणांवर विजय मिळाल्यावर मी जेथे जेथे मशिदी आढळतील त्यांचा समाचार घेईन."

सारांश भाऊ मथुरेहून दिल्लीला आला. तेथे शहाआलमला बादशहा म्हणून जाहीर करून जवानबख्तला युवराज म्हणून गादीवर बसविले. यापूर्वी जाहीर करण्यात आलेल्या शहाजहान (कामबख्शाचा नातू) याला कोपऱ्यात बसविण्यात आले. या नंतर भाऊने कुंजपुऱ्यावर स्वारी करून कुतुबशहाला मारले. (गुलाम अलीने भाऊ आणि कुतूबशहा यांचा संवाद दिला आहे.)

कुंजपुऱ्याची बातमी अहमदशहाला समजली. मराठ्यांचे लष्कर प्रचंड आहे. हे ऐकून अफगाण व रोहिले हादरले. अहमदशहा काळजीत पडला. कारण त्याला दक्षिणी फौजेची पूर्ण माहिती नव्हती. पण त्याने हिंमत सोडली नाही. त्याने आपला वकील मराठ्यांकडे पाठविला. आपल्या सैन्याचे बळ त्यांच्या मनावर ठसवावे हाही हेतू होता. तहाची अट ही होती की सिरहिंदच्या अलीकडे मराठे आणि सिरहिंदच्या पलीकडे अटकेपर्यंत अफगाणांचा ताबा असावा. या अटीवर मराठे म्हणाले की आम्हाला युद्ध हवे आहे असे नाही. अहमदशहाने काबूलपर्यंत आम्हाला मुलुख देऊन टाकावा. काबूलच्या पलीकडे त्याने राज्य करावे. नाहीतर कुठला तह आणि काय? आमच्या दक्षिणी घोड्यांचे पाणी तुमच्या शहाने अजून जोखले नाही. त्याला आपल्या विलायती (अफगाण) घोड्याबद्दल गर्व

आहे. त्याला माहीत नाही की आमच्या सैन्यात दहा हजार स्वार असे आहेत की त्यापैकी एक एक स्वार शंभर मोगल किंवा अफगाणी यांच्याबरोबर युद्ध करून त्यांना आपल्या भाल्याने जमिनीवर लोळवू शकतो. इतके सांगून मराठ्यांनी त्र्यंबकदास पंडित नावाचा हुशार वकील दुराणी वकिलाच्या बरोबर पाठविला. त्याने अब्दालीचा दरबार आणि त्यात जमलेले नरव्याघ्र पाहिले तेव्हा त्याची बोबडी वळली. त्याने धैर्य करून मराठ्यांचा निरोप सांगितला. दरबारातील लोकंनी त्याला ठार करण्याचे ठरविले पण वकिलाला इजा पोहोचविणे राजनीतीच्या विरुद्ध होय म्हणून त्याची सुटका झाली. जीव वाचला यातच सारे काही आले असे समजून वकील भाऊकडे परत आला.

इकडे अहमदशहाने शुजाउद्दौल्याला घेऊन येण्याकरिता नजीबखानाला त्याच्याकडे पाठविले. त्यापूर्वी भाऊने खालील अर्थाचे पत्र शुजाउद्दौल्याला पाठविले होते. "तुम्ही आणि आम्ही एकाच भात्यांतील बाण आहोत. मोगल बादशाही भरभराटीत असावी हीच आपली इच्छा आहे. अफगाण हे हिंदुस्थानी लोकांचे, त्यांच्या मानमरातबाचे आणि अब्रूचे शत्रू होत. हिंदुस्थानातील मुसलमानांना ते हिंदूपेक्षाही वाईट लेखतात. हिंदुस्थानातील एकसुद्धा सरदार इतमामात रहावा हे त्यांना खपत नाही. तुम्हीच एक शिल्लक आहात. अहमदखान (बंगश) हा बादशहामुळे वैभवाला चढला असला तरी केवळ त्यांच्या जातीचा म्हणून त्यांच्याशी मिळू इच्छितो. आपण धरून चालू की अफगाणांचा दक्षिणी लोकांवर विजय होईल. अशा स्थितीत अहमदशहा भोवती अफगाण सरदारांचाच घोळका राहील. तुम्हाला कोण विचारील. इतक्या सरदारांत एका हिंदुस्थानी सरदाराचे काय चालणार. मोगल बादशहा कुठे असणार आणि काय करू शकणार? आमचा उद्देश अफगाणांचा बीमोड करणे हाच आहे. कारण अहमदशहाच्या बळावर हे रोहिले माजले आहेत आणि त्यांना अस्मान ठेंगणे वाटत आहे. तैमूरचे वंशज भटकत फिरावेत आणि त्यांच्या जागी दुसरे स्थानापन्न व्हावेत हे आम्हाला पटत नाही. या घराण्याच्या मिठाला जागावे आणि आपले उर्जित करून घ्यावे असे वाटत असेल तर तुम्ही निस्संकोचपणे आम्हाला येऊन मिळावे. परमेश्वराने आमचे बरे केले तर शत्रूवर जय मिळवून आम्ही शहाआलमला बादशहा आणि तुम्हाला वजीर करू आणि आमचा ठरलेला भाग घेऊन आम्ही दक्षिणेकडे परत वळू. आमच्याशी तुम्ही येऊन मिळावे याचा अर्थ तुम्ही फौज घेऊन आमच्याकडे यावे असे आम्ही म्हणत नाही. उलट हिंदुस्थानी फौज आमच्या सैन्यात आल्याने भानगडी होतील. तुम्ही आपल्या राज्यातच राहावे आणि अहमदशहाचे म्हणणे ऐकू नये. श्रीमंत बाजीरावसाहेब आणि नवाब बुऱ्हाणुल्मुल्क यांच्यात जे करारमदार झाले होते ते सर्वांना माहीत आहेत. पूर्वापार चालत आलेला स्नेह चालू न ठेवणे आणि आमच्यावर राग करून दुसऱ्यांना जाऊन मिळणे न्यायाला सोडून आहे असे आम्हाला वाटते."

सारांश नजीबखानाने शुजाउद्दौल्याची मेहंदी घाट येथे गाठ घेतली आणि त्याला अहमदशहाचे पत्र दिले. याशिवाय अहमदशहाचा तोंडी निरोप. त्याने कळविला. शुजाउद्दौल्याने त्याला भाऊचे पत्र दाखविले. ते पाहून नजीबखान म्हणला "हे सर्व मराठ्यांनी पसरलेले कुटिल जाळे आहे. सांप्रतचे युद्ध हे इस्लाम आणि काफर यामधील होय. आपण अहमदशहाला येऊन मिळावे." यावर शुजाउद्दौल्याने म्हटले, "मी कोणत्याच पक्षाला मिळणार नाही. मराठ्यांचा जय झाला तर त्यांनी मला पत्रात लिहिल्याप्रमाणे ते माझ्या वाटेला जाणार नाहीत. बरे शहाला जय मिळाला तर त्यावेळी काय करावे याचा मी नंतर विचार करीन. मी काय म्हणून या दगदगीत पडावे. अब्दालीच्या छावणीत आपला अपमान करून घेण्यापेक्षा मराठ्यांच्या बरोबर मिळून लढणे बरे. एक तर आम्ही हिंदुस्थानी आणि दुसरे म्हणजे आम्ही शिया पंथाचे आहोत, अब्दालीच्या छावणीत आम्हाला नांदणे कठीण आहे."

नजीबखानाने यावर म्हटले, "आपल्याला अब्दालीच्या फौजेशी काय कर्तव्य आहे. परमेश्वर साक्ष, अब्दाली

तुमच्याकडे वाकड्या नजरेने पाहू तर द्या, माझ्या हातानी मी त्याचे डोळे उपटून काढीन. असे केले नाही तर मी आपल्या बापाच्या बीजाचा नाही. हिंदुस्थानात जवळ जवळ जवळ दीड लाख रोहिले असतील. त्यांना आपण आपले दास समजा. दुसरे कुणी आपल्याकडे आले असते आणि आपण नाही म्हणाला असता तर तक्रारीला जागा नसती. पण मी स्वतःच आपली कृपा होईल या आशेने आलो आहे. आता आपण दोन्हीपैकी एक काम करावे. एकतर माझ्याबरोबर अब्दालीला येऊन मिळावे. नसल्यास हा खंजीर आणि ही माझी मान हजर आहेत. माझी गर्दन छाटावी. आपण आज्ञा कराल तर मी लिहून द्यायला तयार आहे की माझ्या मृत्यूची जबाबदारी आपल्यावर नाही.'' शुजाउद्दौल्याने पाहिले की नजीबखान एकनिष्ठ आहे आणि कमालीचा आग्रह करीत आहे. मग त्यांनी अब्दालीला जाऊन मिळण्याचा बेत केला. आणि तीस हजार स्वार आणि दहा हजार पायदळ बरोबर घेऊन अब्दालीकडे प्रयाण केले.

शुजाउद्दौल्याने अब्दालीला एक लाख रुपये नजर दिली.

आता निजामअलीखान आणि बंगालचा सुभेदर जाफरअलीखान सोडले तर झाडून सारे अमीर उमराव अब्दालीभोवती गोळा झाले होते. सूरजमलने हे पाहून भाऊला म्हटले ''यावेळी प्रसंग कठीण दिसतो. सगळ्याच मुसलमानांनी या खेपेस कमरा कसल्या आहेत (हमा मुसलमानान बंद दर बंद कबाबाफ्ता अंद). मला आपण आपल्या देशी परत जाण्याची आज्ञा द्यावी. तेथून मी आपल्या सैन्याला रसदेचा पुरवठा करीन. भाऊला हा सल्ला पटला. त्याने सूरजमलला निरोप दिला. राधाकिशन हा सूरजमलचा विश्वासू मुत्सद्दी होता. तो म्हणाला की सूरजमलला भाऊची वागणूक पाहून हसू आले. सूरजमल म्हणाला की भाऊ आणि विश्वासराव यांचे मरण ओढवले आहे. त्यांचे सैन्य धुळीला मिळणार. अब्दाली आणि त्याचे अफगाण रोहिले हे सर्वांना आपल्या तलवारीचे भक्ष्य बनवतील. कारण हे लोक गर्विष्ठ आणि मूर्ख बनले आहेत आणि शत्रू अनुभवी आणि दूर दृष्टीचा आहे. मराठ्यांच्या मूर्खपणाचे उदाहरण माझ्याचबद्दलचे पहा. माझ्या सारख्या माणसाला त्यांनी निरोप दिला आहे. आता त्यांनी आकाश पाताळ एक केले तरी मी त्यांच्या तावडीत सापडणार नाही. मी आपल्या किल्ल्यात जाऊन बसेन. यावेळी त्यांनी माझ्याकडून दोन कोटी रुपये मागितले तरी ते मला देणे प्राप्त होईल कारण यावेळी मी त्यांच्या तावडीत आहे. एकदा येथून गेलो की त्यांनी एक दमडी मागितली तरी देणार नाही. माझ्याबरोबर चाळीस हजार माणसे आहेत. शिवाय माझ्या मुलुखातील किल्ले आणि सैन्य वेगळीच. माझ्या ताब्यात दीड कोटी उत्पन्नाचा मुलूख आहे आणि माझ्या खजिन्यात पाच सहा कोटी रुपये आहेत. माझ्यासारख्या माणसाला, प्रबळ शत्रू समोर ठेवून हे लोक सबळ कारणावाचून निरोप देत आहेत यापेक्षा त्यांचा मूर्खपणा आणखी काय असणार.

सारांश सूरजमल दीगच्या किल्ल्याच्या आश्रयाला गेला. मराठे आणि अब्दाली यांचे युद्ध सुरू झाले. नंतर परमेश्वरी इच्छेने जे काही घडून आले ते सर्वांनाच विदित आहे.

त्याची थोडक्यात हकिकत अशी की गोविंद पंत आणि गंगाधर हे अबदालीची रसद बंद करण्यासाठी तीस हजार सैन्य घेऊन अहमदशहाच्या छावणीपासून चाळीस कोसावर आले. अहमदशहाच्या हुकुमाने अठराशे स्वार त्यांच्यावर तुटून पडले. त्यांचा धुव्वा उडवून प्रत्येक शिपायाने पाच पाच मराठ्यांची डोकी छावणीत आणली. प्रत्येक डोक्याला पाच रुपये बक्षीस देण्यात येईल असे बादशहाच्या छावणीत जाहीर करण्यात आले. यानंतरच्या लढाईत विश्वासराव आणि भाऊ मारले गेले. मराठे पळून गेले. दुराणी आणि रोहिले यांनी त्यांचा पाठलाग केला. हजारो माणसे मारली गेली. जिकडे नजर फेकावी तिकडे प्रेतांचे ढीग दिसत होते. साठ कोसापर्यंत मराठ्यांच्या

रक्ताने जमीन भिजली होती. या युद्धात मल्हारराव आणि नजीबखान यांचे असे ठरले होते की अब्दालीचा जय झाला तर तुम्हाला कोणताच उपसर्ग लागू देणार नाही आणि तुम्हाला जय मिळाला तर तुम्ही आम्हाला त्रास देऊ नये. त्या दोघांत संगनमत होते यात काहीच शंका नाही.

सारांश मराठ्यांची वीस हजार माणसे जाटांच्या मुलुखात गेली. तेथे ती अक्षरश: भिकेला लागली होती. सूरजमलला त्यांची दया येऊन त्याने त्यापैकी प्रत्येकाला एक घोंगडी आणि दोन दोन रुपये वाटखर्चाला देऊन दक्षिणेकडे पाठविले. शुजाउद्दौल्याने दहा बारा हजार माणसांना प्रत्येक दोन रुपये देऊन काल्पीकडे पाठविले. इब्राहीमखान आणि त्याच्या इतर सोबत्यासाठी कफनाची व्यवस्था पण शुजाउद्दौल्याने केली.

### (२) निगार नामाये हिंद

(हे गुलामअली नकवी याचे दुसरे पुस्तक होय. यात पानीपतचे युद्ध त्याने तपशीलवार वर्णन केले आहे. गुलामअलीची आणि काशिराज यांची चांगलीच ओळख होती. त्याने लिहिलेल्या ग्रंथावरून गुलामअलीने आपली हकिकत उतरून घेतली आहे. ती देणे म्हणजे मजकुराची पुनरावृत्ती करणे आहे. पण काशिराजाच्या ग्रंथात न आलेली माहिती गुलामअलीने नमूद केली आहे तीच तेवढी खाली दिली आहे.)

सदाशिवरावभाऊचे सूरजमलला पत्र – ''अफगाणांनी सर्व एक चित्त होऊन अहमदशहाला अफगाणिस्तानाहून बोलाविले आहे. हिंदुस्थानात हिंदू म्हणून शिल्लक ठेवायचा नाही अशी त्यांची इच्छा आहे. आम्ही हिंदूंच्या रक्षणाकरिता हिंमत धरली आहे. हिंदूंचे कर्तव्य आहे की आमच्याशी मिळण्यात त्यांनी आपले हित आहे हे ओळखून आम्हाला येऊन मिळावे. सूरजमलचे नाव मर्द माणूस म्हणून हिंदुस्थानात प्रसिद्ध आहे. मुसलमान सरदारांच्या घोळक्यात सूरजमलच एक असा हिंदू आहे की ज्याने नजीबखानाशी यशस्वी शत्रुत्व केले आहे. त्याने पत्र मिळताच आपल्या सैन्यासहित येऊन मिळावे.''

(१७९) शुजाउद्दौल्याने याकूतखान खाजासराबरोबर भाऊला खालील निरोप धाडला –

''तुमच्या आणि आमच्या घराण्याचे प्रेम पूर्वीपासून आहे खरे आहे. पण प्रत्येक जातीला आपला धर्म अशा स्नेहापेक्षाही महत्त्वाचा वाटतो. सगळे मुसलमान इकडच्या पक्षात एकत्र झाले आहेत म्हणून त्यांना जाऊन न मिळणे मला धार्मिक दृष्टीने योग्य वाटले नाही. शिवाय मी या पक्षात असणे आणखी एका दृष्टीने योग्य आहे. तहाची बोलणी करणे आणि आपल्या स्नेह्याचे हित करणे सोयीचे पडेल. तुम्हाला तह आणि तडजोड हवी असली तर मी मन:पूर्वक प्रयत्न करीन. यावेळी तडजोडीची बोलणी चालू असली तरी तुम्ही लष्करी हालचाली थांबवू नयेत. या वेळी या युद्धाला धार्मिक स्वरूप प्राप्त झाले आहे. सगळे मुसलमान सरदार अहमदशहाला मिळाले आहेत. मला आपला स्नेही समजा. तहाकरिता माझ्याकडून शक्य ते करीन. तुम्ही जड सामान टाकून देऊन अहमदशहाशी गनिमी काव्याने लढावे. जड सामान आणि तोफखाना बाळगल्याने अडचणी निर्माण होतील.''

शुजाउद्दौल्याने सूरजमलला आपल्या देशी परतण्याचा सल्ला दिला आणि मल्हाररावाला लिहिले की तुम्ही भाऊचे मन तहाकडे वळवावे. विपरीत काही घडल्यास तुमच्या संबंधी जे काही करणे शक्य आहे ते स्नेहभावाने आम्ही करू.

जनकोजी शिंद्यांनी वजीर शहावलीखान याच्यावर हल्ला केला. त्याचा वृत्तांत (२२ नोव्हेंबर १७६०) ''दुपारी तिसऱ्या प्रहरी शहावलीखान हा थोडी माणसे घेऊन पानीपतजवळ एक विहिरीपाशी टेहेळणी करित गेला असता

दक्षिणी लोकांनी त्याला पाहिले. त्यांच्याबरोबर थोडी माणसे आहेत असे पाहून ते त्याच्यावर तुटून पडले. त्यांच्याबरोबर पंधरा हजार स्वार होते. त्यांनी दुराणींना कोंडले. शहावली खानाने मोठ्या मर्दुमकीने त्यांचा प्रतिकार केला. दक्षिणी त्वेषाने लढले आणि त्यांनी शौर्याची शर्थ केली. दुराणींनी चांगलेच शौर्य गाजविले. पण त्यांचे अनेक लोक मृत्युमुखी पडले. उभय दळे एकमेकांत अशी मिसळली की धुळीमुळे शत्रुमित्र ओळखू येईनात. युद्धाच्या गोंगाटाने प्रळयकाळाचा भास झाला. शहावलीखानाचे सैन्य अल्प असल्यामुळे मुसलमानांची मोठी कठीण अवस्था झाली. ही बातमी अबदालीच्या छावणीत समजताच इकडून शुजाउद्दौला आणि नजीबखान यांनी आपली सैन्य आणि अहमदशहाचे थोडे सैन्य घेऊन शहावलीखानाच्या मदतीला धाव घेतली. शहावलीखानाचे सैन्ये पूर्णपणे कोंडले जाऊन निकराने लढत होते. मदत आल्याबरोबर त्याला हिंमत आली. संध्याकाळपर्यंत तुंबळ युद्ध झाले. एक-दोन घटकांच्या आत उभयपक्षाची तीन-चार हजार माणसे ठार अगर जखमी झाली. दुराणीची आणि शुजाउद्दौला व नजीबखान यांची मदत मिळाल्यामुळे शत्रूच्या सैन्याचे पाय डळमळू लागले. हे पाहून मुसलमानांनी त्वेषाने त्यांच्यावर चाल करून त्यांना हटविले. शहावलीखान रक्ताच्या समुद्रात रक्तपिपासू नक्राच्या दाढेत सापडला होता तो बाहेर पडला. दक्षिण्यांचा मोड झाला. शहावलीखान, नजीबखान वगैरेंनी त्यांचा छावणीपर्यंत पाठलाग केला. आपला वजीर आणि अमीर सुखरूप आल्याबद्दल अहमद शहाने परमेश्वराचे आभार मानले.

**नजीबखान आणि मेहेंदळे यांच्या युद्धाचा तपशील –** (डिसेंबर १७६०) त्या दिवशी असे घडले की नजीबखानाच्या मोर्च्याच्या लोकांनी समोर काही अडथळे नाहीत असे पाहून पुढे चाल केली. शत्रू दबा धरून बसला होता. नजीब खानाचे सैन्य पुढे येत आहे असे पाहून बळवंतराव मेहेंदळ्याने आपल्या पथकासहित इतक्या शौर्याने हल्ला केला की रुस्तुम आणि इस्फिंदारच्या शौर्य कथांना विसरावयास लाविले. नजीबखानाची माणसे या हल्ल्यापुढे मागे हटली. नजीबखानापाशी फक्त पन्नास माणसे राहिली. तरी हिंमत करून तो निर्धाराने लढत होता. या सुमारास त्याला चहूकडून कुमक आली. त्यामुळे युद्धाला जोर आला. संध्याकाळपासून रात्रीची एक घटका होईपर्यंत तुंबळ युद्ध चालले होते. तोफांचे आणि बंदुकीचे आवाज कल्पांताची आठवण करून देत होते. घोड्याच्या हालचालींनी धुरळा उडून आकाशापर्यंत पोहोचला. त्या दिवशी नजीबखानाचा चुलता खलीलुर्रहमानखान हा निकराने लढत असता मृत्यूमुखी पडला. असे म्हणतात की त्यादिवशी नजीबखानाची दोन-तीन हजारपेक्षा जास्त माणसे मारली गेली. शत्रू मागे हटेना. कुमक आल्यामुळे नजीबखानाचे सैन्य निर्धाराने टिकून राहिले. त्याची पर्वा न करता बळवंतराव वाघासारखा हल्ल्यावर हल्ले करीत होता. मृतांचे ढीग चहूकडे पडत होते. बळवंतरावाच्या सहकाऱ्यांनीही शौर्यात कसूर केली नाही. पण ऐन धुमश्चक्रीत बळवंतराव गोळी लागून पडला. मग मराठ्याचे सैन्य आपल्या छावणीला परतले.

(गुलामअलीने पुढची सगळी हकीकत काशिराजावरून जशीच्या तशी घेतलेली दिसते. ब्राऊनच्या अनुवादात भाऊची एक बायको घोड्यावर बसून पळाली असे आहे. गुलामअलीने त्या प्रसंगाचा तपशील खालीलप्रमाणे दिला आहे.)

भाऊची दुसरी बायको (लग्नाची) वय सुमारे पंचवीस, रणांगणांतून सुखरूपपणे पळाली. तिच्या नोकराने तिला घोडीवर बसवून डीगला सूरजमलकडे पोहोचती केली. सूरजमलने तिचे आदरातिथ्य करून तिच्याबरोबर माणसे देऊन झाशीला रवाना केली.

(सारांश इमादुस्सादत या ग्रंथात आपल्याला एकदोन तपशील काशिराजाच्या माहितीपेक्षा वेगळे आढळत

असले तरी निगारनामाये हिंदमधे गुलामअलीने जवळ जवळ सगळी माहिती काशिराजाच्या ग्रंथावरून घेतली असे दिसते.)

## गुले रहमत

(हाफिज रहमत खशन आणि त्याचा मोठा मुलगा इनायतखान हे रोहिले सरदार पानीपतच्या युद्ध प्रसंगी हजर होते. हाफिजरहमतखानाचा एक मुलगा मिस्तजाबखान याने 'गुलिस्ताने रहमत' या नावाचे आपल्या बापाचे चरित्र लिहिले आहे. त्याचा इंग्रजी अनुवाद ईलियट याने इ. स. १८३१ मधे प्रसिद्ध केला. हाफिज रहमतखान याचा एक मुलगा हाफिज महंमद यारखान हा होता. त्याचा मुलगा सादतयारखान याने इ. स. १८३४ मध्ये गुले रहमत या नावाचे आपला आजा हाफिज रहमतखान याचे चरित्र लिहिले आहे. हा ग्रंथ फारसी भाषेत असून अद्याप अप्रकाशित आहे. त्याची एक हस्तलिखित प्रत पंजाबचे राज्यपाल श्री. न. वि. गाडगीळ यांच्या प्रयत्नाने उपलब्ध होऊन अवलोकनात आली. सदर ग्रंथातील (पान ६४-७२) पानीपतप्रकरणाचा मराठी अनुवाद खाली दिला आहे.)

दुराणी शहाची बातमी दक्षिणेत आली. सर्व मराठे सरदार एक झाले. बाळाजीचा भाऊ भाऊसाहेब व मुलगा विश्वासराव हे शमशेर बहादुर आणि इतर मराठे सरदार यांना घेऊन दत्ताजी पाटील यांचा सूड घेण्याच्या उद्देशाने ऐन पावसाळ्यात दक्षिणेतून रवाना झाले. जनकोजी आणि मल्हारराव हे त्यांना येऊन मिळाले. मराठ्यांनी पावसाळा शहाजहानाबाद आणि शहागंज येथे काढला. पावसाळा संपल्यानंतर ते कुंजपुऱ्याकडे चाल करून गेले. त्याठिकाणी अहमदशहातर्फे अब्दुस्समदखान व मोमिनखान हे ठाणेदार होते. कुंजपुऱ्याचा जमीनदार नजाबतखान हा मराठ्यांना आतून मिळाला होता. त्याने अब्दुस्समदखशन वगैरेना मराठ्यांशी लढण्यास चिथावले आणि स्वत: मात्र कुंजपुऱ्याच्या किल्ल्यात बंदोबस्ताने राहिला. अब्दुस्समदखान आणि इतर सरदारांपाशी फार थोडे सैन्य होते. पण जमीनदाराच्या चिथावणीवरून ते किल्ल्याबाहेर येऊन मराठा फौजेवर तुटून पडले. शत्रूचे सैन्य मोठे असल्यामुळे त्यांचा पराजय झाला. माघार घेत ते किल्ल्याच्या तटाखाली आले. त्या विश्वासघातकी नजाबतखानाने किल्ल्याचे दरवाजे बंद केले. आणि तटावरून तो त्यांच्यावरच शस्त्रांचा मारा करू लागला. त्यामुळे अब्दुस्समदखान आणि इतर सरदार तेथून हटून पुन्हा मराठ्यांवर तुटून पडले. त्यांनी मर्दुमकी गाजविली पण सारे जण मारले गेले.

ही बातमी शहादुराणीला कळली. ही ऐकून त्याला अतिशय त्वेष आला. त्याने हाफिजरहमतखशन आणि इतर हिंदुस्थानी सरदारांना आपापली सैन्ये बोलावून घेण्याचा हुकूम केला. आज्ञेप्रमाणे थोड्याच काळात हिंदुस्थानातील सर्व सरदारांची सैन्ये अहमदशहाच्या छावणीत दाखल झाली. अहमदखान बंगश गालिबजंग हाही अहमदशहाला येऊन मिळाला. सगळे सैन्य गोळा झाले आहे आणि युद्ध सामग्री जमली आहे हे पाहून मराठ्यांच्या दिशेने कूच करण्याचा अहमदशहाने हुकूम केला. अफगाण आणि हिंदुस्थानातील रोहिले आणि इतर सैन्य मिळून एक लाख स्वार आणि पायदळ असा जमाव झाला. अहमदशहाच्या बरोबर अफगाणिस्तानातून आलेले सैन्य तीस हजार होते. हाफिज रहमत खानाने रोहिलखंडातून जवळ जवळ तीस हजार स्वार आणि पायदळ बोलाविले होते. नजीबखानाबरोबर पंधरा हजार स्वार आणि पायदळ होते. शुजाउद्दौल्याबरोबर वीस हजार सैन्य होते. अहमदखान बंगश गालिबजंग याच्याबरोबर सुमारे सहा हजार स्वार आणि पायदळ होते.

हे सगळे सैन्य घेऊन अहमदशहा कूच करीत यमुनेच्या काठावर आला. त्याने नदीवर तीन पूल बांधण्याचा हुकूम दिला. एक स्वत:च्या सैन्याकरिता, दुसरा हाफिज रहमतखान आणि अहमदखान बंगशच्या सैन्याकरिता

आणि तिसरा शुजाउद्दौल्याच्या सैन्याकरिता. थोड्याच अवधीत पूल तयार झाले आणि बागपतपाशी सगळे सैन्य नदीपार झाले.

ही बातमी कळताच भाऊ आणि इतर सरदार आपले सैन्य घेऊन कुंजपुऱ्याहून निघाले ते पानीपतपाशी आले. ते गाव आपल्या पाठीशी घेऊन त्यांनी लढण्याची तयारी केली. स्वार आणि पायदळ मिळून मराठ्यांचे सैन्य तीन लाख असावे. अहमदशहाने बागपतहून कूच करून मराठ्यांच्या समोर काही कोसावर मुक्काम केला. त्याच दिवसापासून दोन्ही सैन्याच्या आघाडीच्या दळात चकमकी होऊ लागल्या. प्रत्येक वेळेस अहमदशहाच्या सैन्याची सरशी होई. अफगाण स्वारांची आक्रमकवृत्ती पाहून भाऊ आणि इतर मराठे सरदार यांनी ठरविले की मोठी लढाई करण्याचे काही दिवस लांबणीवर टाकावे आणि अहमदशहाच्या सैन्यात येणारी रसद बंद करण्याचा प्रयत्न करावा. म्हणजे अहमदशहाच्या सैन्यात रसदेची टंचाई भासेल.

ती संधी साधून आपण मोठी लढाई करावी आणि जय मिळवावा. या हेतूने मराठ्यांनी एक मोठा खंदक खणला. त्या भोवती तोफा चढविल्या आणि इब्राहीमखान गार्दीपाशी बारा हजार बर्कंदार पायदळ होते त्यांना तोफखान्याच्या बंदोबस्ताचे काम दिले आणि ते निश्चिंतपणे आपल्या छावणीत राहिले. चार पाच सरदारांना निवडक सैन्य बरोबर देऊन त्यांनी रसद तोडण्याच्या कामावर नेमिले. हे पाहून केवळ रसदेचा बंदोबस्त करण्याकरिता अहमदशहाने अफगाण स्वारांचे एक पथक नेमले. अहमदशहाने हिंदुस्थानी सरदारांना हुकूम केला की त्यांनी मराठ्यांशी सतत चकमकी चालू ठेवाव्या. अहमदशहाच्या आज्ञेप्रमाणे अफगाण स्वार मराठ्यांकडे येणारी रसद अडवून अफगाण छावणीत आणू लागले आणि हिंदुस्थानी सरदार मराठ्यांशी चकमकी करू लागले.

वरील संघर्षाची बातमी रोहिलखंडात येऊन पोहोचली. हाफिज रहमतखानाच मुलगा इनायतखान हा आपल्या बापाची परवानगी न घेता, निवडक माणसे बरोबर घेऊन अफगाण छावणीत पोहोचला. हाफिज रहमतच्या मार्फतीने तो अहमदशहापाशी रुजू झाला. त्याने इनायतखानावर विशेष कृपा दाखविली.

या सुमारास भाऊने इटावा आणि बुंदेलखंडाचा अधिकारी गोविंद यास लिहिले की तुम्ही दुआब्यांत पोहोचावे, अफगाणांकडे येणारी रसद थांबवावी आणि रोहिलखंड उध्वस्त करावे. त्याप्रमाणे गोविंदने पंचवीस हजार सैन्यानिशी दुआब्यांत घुसून तेथून आणि रोहिलखंडातून येणारी रसद अडविली. त्याचा परिणाम असा झाला की अहमदशहाच्या छावणीत महागाई वाढू लागली. गोष्टी या भराला गेल्या की छावणीत धान्याची धारण रुपायाला एक शेर याप्रमाणे झाली. गोविंदपंताने रसद बंद केली असून रोहिलखंड उध्वस्त करण्याचा त्याचा इरादा आहे अशी बातमी अहमदशहाच्या छावणीत पसरली. त्यावेळी हाफिज रहमतखानाने ही खबर अहमदशहाच्या कानावर घातली. त्यावेळी हाजी अताईखान आणि करीमदादखान हे अफगाणिस्तानातून सहा हजाराचे सैन्य घेऊन नुकतेच आले होते. अहमदशहाने त्यांना त्वरेने गोविंद मराठ्याचे शीर कापून हजर करण्याचा हुकूम केला.

त्या दोघा सरदारांनी अद्याप आपल्या घोड्याच्या खोगिरी काढल्या नव्हत्या. त्यांच्या अंगावरील प्रवासाची धूळही अजून निघाली नव्हती. अजून दिवस ढळण्यास दीडप्रहराचा अवकाश होता. त्यांनी आपले सहा हजाराचे सैन्य बरोबर घेतले आणि छावणीपासून चाळीस कोसावर गाजिउद्दीन नगर होते त्या दिशेने चाल केली. रातोरात त्यांनी यमुना ओलांडली आणि ऐन पहाटे ते गोविंदाच्या लष्करावर तुटून पडले. त्यांनी शत्रूच्या फौजेचा नाश केला. अनेकांची डोकी कापली. गोविंदाचे डोके कापून, ती सर्व घेऊन आणि शत्रूची विपुल सामग्री हस्तगत करून ते मोठ्या उत्साहाने परतले. नदीवर पूल काय नावा काय काहीच नव्हते. ती पार करून दुसऱ्या दिवशी दिवस

मावळण्यास दीड प्रहर राहिला असता ते छावणीत परत आले. नंतर त्यांनी गोविंद आणि इतर मराठ्यांची डोकी अहमदशहाच्या समोर ठेविली. धन्य त्या परमेश्वराची, सुभानल्ला, काय ते चपळ गतीचे स्वार आणि काय ती वाऱ्याचे पाय असलेली त्यांची घोडी. केवळ एका दिवसांत त्यांनी ऐंशीकोस प्रवास केला. यमुना ओलांडली, शत्रूचा फन्ना पाडला आणि सुरक्षितपणे छावणीत परत आले.

सारांश, गोविंदाच्या मृत्यूनंतर अहमदशहाच्या छावणीत फिरून रसद येऊ लागली आणि धान्य स्वस्त झाले. यानंतर मराठ्यांची रसद तोडण्याकरिता अहमदशहाने जहान खानाबरोबर सहा हजार स्वार दिले. शहापसंदखानाबरोबर सहा हजार स्वार देण्यात येऊन त्याने मराठ्यांच्या छावणीभोवती पंधरा कोसापर्यंतचा मुलुख बेचिराख करावा असे ठरविण्यात आले. मराठ्यांच्या छावणीभोवती सतत टेहेळणी करण्याच्या कामावर बहादुरखान याची नेमणूक करण्यात येऊन त्याच्याबरोबर सहा हजार स्वार देण्यात आले. मराठ्यांच्या छावणीतून एकाही माणसाला बाहेर पडू देऊ नये अशी त्याला ताकीद देण्यात आली.

आज्ञेप्रमाणे वरील तिन्ही सरदारांनी आपल्या कामगिऱ्या बजावल्या. रसदेकरिताबाहेर पडणाऱ्या मराठ्यांच्या दळात आणि अफगाण सरदारात प्रखर संघर्ष झाले. प्रत्येक वेळेस मराठे मार खाऊन खंदकाच्या आत पळून जात. अफगाणांच्या धास्तीने ते छावणीबाहेर पडेनासे झाले.

अहमदशहाने हुकूम केला होता की जो कोणी मराठ्यांची डोकी कापून आणील त्याला प्रत्येक डोक्यामागे पाच रुपये बक्षीस देण्यात येईल. यामुळे रोज चारपाचशे डोकी अहमदशहापुढे हजर करण्यात येत.

पण मराठे फार बंदोबस्ताने राहात त्यामुळे कापून आणलेल्या डोक्यांची संख्या कमी होऊ लागली. मग बक्षिसाची रक्कम पाचावरून दहावर नेण्यात आली. शेवटी डोक्यामागे एक अश्रफी देण्यात यावी असेही जाहीर करण्यात आले. असा प्रकार काही दिवस चालला.

यानंतर हाफिज रहमतखानाची आई वारल्याची बातमी आली. त्यामुळे त्याला अतिशय दु:ख होऊन तो आजारी पडला. आजार बराच वाढल्याने त्याने आपल्या मोर्च्याच्या देखरेखीची कामगिरी दूंदेखान आणि इनायतखात यांच्याकडे सोपविली. मधून मधून त्याला बरे वाटले की तो स्वत: मोरच्यांची तपासणी करीत असे. रसदेच्या टंचाईमुळे मराठ्यांची अवस्था कठीण होऊ लागली. एके दिवशी मराठ्यांचे एक मोठे पथक खंदकाच्या बाहेर पडले. रसद, धान्य आणि गवत वगैरे आणण्यासाठी ते धूळकोटकडे रवाना झाले. तेथे त्यांनी रसद मिळवून उंट आणि बैल यावर लादली. ती घेऊन ते आपल्या छावणीकडे परतले. वाटेत जहानखान याने दहा हजार स्वारांनिशी त्यांच्यावर हल्ला केला. जवळ जवळ पाच सहा हजार मराठे मारले गेले. बाकीचे पळून खंदकाच्या आश्रयाला गेले. अफगाणांनी विपुल रसद आणि घोडी जनावरे हस्तगत करून आपल्या छावणीत आणली.

युद्धाच्या आदल्या रात्री मराठ्यांनी आपसात सल्ला मसलत केली. आता युद्ध लांबणीवर टाकले तर नाशाशिवाय दुसरा परिणाम होणार नाही हे त्यांना दिसून आले. निरुपाय होऊन त्यांनी युद्ध करण्याचे ठरविले आणि त्याप्रमाणे तयारी केली. ११७४ हिज्री जमादिलावलच्या सहा तारखेस सदाशिवराव भाऊ सैन्यासहित बाहेर पडला. इब्राहीमखान गाडदीचा प्रचंड तोफखाना आणि पायदळ हे त्याने आपल्या आघाडीवर ठेविले. पायदळाच्या मागे त्याने घोडदळ ठेविले. तो स्वत: आणि इतर मराठे सरदार हत्तीवर स्वार झाले. अशा प्रकारे मराठ्यांचे सैन्य छावणी बाहेर पडले आणि तोफा आणि बंदुकींच्या भडिमाराने युद्धास सुरुवात केली. मराठ्यांचे सैन्य हळूहळू सरकत हाफिजरहमतखानाच्या मोर्च्यापाशी आले. अहमदशहाने हिंदुस्थानी सरदारांना आपले मोर्चे कायम करण्याचा हुकूम केला. त्यावेळी

सरदारांनी आपापसात सल्ला मसलत करून कोणी कोठे मोर्चे कायम करावे हे ठरविले होते. शुजाउद्दौला आणि नजीबखान यांचे मोर्चे मल्हारराव आणि जनकोजीच्यासमोर होते. हाफिज रहमतखान आणि अहमदखान बंगश यांचे मोर्चे इब्राहीमखान गार्दी आणि इतर मराठे सरदारांच्या समोर होते. या सर्वांच्या आघाडीच्या दळांच्या नेहमी चकमकी होत. या खेपेस इब्राहीमखानाने तोफांचा भडिमार चालू केला. आणि हाफिज रहमतखानाच्या सैन्यावर त्याने चाल केली.

मराठे युद्धाच्या तयारीने येत आहेत हे पाहून अहमदशहाने आपल्या सैन्याला तयार होण्याचा हुकूम दिला. मराठे जवळ येईपर्यंत अफगाण सैन्य आपल्या ठरलेल्या जागेवर उभे होते. इतक्यात इब्राहीमखानाने तोफा आणि बंदुका यांच्या गोळ्यांचा पाऊस पाडण्यास सुरुवात केली. हाफिज रहमतखान आजारी होता. चालण्या फिरण्याची त्याला अद्याप शक्ती आली नव्हती. म्हणून इतर रोहिले सरदार म्हणजे फैजुल्ला खान, इनायतखान, दूंदेखान वगैरे आपल्या मोर्च्यांतून बाहेर पडून तोफा आणि बंदुकांनी शत्रूशी लढू लागले.

इब्राहीमखानाचे सैन्य जवळ येईपर्यंत ते आपल्या जागी ठाण मांडून राहिले. आपल्यापैकी किती मेले आणि किती जखमी झाले याची त्यांनी पर्वा केली नाही. तोफा आणि बंदुकीच्या युद्धात इब्राहीमखान म्हणजे केवळ जादुगार होता. त्याने तोफांचा आणि बंदुकीचा प्रखर मारा केला आणि एकाही अफगाणाला त्याने पापण्यांची उघडझाप करण्यास किंवा एक पाऊल पुढे टाकण्यास अवसर दिला नाही. त्याने असंख्य लोकांचे प्राण घेतले. या युद्धात रोहिलखंडाचे बरेच रोहिले जखमी होऊन मागे हटले. अहमदखान बंगश हा चंडोलला मागे उभा होता. तो म्हणतो की ते रोहिले मागे हटून त्याच्या सैन्यात मिसळले. अहमदखान बंगश याने त्यांची छी, थू केली. त्यांना आपल्याबरोबर घेऊन, तो इनायतखान अघाडीवर लढत होता त्याच्या मदतीसाठी धावला. तो अजून त्याला जाऊन मिळाला नव्हता इतक्यात इनायतखानाने आपल्या सैन्याची दुस्थिती पाहून, स्वत: शौर्याने शत्रूच्या फळीवर हल्ला चढविला. तोफांच्या भडिमारांतून जे वाचले ते पुढे होऊन तल्वार आणि कटारींनी लढू लागले. त्यांनी इतक्या निकराने लढाई केली की इब्राहीमखानाच्या दळाची पांगापांग झाली. त्यांनी तोफा टाकून देऊन माघार घेतली. अफगाणांनी तोफा ताब्यात घेतल्या आणि शत्रूची कत्तल करू लागले. भाऊ आणि इतर मराठे सरदार इब्राहीमखानाच्या पाठीशी उभे होते. त्यांनी लढाईचा रंग पाहिला आणि ते इब्राहीमखानाच्या मदतीला धावले. ऐंशी हजार स्वारानिशी ते अफगाणांवर तुटून पडले. अफगाणांनी आपल्या परीने प्रतिकाराचा प्रयत्न केला. त्यांनी अनेक मराठे स्वारांना घोड्यावरून खाली ओढून धुळीस मिळविले. पण मराठ्यांचे सैन्य प्रचंड होते. त्यांच्या घोडदळाच्या माऱ्यापुढे त्यांची पायमल्ली होऊन त्यांची पांगापांग झाली. आणि त्यांनी युद्धातून तोंड फिरविले. तरीपण इनायतखान, दूंदेखान, फैजुल्लाखान, हे सरदार आणि शेख कबीर, सय्यद मासूम इत्यादी रिसालदार हे आपल्या जागेवर ठाण मांडून निर्धाराने लढत होते. मराठ्यांचा सतत मारा होत असतानाही ते आपल्या जागेवरून हलले नाहीत.

अशा संकटाच्या प्रसंगी अहमदखान बंगश हा माघारी फिरलेल्या अफगाणांना धीर देऊन त्यांना बरोबर घेऊन इनायतखानाला येऊन मिळाला. इतके असूनही मराठ्यांचे सारखे हल्ले होत होते. आणि त्यांना वरचेवर कुमक मिळत होती. त्यामुळे अफगाणांच्या वाट्याला मरणे अगर जखमी होणे याशिवाय दुसरे काही आले नाही. अफगाणांवर परमसंकट ओढवले. सैन्यातून पळून गेलेल्यांनी खबर उडविली की इनायतखान आणि इतर रोहिले सरदार मारले गेले आहेत. हाफिज रहमतखान दोन कोस मागे होता. त्याला ही बातमी कळताच तो पालखीत स्वार झाला आणि चार हजार स्वार आणि पायदळ बरोबर घेऊन तो युद्धभूमीकडे निघाला.

या वेळी अहमदशहा एका उंच टेकडीवर उभा राहून युद्धाचा रंग पाहात होता. अफगाणांची दुर्दशा होत असलेली त्याने पाहिली. त्याने हाजी अताईखान आणि करीमदादखान यांची सहा हजार स्वार बरोबर देऊन रवानगी केली. रोहिल्यांच्या आणि मराठ्यांच्या मधे पडून त्यांनी शत्रूवर बंदुकींचा मारा करावा आणि शत्रूत धुमश्चक्री करावी अशी त्यांना आज्ञा देण्यात आली. त्याप्रमाणे ते शत्रूवर तुटून पडले. या हणामारीत हाजी अताईखान हा मारला गेला. याच वेळी शहा पसंदखानाने चाल करून मराठ्यांच्या गोटाला आग लाविली. आणि त्यांची छावणी, डेरे इत्यादी नष्ट केले. अफगाण्यांची नवीन फौज चालून आली आणि आपली छावणी उध्वस्त झाली हे पाहून भाऊ आणि इतर सरदार काळजीत पडले.

याच वेळेस अहमदशहाने आपल्या गुलामांच्या पलटणींना हुकूम दिला की मराठे सरदार ज्या ठिकाणी जमून कुमक पाठविण्याचा विचार करीत आहेत तेथे पोहोचून गोळ्यांचा त्यांच्यावर वर्षाव करावा. आणि नंतर तलवारी चालवून त्यांचा निकाल लावावा. आज्ञेप्रमाणे गुलामांच्या पलटणी रवाना झाल्या. भाऊ, विश्वासराव, रघुनाथराव, शमशेरबहादुर, जनकोजी, मल्हारराव वगैरे सरदार उभे होते त्या ठिकाणी जाऊन त्यांनी बंदुकीचा मारा केला. परमेश्वराची कृपा आणि अहमदशहाचे भाग्य यामुळे एक मल्हारराव सोडून सगळे मराठे सरदार गोळ्यांना बळी पडून आपापल्या हौद्यात मरण पावले. याच सुमारास अब्दालीच्या फौजेने मराठ्यांची कत्तल करण्यास सुरुवात केली.

मराठ्यांच्या प्रेतांच्या राशी पडू लागल्या. आपले सरदार मारले गेले आहेत हे पाहून मराठे घाबरून रणांगणातून पळू लागले. अहमदशहाने पळणाऱ्या मराठ्यांचा पाठलाग करण्याकरिता सैन्याच्या तुकड्या नेमिल्या आणि त्यांना आज्ञा केली की दिल्लीपर्यंत पाठलाग करावा आणि जे जे मराठे हाती लागतील त्यांची कत्तल करावी. हाफिज रहमतखानाला वाटेतच अफगाणांच्या विजयाची बातमी कळली. इनायतखान वगैरे सरदार सुरक्षित असलेले पाहून त्याने परमेश्वराचे आभार मानले.

अफगाण फौजेने दिल्लीपर्यंत मराठ्यांचा पाठलाग केला. इतके मराठे मारले गेले की त्याची मोजदाद करणे कठीण आहे. एक मल्हारराव होळकर आणि महादजी शिंदे सोडून या युद्धात सगळे नामांकित मराठे सरदार मरण पावले. नजीबखान आणि मल्हारराव यांचे आपसात सूत होते. नजीबखानाच्या इशाऱ्याने मल्हारराव त्याच्या छावणीच्या बाजूने निघून सुरक्षितपणे कर्नालकडे पळून गेला. इब्राहीमखान गार्दी हा आपल्या मुलासहित हाफिज रहमतखानाच्या सैन्याकडून कैद होऊन आला. उभय पक्षाचे मिळून जवळ जवळ पंचवीस हजार प्रेते मोजण्यात आली. मुख्य युद्धापूर्वीच्या चकमकीत आणि नंतरच्या पळात जी मारली गेली त्यांची गणती नाही. अफगाणांच्या हाती जडजवाहीर, डेरे, तंबू, युद्ध सामग्री इतकी पडली की त्याचे मोजमाप करणे शक्य नाही. सारांश परमेश्वरी कृपेने साध्य झालेला हा विजय अहमदशहाला मिळाला.

## तारीखे अहमद

(अब्दुलकरीम अल्वी याने इ. स. १८४५ च्या सुमारास अब्दाली घराण्याचा इतिहास लिहिला आहे. या ग्रंथाची हस्तलिखित प्रत मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयात आहे. आपल्या प्रस्तावनेत अब्दुल्करीम म्हणतो

मी शुजाउल्मुल्क दुरानी (शाहशुजा) ची हकीकत लिहून काढली. इंग्रजांच्या मदतीने त्याने लुधियानाहून निघून सुरासान गाठले. (१२५५ हिज्री १८३९-४० इ. स.) आणि तेथे बंडखोरांचा बीमोड करून तो आपल्या वडिलार्जित गादीवर बसला. त्याचे चरित्र लिहून काढल्यानंतर मला वाटले की अहमदशहाच्या कारकिर्दीच्या

प्रारंभापासून दुराणी घराण्याचा इतिहास लिहून काढावा. त्या दृष्टीने मी साधने तपासून हकीकत लिहिली आहे. इतिहासकारांनी दुराणी बादशहाविषयी थोडे लिहिले आहे. इमामुद्दीन हुसेनीने एक इतिहास लिहिला आहे. तो अफगाणिस्तानात अनेक वर्षे होता आणि त्याने संशोधन करून दुराणी बादशहांची हकिकत लिहून काढली आहे. ग्रंथांतील मजकूर त्याने १२१२ हिज्रीपर्यंत (इ. स. १७९८) आणला आहे. जमानशहा बादशहा (अहमद शहाचा नातू) ची कारकिर्दही त्याने वर्णिली आहे. माझ्या ग्रंथात मी हुसेनीच्या इतिहास ग्रंथातील बराच मजकूर घेतला आहे.

अब्दुलकरीमच्या या ग्रंथात दोनशे पाने आहेत. त्यात पानीपतसंबंधी मजकूर खालीलप्रमाणे आहे.)

(१९) पावसाळा संपला. इस्लामधर्मीयांचा काटा काढणे आणि अहमदशहाशी लढणे या उद्देशाने दक्षिणेतून प्रचंड आणि सुसज्ज फौजा उत्तरेच्या रोखाने निघून दिल्लीपाशी पोहोचल्या. या सैन्यात मातबर सरदार होते. त्यांचा सेनापती भाऊ होता. विश्वासराव, जनकोजी, मल्हारराव, शमशेर बहादुर हे इतर सरदार होते. इब्राहीमखान गार्दीबरोबर बारा पल्टणी होत्या. प्रत्येक पल्टणीत एक हजार शिपाई होते. त्यांची लष्करी शिस्त ही फिरंग्यांच्या पद्धतीवर होती. इब्राहीमखान हा अतिशय शूर आणि पराक्रमी होता. त्याचे शौर्य सगळे मराठे मानीत. याशिवाय आणखी एक सरदार शिंदे होते. पण त्यावेळी त्याला विशेष अधिकार नव्हता. सैन्याबरोबर पंधराशे तोफा होत्या. त्यांचे गोलंदाज हे फिरंगी पद्धतीचे होते. सैन्यात बारा हजार घोडेस्वार होते. याशिवाय काही हजार पट्टाबाज होते. ते तल्वार बहाद्दरीत निष्णात होते. याशिवाय लष्कराबरोबर बाजारबुणगे होते. सारांश सैन्यात असंख्य स्वार शिपाई होते. इतके प्रचंड सैन्य कोणी अद्यापपर्यंत पाहिले नव्हते. वृद्धांच्या सांगण्यावरून, महाभारत काळांत इतके सैन्य एकत्र झाले असावे असे वाटते.

(२०) हे सैन्य दिल्लीजवळ आले. सर्व कलहाचे मूळ असलेला इमादुल्मुल्क आणि सूरजमल जाट हे मराठ्यांना मिळाले. आणि सर्वांनी मिळून दिल्लीला वेढा घातला. त्यावेळी मुहंसिनुल्मुल्क याकूब अलीखान हा किल्लेदार होता. त्याने किल्ला लढविला. मराठ्यांनी किल्ल्यावर सारखे हल्ले करून याकूब अलीखानाला मोठ्या पेचात आणले. त्याने सगळी परिस्थिती अहमदशहा आणि वजीर शहावलीखान यास कळविली. अहमदशहाच्या सल्ल्याने त्याने किल्ला दक्षिण्यांच्या हवाली केला.

(२१) याच सुमारास इमादुल्मुल्क आणि सूरजमल जाट हे मराठ्यांना सोडून भरतपूर कुंभेरीकडे गेले. कारण काय झाले समजत नाही. मराठ्यांनी शहराचा बंदोबस्त केला. एकाला त्यांनी किल्लेदार म्हणून नेमले. कमालीचा गर्व झाल्यामुळे भाऊ आणि इतर मराठे सरदारांच्या तोंडून निघाले की अहमदशहावर विजय मिळवून, अफगाणांची कत्तल करून मुसलमानांचा बीमोड केल्यावर आम्ही विश्वासरावाला हिंदुस्थानाचा बादशहा बनवू. आमच्या बरोबर शिळेची एक मोठी मूर्ती आहे तिची स्थापना जुम्मामशिदींत करून तुम्ही मशिदीचे मंदिर बनवू. तेथे अजान (प्रार्थनेची हाक) ऐवजी शंखाचा ध्वनि ऐकू येईल.

कोणत्याही मार्गाने का होईना परमेश्वराने त्या सर्वांचा नायनाट केला. यानंतर दक्षिण्यांची सर्व फौज कुंजपुऱ्यावर चालून गेली. तेथील किल्ला घेऊन आणि कत्तल करून त्यांनी विपुल संपत्ती हस्तगत केली. नजाबतखान हा तेथे किल्लेदार होता. त्याने दगाबाजी केली. मराठ्यांची फौज आली तेव्हा त्याने किल्ल्याचे दरवाजे बंद केले आणि अब्दुस्समदखान आणि मिया कुतुबखान इत्यादी अफगाण सरदारांनाही त्याने येऊ दिले नाही. ते मराठ्यांच्या हाती सापडून मारले गेले. नजाबतखानालाही मराठ्यांनी ठार मारले.

मराठ्यांनी कुंजपुऱ्यावर चढाई केली ही हकीकत अहमदशहाच्या कानी पडली. मराठ्यांना शिक्षा करण्याच्या उद्देशाने तो अनूपशहराहून निघाला.

(२२) त्याच्या बरोबर नजीबुद्दौला, हाफिज रहमतखान, अली महंमद रोहिल्याचा मुलगा फैजुल्ला, वगैरे सरदार होते. कूच करीत ते बागपत पाशी पोहोचले. तेथे त्यांना कळले की मराठ्यांनी कुंजपुऱ्याच्या अफगाण सरदारांचा वध केला आहे. अहमदशहाला हे ऐकून अतिशय त्वेष आला. आपण नदीपार करून विजेप्रमाणे मराठ्यांवर तुटून पडावे असे त्याला वाटले. पण नदीला पूर आला होता. आणि फौज पार करण्यास नावा मिळणे मुष्किल होते. असे म्हणतात की अहमदशहा नदीच्या काठावर उभा राहिला. त्याने आपल्या भात्यातून बाण काढला. आणि त्याच्यावर कुराणातील मंत्रांची फुंकर घालून तो त्याने नदीत उडविला. त्यावेळी त्याची चार हजार गुलामांची पल्टण जवळ उभी होती. त्यांना त्याने हुकूम सोडला की परमेश्वराचे नाव घेऊन त्यांनी आपले घोडे नदीत घालून नदी पार करावी. परतीर गाठल्यावर त्यांनी तेथे शिस्तीने तयार राहावे. कारण नदीकाठापासून पंचवीस कोसांवर शत्रूचे असंख्य सैन्य तळ ठोकून आहे. अहमदशहाची आज्ञा ऐकून त्याच्या पल्टणीने नदीत घोडे घातले. असे म्हणतात की नदीचे पाणी घोड्याच्या खोगिरीपर्यंत लागले. घोड्यावर स्वाराच्याबरोबर एक पायदळ शिपायाला जुजबी सामानासहित बसण्याचा हुकूम देण्यात आला. जडसामान हत्तीच्या पाठीवरून वाहून नेण्यात आले. अशा रीतीने परमेश्वर कृपेने आणि अहमदशहाच्या भाग्याने सगळी फौज लवाजम्यासहित नदीपार झाली.

(२३) सारे सैन्य पार झाल्यानंतर त्यांना विश्रांती देण्यासाठी अहमदशहा एकदोन दिवस तेथे थांबला. नंतर तेथून कूच करून तो संभलक्याजवळ आला. तेथे त्याला कळले की संभलक्याच्या सराईजवळ मराठ्यांची पंचवीस हजार फौज तळ देऊन बसली आहे. अहमदशहा घोड्यावर स्वार झाला. आणि त्याने सैन्याच्या तयारीचा हुकूम दिला. शहापसंदखान सरदार हा त्याच्याजवळ उभा होता. त्याला अहमदशहाने म्हटले की शहापसंदखान, आज शत्रूचा मोड करण्याची कामगिरी तुझ्याकडे सोपविली आहे. शहापसंदखानापाशी तीन हजार फौज होती, ती घेऊन त्याने मराठ्यांवर चाल केली. उभय दळे एकमेकांला भिडली. लढाई मोठ्या निकराची झाली. मराठ्यांचा धीर सुटून ते पळू लागले. शहापसंदखानाच्या सैन्याने अनेकांची डोकी कापली. प्रत्येक स्वार परतताना आपल्याबरोबर दोन तीन डोकी घेऊन आला. ती सर्व अहमदशहाला दाखविण्यात आली.

(२४) आपल्या कार्याला हा शुभशकुनच झाला असे समजून अहमदशहाने शहापसंदखानाला धन्यवाद दिले. शहापसंदखानाने विनंती केली की किबलाये आलम तुमच्या कारणी माझा देह पडो. आज मला मराठ्यांच्या लढण्याच्या पद्धतीची पूर्ण माहिती मिळाली. इन्शाल्लाह (परमेश्वर इच्छील तर) परमेश्वराच्या कृपेने आणि आपल्या भयाने त्या सर्वांचा नाश होईल. आपल्या फौजेच्या दुर्दशेची बातमी भाऊ आणि इतर सरदार यांना समजताच ते कुंजपुऱ्याहून कूच करून करनाल आणि पानीपतच्या मधे पोहोचले. हे स्थळ दिल्लीपासून पश्चिमेच्या दिशेने चाळीस कोसावर आहे. अहमदशहाच्या आज्ञेने दुराणी फौजेने मराठ्यांच्या लष्कराभोवती लूटमार सुरू केली. मराठ्यांचे सैन्य प्रचंड आणि प्रबळ होते. असे असूनही त्यांनी आपल्या लष्कराभोवती रुंद आणि खोल खंदक खणला आणि भक्कम छावणी उभी केली. आणि दमदमे बांधून त्यावर तोफा उभ्या केल्या. अहमदशहाने पश्चिमदिशेने काही मजला केल्या. आणि मुक्कामावर पोहोचून जड आणि अनावश्यक सामान, घोडी आणि इतर जनावरे तेथे ठेवून दिली. हिंदुस्थानी आणि दक्षिणी म्हणू लागले की आपल्या देशाकडे हळूहळू निसटून जाण्याचा अहमदशहाचा बेत दिसतो. मराठ्यांना ही बातमी लागताच त्यांनी अहमदशहाच्या गोटावर छापा घालून घोडी, गुरेढोरे जी काही हाती लागली

ती हस्तगत केली.

(२५) पण जवळच जहानखान सरदार हा आपल्या सैन्यासहित लपून बसला होता. त्याने तेथे आलेल्या मराठ्यांच्या दळावर एकाएकी हल्ला करून सर्वांची कत्तल केली. अहमदशहाचा गोट लुटण्यास आलेल्या या पथकात कोणी जिवंत राहिला नाही. योगायोगाने शुजाउद्दौला त्या बाजूने गेला. जहानखानाने त्याला कापलेल्या डोक्यांचे ढिगारे दाखविले. असे म्हणतात की वीस हजार डोकी मोजण्यात आली. ती अहमदशहाला दाखविण्यात आली.

अशाच प्रकारे दर चार-पाच दिवसांनी दोन-तीन हजार मराठे मारले जात.

या सुमारास अहमदशहाच्या लष्करातील हिंदुस्थानी सरदारांना बातमी लागली की गोविंद पंडित नावाचा सरदार चाळीस पन्नास हजार सैन्य घेऊन दिल्लीहून निघाला असून रोहिले आणि शुजाउद्दौला यांचा मुलूख लुटण्याचा त्याचा इरादा आहे. ही बातमी ऐकून रोहिले आणि शुजाउद्दौला हे अत्यंत काळजीत पडले. त्यांनी ही हकिकत अहमदशहाला सांगितली. रोहिल्यांच्या मुलुखाचे रक्षण करण्याच्या उद्देशाने, कंधारहून आपल्या छावणीत नुकत्याच आलेल्या हाजी अताईखान आणि हाजी करीमदादखान.

(२६) या सरदारांना आज्ञा केली की तुम्ही ताबडतोब येथून निघून गोविंद पंडित यांचा बीमोड करावा. आणि उद्या यावेळीपर्यंत शत्रूंची डोकी हजर करावी. दिवस मावळण्यास थोडा अवधी होता. उभय सरदारांनी मार्गदर्शनाकरिता म्हणून हाफिज रहमतखानाचा मुलगा इनायतखान याच्या रिसाल्यातील पाचशे स्वार आणि सहा हेर घेतले आणि आपले तीन चार हजार स्वार घेऊन ते तडक छावणीतून निघाले. त्यांनी रातोरात यमुना ओलांडली आणि भल्या पहाटे ते गोविंद पंडिताच्या सैन्यावर तुटून पडले. त्यांनी असंख्य लोकांची कत्तल केली. आणि गोविंदपंत आणि इतर अठरा हजार लोकांची डोकी कापून ते दुसऱ्या दिवशी तिसऱ्या प्रहरी अहमदशहाच्या छावणीत परतले. त्यांनी कापलेली डोकी अहमदशहाला दाखविली. यामुळे रोहिले सरदारांचे समाधान झाले.

मराठ्यांच्या आणि अफगाणांच्या सैन्याच्या सतत चकमकी चालत. अफगाण सैन्यात प्रत्येकजण सावध आणि तत्पर असे. एका रात्री दिल्लीहून भाऊकरिता खजिना येत होता. खजिन्याबरोबर असलेले मराठे अंधाऱ्या रात्री वाट चुकून अफगाणांच्या छावणीत शिरले. आणि ही आपलीच छावणी असे समजून त्यानी पहारेकऱ्यांना मराठीत विचारले की अमक्या अमक्या सरदाराची पागा कोठे आहे. हे ऐकताच रोहिले त्यांच्यावर तुटून पडले. आणि त्यांनी खजिना हस्तगत केला.

हा गोंधळ ऐकून अफगाण शिपाई तेथे आले आणि खजिन्याबरोबर असलेल्या मराठ्यांची कत्तल झाली. आणि सर्व खजिना अफगाण सैन्याच्या हाती पडला.

एके दिवशी इब्राहीमखानाचा भाऊ फत्तेखान हा रात्रीचा छापा घालण्याच्या उद्देशाने फौज आणि तोफा घेऊन अफगाणांच्या छावणीवर चालून आला. मोर्चावर हिंदुस्थानी (रोहिले) होते. ते सावध झाले आणि दोन्ही दळात युद्ध जुंपले. शेवटी फत्तेखानाची तीन निशाणे आणि काही तोफा अफगाणांनी हिसकावून घेतल्या. फत्तेखानाचा बीमोड होऊन त्याला आपल्या छावणीत परत जावे लागले.

आणखी एके दिवशी इनायतखान आणि नजीबुद्दौला यांनी आपले सैन्य घेऊन मराठ्यांच्या छावणीत प्रवेश केला. लढाई सुरू झाली. बरेच मराठे कत्तल झाले. रोहिल्यांनी पुढे घुसून मराठ्यांच्या तोफखान्याकडे कूच केले. त्यापैकी काही तोफा ताब्यात घेऊन त्यांनी उडविण्यास सुरवात केली. अकस्मात चाळीस पन्नास हजार मराठे

त्यांच्यावर तुटून पडले आणि त्यांनी रोहिल्यांना कोंडले. मराठ्यांनी तल्वारी चालविण्यास सुरवात केली. रोहिलेही शर्थीने लढले. पण मराठ्यांची फौज प्रचंड असल्यामुळे रोहिल्यांचे काही चालले नाही. त्यांच्यापैकी बरेच मराठे गेले.

(२८) त्यादिवशी नजीबुद्दौल्याचे सहा हजार रोहिले मारले गेले. जवळ जवळ पाचशे शिपाई रक्तबंबाळ होऊन मराठ्यांच्या छावणीतून परत आले. शुजाउद्दौल्याचा गोट नजीबुद्दौल्याजवळ होता. रोहिल्यांचे शौर्य पाहून त्याने धन्योद्गार काढले. हाफिज रहमतखान आजारी होता. पण त्याचा मुलगा इनायतखान हा या युद्धात हजर होता. रोहिले सरदारांनी त्यादिवशी उत्कृष्ट कामगिरी बजावली. असे म्हणतात की आपले सैन्य कमी आणि शत्रूचे जास्त आणि तेही तोफखान्याने युक्त असूनही अहमदशहाने असे युद्ध केले की मराठ्यांचा बीमोड झाला.

पाच महिनेपर्यंत मराठे आणि अहमदशहा यांच्यात छापे, चकमकी आणि गोळागोळी या चालू होत्या. अफगाणांनी मराठ्यांची रसद पूर्णपणे तोडली.

(२९) मराठ्यांच्या छावणीत इतका भयंकर दुष्काळ पडला की लोक शेवटी जनावरांच्या हाडाचे पीठ करून खावू लागले. उपासमारीने अनेक घोडी मेली आणि उरलेली निकामी झाली. शेवटी नाइलाज होऊन मराठे छावणी सोडून मैदानात आले. उभय सैन्यात घनघोर युद्ध झाले. त्या दिवशी हाफिज रहमतखान याचा मुलगा इनायतखान याने आपले सैन्य घेऊन निकराची लढाई केली. पण त्याच्या समोर मराठ्यांची फौज असंख्य असल्यामुळे तो त्यांच्या कचाट्यात सापडला. अहमदशहाला हे कळताच त्याने इनायतखानाच्या मदतीकरिता हाजी अताईखान यास पाठविले. अताईखानाने मराठ्यांवर हल्ला चढविला. पण त्याचे मरण ओढवले होते. बंदुकीची गोळी लागून तो ठार झाला. त्यानंतर अहमदशहाने आपली एक हजार गुलामांची पलटण पुढे पाठविली. आणि मग एका पाठोपाठ एक अशा पलटणी तो सारखा पाठवीत गेला. विश्वासराव आणि इतर सरदार हत्तीवर होते. तेथे एकंदर तीनशे हत्ती होते. त्यांच्यावर पहिली पलटण तुटून पडली. पलटणीतील शिपाई बंदुकीची एक फैर झाडीत आणि दुसऱ्या बाजूने निघून जात. लगेच दुसरी पलटण त्यांची जागा घेई. तोपर्यंत पहिली आणि नंतर दुसरी अशा पल्टणी परत येत आणि बंदुकांचा मारा करीत.

(३०) या तिन्ही पल्टणींच्या माऱ्याने भाऊ, विश्वासराव आणि अनेक सरदार गोळ्या लागून मृत्युमुखी पडले. हत्तींना जखमा लगल्या. तोफांच्या आणि बंदुकीच्या आवाजाने ते घाबरून जाऊन सैरावैरा धावू लागले. त्यामुळे मराठा पथकांची पांगापांग होऊ लागली. बंदुकीच्या फेरी झाडल्यानंतर वरील अफगाण पल्टणींनी आपल्या तल्वारी बाहेर काढल्या आणि मराठ्यांवर चालविण्यास सुरवात केली. दक्षिण्यांचा सर्वनाश झाला. इतकी युद्धोपयोगी सामग्री जवळ असूनही त्यांच्यात भयंकर पळापळ झाली. रोहिल्यांनी हल्ल्यावर हल्ले चढवून त्यांची कत्तल केली. दक्षिण्यांची इतकी माणसे मारली गेली की इतकी प्रेते पडलेली या पूर्वी कोणी पाहिली नसतील. आणि ऐकलीही नसतील. चाळीसपन्नास कोसापर्यंत प्रेतांच्या राशी पडल्या होत्या. गर्विष्ठांचा मद उतरून धडा मिळावा असा प्रकार घडला. असे म्हणतात की त्या कत्तलीतून एकही सरदार सुटला नाही. मल्हाररावांचे पथक शुजाउद्दौला आणि नजीबुद्दौल्याच्या मोर्चासमोर होते. म्हणून तो आपल्या पथकासहित सुरक्षित निसटला. दौलतराव शिंद्याचा चुलता महादजी याला पटेल म्हणत. तो पुढे नावलौकिकास चढला आणि हिंदुस्थानात त्याला मोठा अधिकार प्राप्त झाला

(३१) तो जखमी होऊन पळाला. एक अफगाणाने त्याचा साठ कोसापर्यंत पाठलाग केला आणि त्याच्या पायावर वार करून त्याला पाडले आणि त्याचे सामान घेऊन आपल्या छावणीकडे परत गेला. यामुळे महादजी

शिंद्याचा पाय अधू होऊन त्याला दुसऱ्याच्या मदतीशिवाय उठता येत नसे. समशेर बहादुरला मानेवर भारी जखम झाली. तो कसाबसा भरतपुरला पोहोचला. सूरजमलने त्याचा इलाज करण्याची पराकाष्ठा केली पण त्याचा काही उपयोग न होता तो मरण पावला. इब्राहीमखान गार्दीला कैद करून अहमदशहाकडे आणण्यात आले. शुजाउद्दौल्याने त्याच्याबद्दल पुष्कळ रदबदली केली. पण उपयोग झाला नाही. अहमदशहाने त्याच्या वधाची आज्ञा केली.

(३२) त्याचे कारण असे की त्याने आपल्याला येऊन मिळावे म्हणून अहमदशहाने बऱ्याच वेळा निरोप पाठविला होता. पण तो कबूल झाला नाही. आणि हिंदूंची सोबत त्याने सोडली नाही. या युद्धात शत्रूची विपुल संपत्ती अहमदशहाच्या हाती लागली. जिकडे तिकडे जयघोष होऊ लागले. अफगाण सैन्यातील प्रत्येक सरदाराला वस्त्रे अलंकार वगैरे देण्यात येऊन त्याची प्रशंसा करण्यात आली. हाफिज रहमतखानाचा मुलगा इनायतखान यावर बहुत संतुष्ट होऊन अहमदशहा म्हणाला की या जयाबद्दल तुझे अभिनंदन. परमेश्वराची तुझ्यावर आणि तुझ्या बापावर कृपा राहो. नंतर सरदारांना उद्देशून तो म्हणाला की आता दिल्लीहून बंगाल आणि दक्षिणेपर्यंतचा सगळा मुलूख मी तुमच्याकरिता निष्कंटक करतो. तुम्ही सर्वांनी निश्चिंत राहून माझे अभिष्टचिंतन करावे. शुजाउद्दौला तुमच्या जमातीचा नाही. त्याला मी आपल्याबरोबर घेऊन जाईन आणि तिकडे मी त्याला विस्तृत मुलूख देईन. हे ऐकून सगळे रोहिले सरदार गप्प राहिले. मग हाफिज रहमतखानाने म्हटले की आमच्यात आणि शुजाउद्दौल्यात परकेपणा नाही. त्यांनी आमची पुष्कळ वेळा मदत केली आहे. आपण त्यांना बरोबर नेऊन तिकडे मुलूख द्याल. पण हिंदुस्थानातील लोक म्हणतील की सगळे अफगाण एक झाले. एक झाले. एकच बिगर अफगाण राहिला होता त्याला त्यांनी हिंदुस्थानाबाहेर काढले. शुजाउद्दौल्याला हिंदुस्थानाबाहेर नेणे आम्हाला बरे वाटत नाही.

(३३) यावर अहमदशहा म्हणाला की मला शुजाउद्दौल्याशी अदावत नाही. केवळ तुमच्या हिताकरिता मी बोललो. तुम्हाला पटत नाही. पण लक्षात ठेवा याचा परिणाम तुम्हाला एके दिवशी दिसून येईल. मग अहमदशहाने हिंदुस्थानी सरदारांना निरोप दिला. सिरहिंदच्या सुभेदारीवर जैन खानाची त्याने नेमणूक केली आणि कूच करीत तो कंधारला पोहोचला.

## फेरियर कृत अफगाणांचा इतिहास

(जनरल फेरियर हा फ्रेंच अधिकारी इ. स. १८४० च्या सुमारास इराणात होता. इराणचे सैन्य तयार करण्याचे काम त्याच्याकडे होते. पुढे ईराणच्या राजकारणात रशियाचे वजन वाढू लागले तसे त्याला फ्रान्सला परत जावे लागले. फेरियर फिरून एकदा इराणात आला तो अफगाणिस्तान मार्गे पंजाबात जाऊन रणजितसिंहाच्या पदरी नोकरी पत्करावी या उद्धेशाने. या निमित्ताने त्याने अफगाणिस्तानात प्रवास केला. प्रवासात त्याला अनेक हाल अपेष्टा भोगाव्या लागल्या. पंजाबातील परिस्थिती रणजितसिंहाच्या मृत्यूनंतर पालटली होती. त्यामुळे फेरियरला अफगाणिस्तानातून परत जावे लागले. अफगाणिस्तानाच्या प्रवासावर फेरियरने दोन उत्कृष्ट ग्रंथ लिहिले आहेत. एकाचे नाव कारवान जर्नीज असे असून दुसरा ग्रंथ अफगाणांचा इतिहास हा आहे. दोन्ही ग्रंथांचे भाषांतर क्याप्टन जेस याने केले असून अफगाणांचा इतिहास हा ग्रंथ लंडन येथे इ. स. १८५८ मधे प्रसिद्ध केला आहे. या पाचशे पानाच्या ग्रंथात अफगाणांची मोठी तपशीलवार माहिती देण्यात आली आहे. विशेषत: एकोणिसाव्या शतकातील कंधार, हिरात, बल्ख इत्यादी भागातील घडामोडी फेरियरने स्वत: पाहिल्या होत्या. त्यांचा त्याने खूपच तपशील दिला आहे. त्यापूर्वीची हकिकत त्याला काही ग्रंथांवरून आणि ऐकीव माहिती वरून द्यावी लागली. पान १३४ वर

तो म्हणतो.

"येईपर्यंत (शहाशुजाच्या राज्यारोहणापर्यंत) मी दिलेली माहिती दोन हस्तलिखित ग्रंथांवरून घेतली आहे. मिर्जा अली अहमदच्या ग्रंथावरून मी अफगाणाचे ईराणवरील आधिपत्य संपेपर्यंतच्या काळाचे वर्णन केले. त्या वेळेपासून शहाशुजाचे काबूल येथे आगमन होईपर्यंतची हकिकत मी अब्दुल्लाखान हिरातीच्या ग्रंथावरून घेतली आहे. अब्दुल्लाखान हिराती हा हिरातचा राजपुत्र शहा कामरान (अहमदशहा अब्दालीचा पणतू) याचा पेशखिदमत म्हणजे कारभारी होता. त्याच्या हकिकतीत तारखांचे उल्लेख नाहीत. शिवाय ती अगदी त्रोटक आहे हे मात्र सांगितले पाहिजे. त्यामुळे मला इतरत्र साधने धुंडाळावी लागली. अफगाणिस्तानातील माझ्या सफरीत मी शहा तैमूर आणि त्याच्या मुलांची समकालीन माणसे यांच्या तोंडून माहिती ऐकली. त्यांनी प्रत्यक्ष घटनांत भाग घेतला होता. त्या माहितीची भर मी आपल्या हकिकतीत घातली आहे."

पानीपतसंबंधी फेरियरने जी माहिती दिली आहे त्यात अनेक चुका आहेत. तारखांची तर चांगलीच गल्लत झाली आहे. पण पानिपत-पूर्व आणि पानीपतोत्तर घटनांचा परिणाम अफगाणिस्थानच्या राजकारणावर कसा झाला हे पाहाण्याच्या दृष्टीने फेरियरने दिलेला मजकूर मराठी इतिहासाभ्यासकास माहितीपूर्ण वाटेल.

(८६) फेरियर म्हणतो "अहमदशहा गूरकानी हा दिल्लीचा बादशहा होता. इ. स. १७५३ मधे त्याचा वजीर गाजीखान याने त्याला गादीवरून काढले आणि त्याचा पुतण्या आलमगीर यास त्याच्या जागी बसविले. आलमगीर हा अगदी निर्बुद्ध होता. गाजीने इ. स. १७६० मध्ये त्याचा खून केला आणि सगळा अधिकार स्वत: बळकाविला. अहमदशहा मुल्तान येथे येऊन दाखल होण्यापूर्वी काही दिवस त्याला ही बातमी कळली. मोगल आणि मराठा सैन्ये एकत्र आली आहेत हे पण त्याला कळले.

नादिरशहाच्या दिल्लीवरील स्वारीपासून हिंदुस्थानात अंदाधुंदी माजली होती. महंमदशहाच्या मृत्यूनंतर अराजकच झाले. हिंदुस्थानचे राजे रजवाडे आणि नवाब मराठ्यांना खंडणी देत. मराठामंडळाने आपल्या मानेवर लादलेले जू झुगारून द्यावे याची त्यांना तळमळ होती. अहमदशहाने त्यांची ही प्रवृत्ती वाढीला लागावी म्हणून त्यांच्याकडे गुप्त संधान लाविले. त्यांना सोयीचे जावे म्हणून तो आस्ते आस्ते कूच करीत होता. सिंध आणि मुल्तानची व्यवस्था करण्यात त्याने काही काळ घालविला. नंतर त्याने पंजाबात प्रवेश केला. तो येतो हे पाहताच मराठ्यांनी न लढताच पंजाबातून पाय काढला. अहमदशहा लाहोरात येऊन थांबला. हिंदुस्थानातील राजे रजवाड्यांनी मराठ्यांची आज्ञा मानली. अहमदशहाची कारस्थाने चालू होती तरी त्यांनी आपली सैन्ये मराठ्यांच्याकडे पाठविली. मराठ्यांच्या या संयुक्त सैन्यात दोन लाख माणसे होती. त्यात सत्तर हजार घोडदळ, वीस मोठ्या तोफा आणि दोनशे जंबूरक (लहान तोफा) होत्या.

हे सैन्य दिल्लीत जमेपर्यंत अहमदशहाने लढाई केली आणि यमुना नदी गाठली. पण पाणी खोल आणि वेग मोठा. नदीवर पूलही नव्हता म्हणून नदीचे पाणी उतरेपर्यंत वाट पाहाण्याचे त्याने ठरविले. यात त्याची बाजू दुबळी होती. कारण त्याला रसद मिळावयाची ती नदीच्या पलीकडून आणि तो भाग तर शत्रूच्या ताब्यात होता. आणि मराठ्यांनी नदीवर सारखा पहारा ठेविला होता. त्यामुळे अफगाणांच्या छावणीत दुर्भिक्ष्य होऊ लागले. काहींनी तक्रार करण्यास सुरुवात केली तर काहींनी छावणी सोडून पळून जाण्याचा बेत केला. पण याच सुमारास, अहमदशहाच्या प्रयत्नाचे फळ म्हणून की काय त्यांची रसदेची टंचाई दूर झाली. आणि त्यांच्या उमेदी बळावल्या. लखनौचा नवाब शुजाउद्दौला याने नाखुशीने आणि निरुपायाने मराठ्यांचे अंकितत्व पत्करले होते. त्याने आता

मराठ्यांना सोडले आणि तो अफगाणांच्या छावणीत आला. त्याच्या पाठोपाठ इतर राजेरजवाडे आले. त्यांच्याबरोबर पंचवीस हजारांचे सैन्य होते. आता अहमदशहाचे सैन्य पंच्याऐंशी हजारापर्यंत गेले. त्यात पंचेचाळीस हजार घोडेस्वार आणि बाकीचे पायदळ शिपाई होते. शिवाय सतरा मोठ्या तोफा आणि ऐंशी जंबूरक होते. अफगाणांच्या सैन्यात बिनलढवय्ये असे दहा हजार माणूस होय. उलट मराठ्यांच्या सैन्यात एक तृतीयांश माणसे बाजर बुणगी म्हणजे नोकर, चाकर, बैल, घोडी आणि उंट हाकणारे अशी होती. त्यामुळे लढणाऱ्यांची संख्या एक लाख किंवा एक लाख सहा हजारांच्यावर नव्हती.

शुजाउद्दौल्याने अफगाणांच्या सैन्यात रसद पोहोचविली. नदी ओलांडणे अशक्य आहे, असा सरदारांचा अभिप्राय पडला होता. पण त्यांच्या शंका दूर करण्यात आल्या आणि लढाई देण्याचे ठरले. सात जानेवारी सत्राशे एकसष्ट रोजी अहमदशहाने सरदार समदखान यास आज्ञा केली की त्याने पाच हजार स्वारांसहित नदी ओलांडावी आणि मोगलांवर तुटून पडावे. सरदाराने ही आज्ञा ताबडतोब अंमलात आणिली. पण नदीचा वेग इतका होता की समदखान यूसुफ जईचे बहुसंख्य घोडेस्वार पाण्यात वाहून गेले. शत्रूच्या तोफखान्याने त्यांच्यावर इतका भडिमार केला की त्यातून वाचलेले सैन्य मोठ्या पेचात सापडले. त्याला मदत पाठवावी लागेल हे दिसताच त्याने सरदार दिलावरखान इसाकजई आणि झाल बेग पोपलजई यांना त्यांच्या मदतीस धाडले. त्यांचा आणि समदखान यांचा आपसात द्वेष होता. त्यांनी मन:पूर्वक कामगिरी बजावली नाही आणि त्यांनी समदखानाचे सैन्य गारत होऊ दिले. अहमदशहाने सगळी परिस्थिती एका क्षणात ओळखली आणि युद्धाचे भवितव्य लहान काय मोठ्या काय सर्वच गोष्टींवर अवलंबून आहे हे जाणून त्याने पाण्यात घोडा घातला. त्याच्या मागोमाग त्याचे शरीररक्षक नदीत उतरले. त्याचे इतर सरदार आतापर्यंत स्वस्थ उभे होते. त्यांना पण नदीत उतरणे भाग पडले. आपला बादशहा मृत्यूची पर्वा करीत नाही आणि आपण मात्र तमाशा पाहात आहोत याची अहमदशहाच्या सैन्याला लाज वाटली. हा हल्ला परतविण्याकरिता मराठ्यांनी तोफांचा जोराचा भडीमार केला. हा मारा इतका भयंकर होता की नदीचे पात्र माणसे आणि घोडी यांच्या प्रेतांनी भरून गेले आणि त्यांच्या रक्ताने पाणी लाल झाले. पण भयंकर हानि सहन करूनही अफगाणांनी नदीचा किनारा गाठला. आणि त्वेषाने व सूड बुद्धीने ते शत्रूवर तुटून पडले. त्यांनी शत्रूचा पराजय केला. मराठ्यांचे वीस हजार शिपाई रणांगणावर पडले. त्यांचा तोफखाना आणि इतर अपार लूट जेत्यांच्या हाती लागली. हे भयंकर आणि संस्मरणीय युद्ध दिल्लीच्या उत्तरेस काही परसंग (एक परसंग म्हणजे चार मैल) अंतरावर पानीपत येथे झाले.

शुजाउद्दौल्याला आतापर्यंत अफगाणांच्या शौर्याची पूर्ण कल्पना नव्हती. पण त्याने त्यांचे शौर्य डोळ्यांनी पाहिले. अफगाणांच्या कृतघ्नतेची पण त्याला कल्पना होती. आपण त्यांना विनाकारण मदत केली असे त्याला वाटून त्याला पश्चात्ताप झाला. पण त्याने अफगाणांना सोडले नाही. दिलावरखान आणि जालबेग यांनी अहमदशहाची आज्ञा पाळली नव्हती. त्यांनी समदखानाला साह्य केले नाही. अहमदशहाचा आपल्यावर राग होईल या कल्पनेने त्यांनी युद्धाचा निकाल लागण्यापूर्वीच आपल्या पथकांसहित छावणीतून पलायन केले. या प्रकाराने अहमदशहा डगमगला नाही. त्याने चाल करून मराठ्यांचा मुलूख घेतला. तेथून तो मोगलांच्या हद्दीत शिरला. हे पाहून गाजिउद्दीनने शुजाउद्दौल्याच्या मार्फतीने अहमदशहाशी तह करण्याचे ठरविले. शुजाउद्दौला याला अनुकूल होता. पण त्याने दोन अटी घातल्या. एक म्हणजे गाजिउद्दीनने आपले सगळे अधिकार मोगल सम्राटाच्या हवाली करावे आणि दुसरे म्हणजे त्याने युद्धखर्च म्हणून भली मोठी रक्कम द्यावी, या अटी गाजिउद्दीनने कबूल केल्या. अहमदशहाच्या

मनात शहाआलमला गादीवर बसवायचे होते. पण त्याने न ऐकल्यामुळे अहमदशहाचा मुलगा जवानबख्त याला मसनदीवर बसविले.

दिल्लीचा बंदोबस्त केल्यानंतर अहमदशहाने पंजाबची व्यवस्था लावण्याकरिता त्या दिशेने कूच केले. तेथून तो दक्षिणेकडे जाण्याच्या विचारात होता. इतक्यात त्याला मराठे दिल्लीवर चाल करून येत आहेत असे कळले. तो ताबडतोब तिकडे वळला. यामुळे शुजाउद्दौला मराठ्यांच्या तडाख्यातून वाचला. कारण अहमदशहा येत आहे असे कळताच मराठे दिल्लीहून निघून गेले. शुजाउद्दौल्याने मराठ्यांशी कारस्थाने करून जवानबख्तचा पाडाव करण्याचे ठरविले होते म्हणा किंवा अफगाण सरदारांना शुजाउद्दौल्याचा उत्कर्ष सहन न होऊन त्यांनी त्याचा नाश करण्याकरिता अहमदशहास खोट्या गोष्टी सांगितल्या म्हणून म्हणा, अहमदशहाने झालेल्या घटनांकडे दुर्लक्ष करण्याऐवजी, शुजाउद्दौल्याकडून जबर रकमेची मागणी केली. शुजाउद्दौल्याला याचा राग आला. त्याने अहमदशहाचे म्हणणे कबूल केले नाही. उलट त्याने आपल्या सैन्यासहित अहमदशहाच्या छावणीतून गुपचूप पलायन करून आपले राज्य गाठले. आधीच दिलावरखान आणि जालबेग हे आपल्या दहा हजार सैन्यासहित त्याला सोडून गेले होते. त्यात शुजाउद्दौल्याच्या पलायनाची भर पडली. यामुळे अहमदशहाचे सैन्य थोडेसेच राहिले. त्याला आपली मोहीम चालू ठेवणे अशक्य झाले. त्यामुळे आतापर्यंतच्या युद्धात हस्तगत झालेल्या संपत्तीवर समाधान मानून तो आपल्या देशाकडे परत फिरला. तेथे काही महत्त्वाच्या घटना घडल्यामुळेही अहमदशहाला आपल्या देशाकडे परत फिरणे भाग पडले.

काही महत्त्वाकांक्षी आणि असंतुष्ट सरदार अहमदशहाची छावणी सोडून निघून गेले होते. ते दिलावरखान आणि जालबेगला मिळाले. अहमदशहा अबदालीचा पुतण्या अब्दुल खालिकखान याने बंड केले होते. वरील सरदारांनी कंधार जवळील गिरिश्क येथे त्याला बादशहा झाल्याचे जाहीर केले आणि मग सर्वांनी मिळून कंधारवर चाल केली. यापूर्वी जेरगुरानी जमातीचा सरदार हाजी जमालखान याने अहमदशहा अबदाली हिंदुस्थानाकडे रवाना झालेला पाहून, आपण बादशहा असल्याचे कंधार येथे जाहीर केले होते. त्याने आपल्या नावाने नाणी पण पाडली होती. पण अहमद शहाला विजय मिळाल्याचे त्याने ऐकिले तेव्हा त्याने आपण बादशहा असल्याचा दावा सोडून देण्यातच आपले हित आहे हे ओळखले. पण हा पोच अब्दुल खालिकला राहिला नाही. राज्य मिळविण्याकरिता त्याने प्रयत्नाची शिकस्त केली. कंधारमधे काय होत आहे याची बातमी अहमदशहाला लागली. पण स्वत: तिकडे न जाता त्याने अब्दुल्लाखान इसाकजई ऊर्फ शहापसंदखान या सरदाराला आपल्या पुतण्याचे आणि त्याला मिळालेल्या सरदारांचे बंड मोडण्याकरिता कंधारला पाठविले. बंडखोर सरदार गिरिश्कहून कंधारला पोहोचण्यापूर्वीच शहापसंदखानाने कंधार गाठावे अशी त्याला ताकीद देण्यात आली होती. पण शहापसंदखानाला कंधारला पोहोचणे झाले नाही. बंडखोरांनी तोपर्यंत अहमदशहाचा मुलगा सुलेमान मिर्जाला कंधारातून हाकलून लाविले होते. पाठिंबा देण्याचे दिलावरखान आणि जालबेग यांनी बातमी पसरविली होती की पानीपत येथे अहमदशहाचा पराजय झाला असून त्याची फार दुर्दशा झाली आहे. या बातमीवर विश्वास ठेवून अनेक अफगाण सरदारांनी अब्दुल खालिकच्या बंडाला पाठिंबा दिला होता. पण खरी वस्तुस्थिती त्यांना लवकरच कळली. शहापसंद खानाचे सैन्य कंधारवर चालून आलेले त्यांनी पाहिले आणि मग त्यांना आपल्या वागणुकीचा पश्चात्ताप झाला. शरण जाणे हाच उत्तम मार्ग आहे हे पाहून ते सर्व शहापसंदखानाला जाऊन मिळाले. कंधार शहर त्यांनी शहापसंद खानाच्या ताब्यात दिले. इतकेच नव्हे तर त्यांनी अब्दुल खालिकलाही पकडून त्याच्या हवाली केले.

अहमदशहा पेशावरच्या प्रवासात असता त्याला शहापसंद खानाने लिहून पाठविलेली सगळी हकीकत कळली. आपल्या पुतण्याचा गळा कापून प्राण घ्यावा असे त्याने शहा पसंदखानाला लिहून कळविले. त्याप्रमाणे शहा पसंदखानाने ताबडतोब अंमलबजावणी केली.

नंतर सुलेमान मिर्जाने जाल बेगला कपटाने कंधारला बोलावून ठार मारले. दिलावरखान हाती सापडला नाही. त्याला अहमदशहाचा दुसरा मुलगा तैमूर याने आश्रय दिला.

(प्रा. गंडासिंग यांनी अहमदशहा अब्दालीचे चरित्र लिहिले आहे. त्यात वरील बंडांचा उल्लेख केला आहे. पानीपतला अहमदशहा हरला असता तर त्याला आपले राज्यपद टिकविता आले असते काय?)

## तारीखे सुल्तानी

(सदर ग्रंथ सुल्तान महंमदखान दुराणी याने १२८१ हिज्री म्हणजे इ. स. १८६४ मध्ये लिहिला. तो १२९८ हिज्री म्हणजे इ. स. १८८१ मध्ये मुंबई येथे छापून प्रसिद्ध करण्यात आला. हा ग्रंथ फारसी भाषेत आहे. या ग्रंथाची एक प्रत मुंबई येथे उर्दू संशोधन मंडळाच्या ग्रंथालयात आहे. संशोधन मंडळाचे संचालक प्राध्यापक नदवी यांच्या सौजन्याने ती मिळाली. खाली या ग्रंथातील पानीपत संबंधीच्या मजकुराचा मूळ फारसीवरून अनुवाद देण्यात येत आहे. सदर ग्रंथातील अहमदशहा अब्दालीच्या चरित्राचा इंग्रजी अनुवाद रेहाटसेक यांनी केला असून तो इ. स. १८८७ च्या इंडियन अँटिक्वेरीच्या अंकात पान २६५-२७४ आणि पान २९८-३०३ वर छापलेला आहे. पुढील मजकूर मूळ फारसीवरून दिलेला आहे. फारसी प्रतीची पाने १३५-१४२)

राजपुत्र तैमूर, सरदार जहानखान आणि नवाब नजीबुद्दौला यांच्या अर्जीवरून हिंदुस्थानातील कोलाहलाची बातमी अहमदशहाला कळली. त्याने काबुल आणि कंदाहारहून सैन्ये जमविली आणि त्वरेने तो पेशावर येथे दाखल झाला; काफरांचा मोड करून लाहोर आणि दिल्ली परत हिसकावून घेण्याचा त्याने निश्चय केला. दत्ताजी पाटील हा अफगाणावर देखरेख ठेवणे आणि अटकेवर टेहेळणी करणे या कामावर नेमिला गेला होता. अहमदशहाची येण्याची खबर लागताच तो हिंदुस्थानच्या दिशेने पळाला. अदीना बेग या सुमारास मरण पावला. अहमदशहाच्या येण्याची खबर लागताच गाजिउद्दीन दिल्लीत दाखल झाला. अहमदशहाबरोबर संधान बांधीत आहेत असे निमित्त दाखवून त्याने आलमगीर बादशहा (दुसरा) आणि वजीर कमरुद्दीनचा मुलगा इंतिजामुद्दौला यांचा वध करविला आणि अहमदशहा अब्दाली विरुद्ध युद्धाचा झेंडा उभा केला. गाजिउद्दीनने जनकोराव मराठा यास जंगी फौजेसहित आघाडीस ठेविले आणि तो स्वत: इतर मराठे सरदाराबरोबर मागे राहिला. जनकोरावाने यमुना ओलांडली. दत्ता पाटील पंजाबातून आला होता. त्याची जनकोरावाने कुंजपुऱ्यानजीक गाठ घेतली. अहमदशहा संबंधीची माहिती काढल्यावर त्यांनी कुंजपुऱ्याहून कूच करून छावणी कायम केली. अहमदशहाने सिंधु नद ओलांडला. राजपुत्र तैमूर आणि सरदार जहानखान यांना त्याने बिनीवर पाठविले. स्वत: पाठोपाठ निघून तो लाहोरात दाखल झाला. तेथे त्याने ख्वाजा मिर्जा जान यास पकडले. या सुमारास हिंदुस्थानातील अफगाण सरदार हाफिज रहमतखान आणि त्याचा पुत्र इनायतखान व दूंदेखान वगैरे अहमदशहाच्या छावणीत दाखल झाले आणि त्याच्या आशेने राजपुत्र तैमूर याला जाऊन मिळाले. तेथून अफगाणांच्या सैन्याने कूच करून यमुनेच्या काठावर मराठ्यांची छावणी होती. तिच्यावर हल्ला चढविला. रोहिल्यांचे सैन्य मुख्यत: घोडेस्वारांचे होते. त्यांच्या आघातांनी रोहिले जर्जर झाले. पण आपली नामुष्की कबूल करणे त्यांना मानहानीचे वाटले. अहमदशहाने ते ओळखले आणि रोहिला पायदळाच्या मदतीला

त्याने निवडक आणि तडफदार सैन्य धाडले. आणि स्वत:ही त्या दिशेने त्वरेने प्रयाण केले. अहमदशहाने आपल्या सैन्याला हुकूम केला. की जंबूरकरांचा मारा करावा. सैन्याने उंटाची एक भिंतच सैन्याभोवती उभी केली. आणि त्यावरून जंबूरकरांचा मारा सुरू केला.

आणि दुसरीकडून गुलामांच्या पल्टणीने यमुना पार होऊन मराठ्यांच्या तळावर गोळ्यांचा वर्षाव केला. घोर युद्ध झाल्यावर दत्ता पटेल मारला गेला. जनकोरावाला जखमा लागल्या. बाकीचे मराठे शिपाई पळून गेले. गाजिउद्दीन घाबरून दिल्ली सोडून पळाला आणि त्याने कुंभेरीची वाट धरली आणि सूरजमलचा आश्रय घेतला. अहमदशहाने विजयाबद्दल परमेश्वराचे आभार मानले आणि तो दिल्लीत दाखल झाला. अफगाण सैन्यातील शिस्तीच्या अभावामुळे दिल्लीतील बाजारपेठा उध्वस्त झाल्या. असे म्हणतात की तीन दिवसपर्यंत दिल्लीत कल्पांत कोसळला होता. चौथ्या दिवशी वाचलेल्या लोकांना अभय प्राप्त झाले. आलमगीर दुसरा मारला गेल्यानंतर त्याचा मुलगा आली गौहर याच्या नावाने द्वाही फिरविण्यात आली होती. कारण आलमगीर (दुसरा) याने त्यालाच युवराज म्हणून नियुक्त केले होते. अहमदशहा अब्दालीचा कलही त्याच्याचकडे होता. जयपूर जोधपूर इत्यादींच्या राजेरजवाड्यांनी अहमदशहाच्या आगमनाची वार्ता ऐकिली तेव्हा त्यांनी त्याच्याकडे खंडणी पाठवून त्याचे अंकितत्व स्वीकारले. तिकडच्या भागाचा बंदोबस्त केल्यानंतर अहमदशहाच्या फौजा सूरजमलचा मोड करण्याकरिता वळल्या. प्रथम त्याच्या साबितगड किल्ल्याला त्यांनी वेढा घातला. सूरजमलने त्याचे नाव आराम गढ ठेविले होते. तेथे सूरजमलचा खजिना होता. सोळा दिवसांच्या वेढ्यानंतर तो किल्ला घेण्यात आला. त्यातील सामग्री हस्तगत करण्यात आली. इमादुल्मुल्क आणि सूरजमल यांच्या विनंतीवरून हाफीज रहमतखान याने अहमदशहापाशी जाऊन त्यांचे कसूर माफ व्हावे अशी विनंती केली. शुजाउद्दौला आणि अहमदखान बंगश हे अैमदशहाच्या सेवेत हजर झाले. शुजाउद्दौल्याने अदीना बेगचा मोड करण्याच्या कामात नजीबुद्दौल्याची मदत केली होती हे लक्षात घेऊन अहमदशहाने शुजाउद्दौल्यावर विशेष कृपा दाखवून त्याला फर्जंदखान हा किताब दिला.

पावसाळा जवळ आल्यामुळे अहमदशहाने अनूपशहर येथे छावणी केली.

दत्ताचा मृत्यू आणि बाजीरावाचा पराजय याच्या बातम्या दक्षिण्यांना मिळाल्या. त्यांना त्याचे अत्यंत आश्चर्य वाटले. मराठ्यांचे सैन्य अहमदशहाचा मोड करण्यास निघाले.

(१३७) त्यात बाळाजीचा पुतण्या भाऊ, मुलगा विश्वासराव, जनकोराव, सुभेदार मल्हारराव, बाजीरावाचा मुसलमान बाईकडून झालेला शमशेर बहादुर, हे होते. दहा हजार स्वार व बारा हजारच्या पल्टणी होत्या. प्रत्येक पल्टणीत एकएक हजार पायदळ होते. फिरंग्यांच्या शिस्तीत या पल्टणी वाढल्या होत्या. त्यांचा मुख्य इब्राहीमखान आणि त्याचे सहकारी होते. शौर्यात त्यांचा कोणी हात धरणारा नव्हता. इब्राहीमखानाबरोबर एक हजार तोफा आणि मोठ्या बंदुका होत्या. गोलंदाजही फिरंगी शिक्षण घेतलेले होते. सैन्यात बारा हजार राऊत आणि उत्कृष्ट रीतीने तल्वारी चालविणारे पट्टेबाज होते. असे म्हणतात की सैन्य एकंदरीत तीन लाख होते. अहमदशहाचा पाडाव करावा आणि हिंदुस्थान जिंकून घ्यावा या उद्देशाने हे सैन्य उत्तरेत पोहोचले. मराठ्यांच्या येण्याची बातमी लागली तेव्हा अहमदशहा अतिशय गोंधळून गेला. पण त्याने विचार केला की कंधार लांब आहे. परमेश्वरावर भरवसा ठेवा.

पावसाळा संपल्यानंतर त्याने हिंदुस्थानातील सरदारांच्या मदतीने मराठ्यांशी लढण्याचे ठरविले आणि नजीबुद्दौला, हाफिज रहमतखान आणि फैजुल्लाखान (अली महंमदखान रोहिल्याचा मुलगा) इत्यादी रोहिले सरदारांना घेऊन त्याने कूच केले.

इमादुल्मुल्क आणि सूरजमल, यांची अहमदशहापाशी निराशा झाली होती. ते मराठ्यांना जाऊन मिळाले आणि दिल्ली काबीज करावी म्हणून त्यांनी मराठ्यांचे मन वळविले. दिल्लीचा किल्लेदर याकूब अलीखान बामजई हा शहाजहानपूरचा रहिवासी होता. तो अहमदशहाचा वजीर शहावलीखान याच्या जमातीचा होता. म्हणून त्याने याकूब अलीखानास दिल्लीचा अधिकार सांगितला होता. मराठी सैन्याने दिल्लीला वेढा घातला. काही दिवसांनी वजीर शहाबलीखानाच्या संमतीने याकूब अलीखानाने दिल्ली सोडली आणि तो अहमदशहाच्या सैन्यात दाखल झाला. मराठ्यांनी दिल्ली घेतली. अत्यंत गर्व चढून ते आपापसात म्हणू लागले की अफगाणांवर विजय मिळविल्यावर दिल्लीतील जुम्माशिदीचे आम्ही मोठे मंदिर बनवू म्हणजे आमचे तेच आणि वैभव त्यांना कळून येईल.

मराठ्यांनी अब्दुस्समदखान महंमदजई हश्त नगरी, मिया कुतुबशहा, नजाबतखान आणि इतर सरदारांचा वध केला. त्यांनी कुंजपुरा सगळा लुटून घेतला. ही बातमी अहमदशहाला कळताच तो कुंजपुऱ्याच्या दिशेने चाल करू लागला. वरील सरदारांच्या वधाची बातमी त्याला बागपत येथे लागली. ती ऐकून त्याला विलक्षण त्वेष आला. केव्हा एकदा आपण यमुना पार करतो आणि शत्रूवर आगीचा वर्षाव करतो असे त्यास होऊन गेले.

(१३८) पण नदीला पूर होता. त्यामुळे तो काळजीत पडला. नदीपार करण्यास नावा नव्हत्या. त्याने आपल्या गुलामाच्या पल्टणीला नदीपार करून जाण्याचा हुकूम केला. हे ऐकताच पल्टणीचे चार हजार लोक परमेश्वरावर भरवसा ठेवून पाण्यात उतरले. असे म्हणतात की आपला घोडा पाण्यात घालण्याचा हुकूम अहमदशहाने प्रथम अहमदखान खैबरी नावाच्या स्वाराला दिला. तो आपल्या दोन हजार स्वारानिशी पाण्यात उतरला. नदीच्या परतीरावर मराठ्यांचे रक्षक दल होते. त्यांनी ही परिस्थिती पाहिली. त्यांनी गोळ्यांचा वर्षाव केला. अहमदशहाने, अहमदखानाचे संकट पाहिले. त्याने आपल्या स्वारांना धीर दिला आणि म्हटले की, नदीला पाणी कमी आहे. प्रत्येक स्वाराने एक एक पायदळ शिपाई आपल्या पाठीमागे घ्यावा. त्याने स्वत: परमेश्वराचे नाव घेऊन आपला घोडा पाण्यात घातला. त्याच्या सैन्यातील स्वारांनी त्याला पाण्यात उतरलेले पाहिले. मग सारेजण त्वरेने नदीत उतरले. पुष्कळ माणसे शत्रूच्या गोळीबाराला बळी पडली. अहमदखान खैबरी हा पाण्यास असताना गोळीच्या माराने मृत्यू पावला. नंतर सगळे अफगाण आणि हिंदुस्थानचे रोहिले आणि इतर सैन्य नदीपार झाले. परतीरावरील मराठे रक्षक दल पळून गेले.

नंतर अहमदशहाने हुकूम केला की, प्रत्येकाने आपल्या घोड्याच्या खोगिरी वाळवाव्या आणि आज आराम करावा. उद्या लढण्याची तयारी करावी लागेल. त्याप्रमाणे सर्वांनी विश्रांती घेतली. आणि इतर युद्ध सामग्री दुरुस्त केली.

दुसऱ्या दिवशी ते तेथून निघून दोन कोसावर सराई संभलका येथे पोहोचले. तेथे मराठ्यांचा तळ होता. अहमदशहाने शहा पसंद खान हा जवळ उभा होता त्याला आज्ञा केली की आज तुझी अघाडीवर नेमणूक आहे. आज तू काय कामगिरी करशील हे मी पाहाणार आहे. शहापसंदखान तीन हजार स्वार घेऊन शत्रूवर तुटून पडला. त्याने मराठ्यांच्यावर गोळ्यांचा वर्षाव करून त्यांना पळवून लावले. त्याने अनेक शत्रूंची डोकी कापून अहमदशहाला नजर केली.

(१३९) अहमदशहाने हा आपल्याला शुभशकुन झाला असे समजून खानाची तारीफ करून त्याला वस्त्रालंकार दिले.

भाऊ आणि इतर सरदारांना ही बातमी लागताच ते कुंजपुऱ्याहून निघून पानीपतला आले. अहमदशहाने

आज्ञा केली की मराठ्यांच्या छावणीभोवती लुटालूट करावी. त्याचा परिणाम असा झाला की मराठ्यांना एकटे दुकटे हालचाल करणे मुष्किल झाले. त्यांनी आपल्या सैन्याभोवती खोल खंदक खणला. त्यामुळे मुसलमानांच्या छाप्यापासून त्यांचा बचाव झाला. अहमदशहाने मराठ्यांची छावणी पाहिली. आता काय करावे हे त्याला सुचेना. तो बुचकळ्यात पडला. कारण मराठ्यांचे सैन्य मोठे आणि शिवाय छावणीत बंदोबस्तात राहिलेले. त्याने दोन तीन कोस माघार घेण्याचा बहाणा केला. म्हणजे शत्रूंना वाटेल की आपली लढण्याची इच्छा नाही. आणि आपण स्वदेशाकडे जात आहोत. ही युक्ती सफल झाली. मराठ्यांचे दळ छावणीतून बाहेर पडून लुटालूट करू लागले. सरदार जहानखान हा आपल्या तुकडीसहित जवळच रानात दबा धरून बसला होता. तो एकाएकी मराठ्यांवर तुटून पडला. असे म्हणतात की चार पाच हजार काफरांची डोकी कापून त्याने बादशहासमोर हजर केली. अहमदशहाने त्याची खूप तारीफ केली.

आणखी एके दिवशी शुजाउद्दौला, नजीबुद्दौला वगैरे सरदारांनी अहमदशहाला विनंती केली की काही हजार काफर मराठे स्वार गोविंदपंताच्या नेतृत्त्वाखाली आमच्या मुलुखात घुसले आहेत. आमच्या बायकामुलांची काळजी लागली आहे. अशा परिस्थितीत आम्हाला मरणच डोळ्यासमोर दिसत आहे. हे ऐकून अहमदशहाला त्वेष आला. त्याच दिवशी कंधारहून हाजी अताई महंमदखान आणि हाजी करीमदादखान हे आले होते. त्यांना त्याने हुकूम केला की हिंदुस्थानी सरदारांची अब्रू वाचविली पाहिजे. तुम्ही ताबडतोब स्वार होऊन निघा आणि गोविंदपंताचा बंदोबस्त करा. त्याच्या हातून मुसलमानांचा नाश होईल असे होऊ देऊ नका. दोघा सरदारांनी आपली पथके घेतली. हाफिज रहमतखानाचा मुलगा इनायतखान याचे पाचशे स्वार आणि सहा हेर बरोबर देण्यात आले. ते लोक रातोरात निघाले आणि यमुना पार झाले.

(१४०) सकाळी ते गोविंदपंताचे सैन्य गाफिलपणे होते त्यावर तुटून पडले आणि अनेकांना ठार मारले. उरलेले पळून गेले. गोविंदपंताला मारून त्यांनी त्याचे डोके कापले. अशीच सात आठ हजार डोकी कापून घेऊन ते परत छावणीत आले. यामुळे अहमदशहा खुश आणि इतर सरदार निश्चिंत झाले.

सारांश, बरेच दिवसपर्यंत हिंदू मुसलमानांच्या फौजा आपापल्या छावण्यांतून खबरदारीने राहिल्या. रोज बिनीच्या लोकांच्या चकमकी झडत पण प्रत्येक खेपेस दोन-तीन हजार मराठे अहमदशहाच्या सैन्याला बळी पडत. कारण इस्लामच्या फौजांच्या हातून काफरांचा नाश व्हावा असा विधिसंकेत होता. म्हणून तर इस्लामचे शिपाई शौर्याने काफरावर तुटून पडत. वास्तविक पाहता त्यांचा मुलुख लांब, ते स्वत: परमुलुखात, त्यांचे सैन्य थोडे, या उलट मराठे संख्येने मुंगी आणि टोळ यापेक्षा जास्त. खरोखर परमेश्वराची करणी लक्षात येत नाही.

एक चमत्कार घडला. असे म्हणतात की एके रात्री इस्लामच्या छावणीत काही सैनिक आले. तेथे असलेले रोहिले शिपाई आश्चर्य करू लागले की हे कोठून आले. इतक्यात त्यापैकी एकाने पुढे होऊन दक्षिणी भाषेत विचारले की ही कोणत्या सरदाराची पागा आहे. मुसलमानांनी दक्षिणी शब्द ऐकिले. त्यांनी ओळखले की हे शत्रू सैनिक आहेत. त्यांनी ताबडतोब हल्ला करून शत्रूंना ठार मारले. नंतर पाहतात तो त्यांच्यापाशी खजिना होता. नंतर त्यांना कळले की शत्रू दिल्लीहून खजिना घेऊन मराठ्यांच्या छावणीकडे चालला होता. पण रात्रीच्या अंधारात चुकून अहमदशहाच्या छावणीत आला. बराच खजिना हस्तगत झाला. अहमदशहाने अफगाण रोहिले इत्यादी सैनिकांत तो वाटून टाकला.

सारांश इस्लामच्या फौजेच्या भीतीने मराठे छावणीच्या बाहेर येण्यास धजेनात. त्यांच्या छावणीत रसदेचा

दुष्काळ पडला. अशाप्रकारे पाच महिने गेले. शेवटी मराठ्यांच्या छावणीत अशी परिस्थिती झाली की ते जनावरांची हाडे चुरा करून पीठ म्हणून वापरू लागले. जनावरे दाणावैरणीवाचून मरू लागली, आणि उरलेली निकामी झाली.

(१४१) शेवटी त्यांनी पाहिले की छावणीत उपाशी पडून आपण मरतो त्यापेक्षा युद्धात लढून मरणे बरे, असे ठरवून तयारी करून ते छावणीच्या बाहेर पडले. इकडून इस्लामच्या सैन्याने काफरावर हल्ला चढविला. प्रथमच शत्रूने दूंदेखानाचा मुलगा इनायतखान आणि त्याचे सैन्य पारध्याने सावजाला कोंडावे तसे कोंडले. त्याचा सर्वनाश करावा असा त्यांचा हेतू होता. ही बातमी अहमदशहाला लागताच त्याने हाजी अताईखान कंधारी यास इनायतखानाच्या मदतीस पाठविले. हाजी अताईखानाचे अन्नपाणी संपले होते म्हणूनच की काय मृत्यूने त्याच्या भोवती आपले पाश टाकले. तो गोळी लागून ठार झाला. यानंतर अहमदशहाने इनायतखानाच्या मदतीसाठी तीन चार तुकड्या लागोपाठ धाडल्या. एक तुकडी पुढे होऊन गोळ्यांचा वर्षाव करी आणि मागे हटे. लगेच दुसरी तुकडी पुढे होई आणि गोळ्या चालवी. या माऱ्याने शत्रूची छाती फाटून गेली. या माऱ्यात शत्रूचे सरदार भाऊ आणि विश्वासराव हे ठार झाले. हत्तींना बंदुकीचा मारा असह्य झाला. रणांगणावरील हलकल्लोळाने ते घाबरून इतस्तत: धावू लागले. विजय परमेश्वराच्या कृपेने मिळतो, सैन्याच्या शक्तीने नाही. हत्तीच्या इतस्तत: धावण्याने शत्रूच्या सैन्यात एकच गोंधळ उडून गेला. शत्रूचा पराजय झाला. दुराणी सैन्य संख्येने कमी होते तरी पण ते दक्षिणेच्या सैन्यावर निकराने तुटून पडले. हिंदुस्थानातील रोहिल्यांनी काफरांना ठार करण्यात कसूर केली नाही. मराठ्यांच्या सरदारांपैकी एकजण जिवंत सुटला नाही. पण मल्हारराव मुसलमानांच्या छावणीत आला आणि कोणी त्याला न ओळखल्यामुळे निघून गेला. आणि महादजी शिंदे जबर जखमा खाऊन निसटला. इतके मराठे मारले गेले की सांगितले तर खरे वाटणार नाही. एक लाख मराठे मारले गेले असा अंदाज आहे. पानीपतचे सगळे मैदान प्रेतांनी भरून गेले हेते. अनेक लोक पकडले गेले त्यापैकी इब्राहीमखान गार्दी हा होता. त्याला अहमदशहापुढे आणण्यात आले. त्याने त्याच्या वधाची आज्ञा केली.

(१४२) शुजाउद्दौल्याने त्याच्याबद्दल पुष्कळ रदबदली केली. पण त्याचा उपयोग झाला नाही. इब्राहीमखानाने आपल्याला येऊन मिळावे म्हणून अहमदशहाने त्याला बऱ्याच वेळा निरोप पाठविला होता. पण त्याने कबूल केले नाही. अपार आणि अगणित संपत्ती विजयी सैन्याच्या हाती सापडली. रोहिले सरदारांना अहमदशहाने वस्त्रे अलंकार इत्यादी देऊन त्यांचा सत्कार केला. बादशहाने हाफिज रहमतखानाचा मुलगा इनायतखान यास म्हटले की धन्य आहे तुझ्या मर्दुमकीची. हा मोठा विजय तुला मुबारक असो. अहमदशहा इतर सरदारांना म्हणाला की मी एक मातीचा पुतळा आहे. माझ्याने हा विजय मिळविणे शक्य होते काय? नाही. ही सर्व त्या परम पवित्र परमेश्वराचीच कृपा होय. मुसलमानांना काफरांच्या तावडीतून सोडवावे असा त्याचाच संकेत होता. त्याचे आभार मानणे हे मुसलमानांचेच काय, सर्वांचे कर्तव्य आहे. आता हिंदुस्थानातून शत्रू नाहीसा झाला आहे. तुम्ही आता आनंदाने राहून दौलतीचे हितचिंतन करा. मी अफगाणिस्तानला परत जातो. शुजाउद्दौल्याला मी बरोबर घेऊन जातो. त्याला मी आपला फर्जंद म्हटले आहे. रोहिले सरदारांनी एकमुखाने विनंती केली की आपण शुजाउद्दौल्याला येथे राहू द्यावे. तो काफरांच्या कारस्थानावर, आमच्याबरोबर राहून देखरेख ठेवील. यावर अहमदशहा गप्प बसला. त्याने दिल्लीचे तक्त शहाआलमला दिले. त्यावेळी शहाआलम बंगाल्यांत होता. म्हणून त्याच्याऐवजी त्याचा मुलगा जवानबख्त यास दिल्लीत राहून कारभार पाहण्यास अहमदशहाने सांगितले. वजिरी शुजाउद्दौल्याला आणि बक्षीगिरी नजीबुद्दौल्याला देण्यात आली. यानंतर त्याने ११७४ हिज्रीत कंधाराकडे प्रयाण केले.

## आयर्विनकृत 'फर्रुखाबादेचे बंगश नवाब'

(अहमद बंगशचे नाव मराठ्यांच्या इतिहासात प्रसिद्ध आहे. त्याने छत्रसालावर हल्ला केल्यामुळे बाजीराव पेशव्याला छत्रसालाच्या मदतीला जावे लागले. महंमद बंगशचा मुलगा अहमदखान हा पानीपतवर हजर होता. आयर्विनने फर्रुखाबादेचे बंगश नवाब यांची हकिकत लिहिली असून ती एशियाटिक सोसायटी ऑफ बंगालच्या इ. स. १८७८ व १८७९ च्या मुखपत्रांतून प्रसिद्ध झाली आहे. ही हकिकत लिहून काढताना आयर्विनने अनेक फारसी हस्तलिखितांचा उपयोग केला आहे. पानीपत संबंधी मजकूर, आयर्विनने थोडक्यात दिला आहे. पण त्यातून पानीपतसंबंधी लहान सहान का होईना काही गोष्टी आपल्याला कळून येतात. आयर्विन म्हणतो –

"अहमद शहा दुराणीने हिंदुस्थानावर सहाव्यांदा स्वारी केली त्यावेळी अहमदखान आणि इतर रोहिले सरदारांनी त्याची भेट घेतली. १८ जुलै १७६० रोजी ही भेट कोईल म्हणजे अलीगड येथे घडून आली. अहमदखानाने अहमदशहाच्या छावणीला रसदेचा पुरवठा केला. ही रसद येत असता मल्हारराव होळकराने यमुना ओलांडून अहमदखानाच्या सैन्यावर हल्ला केला आणि रसद लुटून यमुना परत ओलांडली. अफगाणांच्या सैन्याची एक तुकडी त्याच्याविरुद्ध पाठविण्यात आली. तिने लांब लांब मजला मारून होळकरांच्या सैन्यावर हल्ला केला आणि अनेकांची कत्तल करून त्याचे सैन्य पिटाळून लाविले.

अहमदशहाने यमुना ओलांडून अनूपशहर येथे आपली छावणी कायम केली. काही काळाने शुजाउद्दौल्याचे मन अहमदशहाला येऊन मिळण्याविषयी वळविण्यात आले. स्थानिक इतिहासकारांच्या मते हा योग हाफिज रहमतखान आणि अहमदखान बंगश यांच्या मध्यस्थीने जुळून आला. यानंतर थोड्याच काळात सदाशिवराव भाऊ हा प्रचंड सैन्य घेऊन दत्ताजीच्या वधाचा सूड घेण्याच्या उद्देशाने दक्षिणेतून आला. त्याच्या बरोबर जनकोजी, मल्हारराव होळकर, इब्राहीमखान गार्दी इत्यादी सरदार होते. २५ ऑक्टोबर १७६० रोजी अहमदशहा अब्दालीने अनूपशहरहून कूच केले. त्याने दिल्लीच्या उत्तरेस वीस मैलावर यमुना ओलांडली. अहमदखान बंगश (गालिबजंग) हा त्यावेळी आपल्या पाच हजार सैन्यासहित हजर होता. मराठ्यांनी पानीपत येथे छावणी केली. अहमदशहा अब्दालीने त्यांच्यासमोर आपला तळ ठोकला. दोन महिनेपर्यंत उभय पक्षाच्या चकमकी चालू होत्या. मध्ये एक दोनदा छोट्या लढाया झाल्या. मराठ्यांच्या छावणीत रसदेचा अगदीच तुटवडा झाला त्यामुळे त्यांना मोठी लढाई देणे भाग पडले.

असे म्हणतात की मराठ्यांची डोकी कापून आणणाऱ्याला अहमदशहाने प्रत्येक डोक्यामागे एक रुपया बक्षीस देऊ केले होते. अब्दालीच्या छावणीत रोज दहा हजार घोडेस्वार बाहेर पडत. भोवतालची खेडी उध्वस्त करणे आणि शत्रूची रसद तोडणे ही कामे त्यांना दिली होती. गवत कापणारे, मोलमजुरी करणारे किंवा मराठ्यांच्या छावणीतून बाहेर पडलेले कोणी दिसले की या स्वारांनी त्यांची डोकी कापून बादशहासमोर ठेवायची आणि बक्षिसी घ्यायची असा प्रकार चाले. हे ऐकून अहमदखान बंगश याने आपला चिटणीस मुशर्रफखान यास म्हटले की मराठ्यांना जे जिवंत पकडून आणतील त्यांना मी प्रत्येक माणसामागे दोन रुपये देईन. हे ऐकून दुराणी शिपाई माणसांना न मारता त्यांना कैद करून आणू लागले. अहमदखान शिपायांना प्रत्येक माणसामागे दोन रुपये देई. आणि रात्रीच्या वेळी कैद्यांना सोडून देई. मराठे परत आपल्या छावणीत जाऊन अहमदखानाची पोटभर स्तुती करीत. शुजाउद्दौला आणि नजीबखान यांनी सगळी हकीकत अहमदशहाला सांगितली. त्यादिवशीपासून अहमदशहा

अब्दाली हा अहमदखान बंगशवर फार नाराज झाला.

अब्दालीची नाराजी अधिक वाढावी म्हणून शुजाउद्दौला आणि नजीबखान यांनी बादशहाला सांगितले की अहमदखान बंगश हा मोगल साम्राज्याचा अमीरुल् उमरा आणि बक्षी म्हणवितो पण त्याने अगदीच तुटपुंजे सैन्य आणिले आहे. अब्दाली काहीच बोलला नाही, पण वजीर शहावलीखान हा बंगश जमातीचा होता. त्याने अहमदखानाला बोलावू पाठविले. तो आल्यावर वजिराने त्याला आपल्या जवळ बसवून विचारले, ''गालिब जंग, तू हिंदुस्थानातील प्रख्यात उमरावापैकी आहेस. असे असूनही तू अगदी थोडे सैन्य आणिले आहेस. याचे कारण काय'' शुजाउद्दौला आणि नजीबखान यांनी रात्री आपली चहाडी केली हे अहमदखानाला या पूर्वीच जंगबाजखान बंगश याजकडून कळले होते. त्याने शहावलीखानाला म्हटले की मी आपल्या बख्शीला बरेच सैन्य बरोबर देऊन फर्रुखाबादेचे रक्षण करण्याकरिता मागे ठेविले आहे. कारण गोविंदपंत हा तीन हजार सैन्यासहित यमुना ओलांडून आला असून त्याने त्या नदीच्या काठावर तळ दिला आहे. येथे माझ्याबरोबर असलेले सैन्य लहान असले तरी प्रभावी आहे. या सैन्याच्या बळावर यापूर्वी मी सफदरजंग, सूरजमल, हिंमतसिंग आदींचा पराजय केला आहे. त्याचवेळी मी दिल्लीवर चाल करून जाऊ शकलो असतो पण मोगल बादशहाची अदब राखावी म्हणून मी तसे केले नाही. शहावलीखानाने म्हटले की ही हकिकत यापूर्वी मी काबुलमधे असताना ऐकली आहे. अहमदखान म्हणाला की माझे सैन्य लहान असले तरी त्याचे पाणी युद्धाच्या दिवशी दिसून येईल.

अहमदखानच्या सैन्याचा तळ इब्राहीमखान गार्दीच्या मोर्च्यासमोर होता. त्याच्या हाताखाली बारा हजार कवायती पायदळ होते. एके रात्री इब्राहीमखानाने हुकूम दिला की अहमदखानाचा मोर्चा (ब्याहरी) हा लहान आहे. त्याच्यावर हल्ला करावा. रात्रीच्या शेवटच्या प्रहरी इब्राहीमखानाच्या सैन्याने अहमदखानाच्या मोर्च्यांवर छापा घालण्याचा प्रयत्न केला. अहमदखानाच्या तोफा सज्ज होत्या. त्यांच्या रक्षणार्थ त्यांच्यावर लोखंडी आवरणे (चादरे) घालण्यात आली होती. दिवस थंडीचे असल्यामुळे ठिकठिकाणी शेकोट्या पेटल्या होत्या. आणि रोहिले आणि बाजार बुणग्याचे लोक शेकत बसले होते. घोड्यांच्या टापांचा आवाज त्यांनी ऐकला आणि त्यांनी मराठे आले म्हणून ओरडा आरडा केला. आणि मग त्यांनी शेकोट्यांतून जळती लाकडे उचलली आणि तोफांत घातली. तोफा धडाधड चालू लागल्या. शत्रूचे अनेक लोक मारले गेले. बाकीचे पळून गेले. अहमदखानाच्या बाजूने कुणालाही इजा झाली नाही. अहमदखानाची झोपमोडही झाली नाही. दुसऱ्या दिवशी पहाटे अब्दाली हल्ल्याचे ठिकाण पाहण्यास गेला. अहमदखान त्याला भेटला. त्याला पाहून अब्दालीने म्हटले की तुमच्या शौर्याच्या गोष्टी ऐकत होतो पण आज प्रत्यक्ष त्याचा अनुभव आला. असे म्हणून अब्दालीने आपल्या पागोट्यांतून जिगा (सुवर्णालंकार) काढला आणि अहमदखानाला भेट म्हणून दिला. या नंतर अहमदखानाचे शत्रू लाजून गप्प बसले.

लढाईच्या दिवशी अहमदखानाचे सैन्य लहान म्हणून, त्याच्याकडे बायकामुलांच्या रक्षणाचे काम देण्यात आले. अहमदखानाला या गोष्टीचा अतिशय राग आला. ही कामे खोजांची होत. आपण अघाडीवर लढू असे त्याने बजाविले. मग अब्दालीने त्याला सैन्याच्या उजव्या फळीकडे नेमले. याच बाजूने मराठ्यांनी हल्ल्याला प्रारंभ केला. या निकराच्या हल्ल्यात इब्राहीमखान जखमी झाला. पण मराठ्यांचा जोर भारी झाला. या कठीण परिस्थितीत अहमदखानाने आपला दारोगा मुशर्रिफखान यास अब्दालीकडे पाठवून मदतीची मागणी केली. हा निरोप अब्दालीला पोहोचला तेव्हा शुजाउद्दौला आणि नजीबखानाने त्याला म्हटले की अहमदखानाशी लढत असलेल्या शत्रूचे बळ फार नाही. उलट हाफिज रहमत खानाचा मुलगा इनायतखान हा फार पेंचात आहे. त्याला मदत पाठविली पाहिजे.

मुशर्रफखानाने अहमदखानाला येऊन सांगितले की अब्दाली काही बोलत नाही. मग अहमदखानाने पुन्हा तातडीचा निरोप देऊन त्याला बादशहाकडे पाठविले. मग अब्दालीने दोन दळे (डिविजन्स) पाठविली. सैन्याची उजवी फळी मजबूत झाली. आणि मराठ्यांना हळूहळू मागे रेटण्यात आले. विश्वासराव मारला गेला, सदाशिवराव भाऊ नाहीसा झाला आणि मराठी सैन्यात एकच गोंधळ उडाला. दुपारी दोन वाजेपर्यंत अब्दालीने लढाई जिंकली.

## तारीखे अवध

(अवध प्रांताचा इतिहास हा ग्रंथ नज्मुलगनी यांनी उर्दू भाषेत चार खंडांत लिहून इ. स. १९१९ मधे प्रसिद्ध केला. या ग्रंथाच्या रचनेत त्याने अनेक फारसी ग्रंथांचा उपयोग करून घेतला आहे. ग्रंथाच्या दुसऱ्या खंडात पान २६ पासून ५४ पर्यंत त्याने पानीपतची हकिकत दिली आहे. यातील माहिती त्याने सेयारुल्मुताखरीन, खजाने आमिरा, काशीराज, मिराते अहमदी, या ग्रंथातून घेतली आहे. त्यामुळे त्यात नवीन असे काही आढळत नाही. पण दोन गोष्टी आपल्याला नज्मुलगनीकडून कळतात. एक म्हणजे त्याने शुजाउद्दौल्याने सूरजमलला लिहिलेले अस्सल पत्र छापले आहे.)

## शुजाउद्दौलाचे सूरजमलला पत्र

''कुंवर साहेब बिरादर मेहेरबान सलामत''

आपल्या भेटीची ओढ लागली आहे. लिहिण्यात येत आहे की या अवधीत आपल्याकडून आनंद वृद्धिंगत करणारे पत्र आले नाही. आपले कुशल जाणण्याची उत्कंठा आहे. आमचा आणि आपला स्नेह दिवसेंदिवस वाढत जात आहे. पण पत्रव्यवहार रूपाने तो प्रकट होत नाही. याची आम्हाला स्नेहपूर्वक तकरार आहे.

अहमदशहा काबुलहून निघून आपल्या सैन्यासहित कुंजपुऱ्याजवळ आला आणि रोहिले सरदार त्याची चाकरी बजावण्यास त्याच्याकडे रवाना झाले हे वकिलांच्या लिहिण्यापुसण्यावरून तुम्हाला कळले आहे. याच सुमारास आम्हालाही अहमदशहाने येण्यासंबंधी पाचारण केले. भाऊ दक्षिणेतून प्रचंड फौज घेऊन येत आहे याची बातमी होती. सगळ्या सरदारांनी अहमदशहाशी निष्ठेने वागण्यास स्वत:ला बांधून घेतले आणि भाऊविरुद्ध लढण्यास ते एक दिलाने सज्ज झाले आहेत. भाऊच्या उत्तर हिंदुस्थानात येण्याने गडबड उडाली आहे. ती तोडण्याचे काम सगळे सरदार एक झाल्याशिवाय घडून येणे अशक्य होय. जो कोणी यावेळी परस्परसंघटनेपासून स्वत:ला टाळील त्याचा दुर्लौकिक होईल. म्हणून आपल्याला लिहिण्यात येत आहे की आपण हिंदुस्थानातील उमदे सरदार आहात. आपण काय बेत योजिला आहे. जर आपण भाऊला मिळाला आहात तर प्रथम वेगळे निघा. कारण अधिकार आणि शक्ति यामुळे त्याला गर्व चढला असून तो कोणालाही ओळखेनासा झाला आहे. आज उद्या त्याचा परिणाम विपरीत होईल. त्याच्यापासून दूर होणेच श्रेयस्कर आहे. हिंदुस्थानातील इतर सरदारांना येऊन मिळणे योग्य आहे. आपण आपल्या सेवाचाकरीच्या आश्वासनाचे विनंतीपत्र अहमदशहाला पाठवावे.

मी येथे आहे. इन्शाल्ला, आपल्या सच्च्या निष्ठेची हकिकत मी अहमदशहांना अर्ज करीन. त्यांच्याकडून आपल्या करिता कृपापत्र आणि करारनामा संपादन करीन. आपले राज्य आणि अधिकार आपल्याला वंशपरंपरा चालविण्यात येतील. अशा प्रकारचा करारनामा आपल्याकडे पाठविण्यात येईल. तुम्ही आपला देश सोडून अहमदशहाच्या सेवेत आलात तरच हा करार दृढ राहील असे नाही. आपण फक्त हेच करावे की आपल्या जागी

स्वस्थ बसून भवितव्यात काय घडून येईल हे पहात राहावे. नाहीतर कठीण जाईल. आपण अनुभवी, शहाणे आणि दूरदर्शी आहात. अधिक काय लिहिणे.''

(५१) नज्मुलानी म्हणतो -

मल्हारराव होळकराचा मोर्चा नजीबखानाच्या समोर होता. नजीबखानाच्या इशाऱ्याने तो कर्नालच्या बाजूने पळून गेला. त्या दोघांत असे ठरले होते की मराठ्यांचा जय झाला तर नजीबखानाला उपसर्ग पोहोचू नये. आणि अफगाणांचा जय झाला तर मल्हाररावाला उपसर्ग होऊ नये. शिवप्रसादाने आपल्या फरहबख्श या ग्रंथांत आणि इतरांनीही असेच नमूद करून ठेविले आहे.

(शिवप्रसादचे म्हणणे खरे असले पाहिजे कारण तो या युद्धात रामपूरचा नवाब फैजुल्लाखान याच्या बरोबर हजर होता.

या ग्रंथांत वरील दोनच गोष्टी नमूद करण्यासारख्या आहेत. बाकीचा मजकूर वर सांगितल्याप्रमाणे काशिराज, इमादुस्सादत, खजाने आमिरा इत्यादी ग्रंथावरून देण्यात आला आहे.)

## हाफिज रहमतखान चरित्र

(बरेलीचे विद्वान साहित्यिक सय्यद अल्ताफ अली यांनी इ. स. १९३३ मधे उर्दू भाषेत हाफिज रहमतखान याचे चरित्र लिहून प्रसिद्ध केले आहे. या कामात त्यांनी बरीच फारसी साधने हाताळली आहेत. रोहिल खंडांत प्रसिद्ध असलेल्या आख्यायिका अभ्यासल्या, आणि हाफिज रहमत खानाच्या वंशजांकडूनही माहिती गोळा केली आहे. हाफिज रहमतखानाचा मुलगा मिस्तजाबखान याने आपल्या बापाचे चरित्र गुलिस्ताने रहमत हे लिहिले. हाफिज रहमतखानाचा एक मुलगा हाफिज महंमद यारखान याचा मुलगा सादत यारखान यानेही गुले रहमत या नावाने हाफिज रहमतखानाचे चरित्र लिहिले आहे. हाफिज रहमतखानाचा एक पणतू, मुहब्बतखानाचा नातू आणि मूसाखान याचा मुलगा सुलेमानखान याने तारीखे सुलेमानी या नावाने अफगाणिस्तानचा इतिहास लिहिला आहे.

ही आणि इतर साधने सय्यद अल्ताफ अलीने हाताळली आहेत. हाफिज रहमतखान आणि त्याचा मोठा मुलगा इनायतखान हे दोघेही पानिपतावर लढले हे सर्वश्रुत आहे. अल्ताफ अलीच्या ग्रंथांतील (पान ९३-१०८) पानीपत वरील मजकूर खाली दिला आहे.)

दिल्लीची व्यवस्था केल्यानंतर मराठे कुंजपुऱ्याकडे वळले. अहमदशहा अब्दालीतर्फे तेथे अब्दुस्समदखान आणि मोमिनखान हे कुंजपुऱ्याच्या ठाण्यावर होते. ते अहमदशहाला रसदेचा पुरवठा करीत. कुंजपुऱ्याचा जमीनदार नजाबतखान हा होता. त्याची मराठ्यांशी अंतस्थ संधाने होती. त्याने अब्दुस्समद खानाला मराठ्यांशी लढण्याविषयी प्रवृत्त केले. आणि तो स्वत: कुंजपुऱ्याच्या किल्ल्यात बंदोबस्ताने राहिला. अब्दुस्समदखानापाशी थोडी फौज होती. पण नजाबत खानाच्या चिथावणीने त्याने मराठ्यांवर हल्ला केला. पण मराठ्यांच्या प्रचंड फौजेपुढे त्याला माघार घ्यावी लागली. तो लढत झगडत किल्ल्याच्या दरवाजापाशी आला. नजाबत खानाने दरवाजे बंद केले. आणि तटावरून तो तोफा सोडू लागला. अब्दुस्समदखानाला मागे वळून फिरून मराठ्यांशी लढावे लागले. तो या लढाईत शौर्याने लढत असता आपल्या साथीदाराबरोबर मारला गेला.

ही बातमी अहमदशहाला कळताच तो अतिशय संतप्त झाला. त्याने हिंदुस्थानी सरदारांना आपापल्या फौजा बोलावून आणण्याचा हुकूम दिला. थोड्याच काळात साऱ्या अमीर उमरावांच्या फौजा लष्करात दाखल झाल्या.

यानंतर अहमदशहाने मराठ्यांच्या फौजेच्या दिशेने कूच केले. (सादतयार खान कृत गुले रहमत) यावेळी अहमदशहाची अफगाण आणि हिंदुस्थानी फौज (रोहिले आणि इतर) मिळून एक लक्ष स्वार आणि पायदळ यांनी युक्त होती. त्याचा तपशील असा. अहमदशहाची अफगाण फौज तीस हजार, तितकेच सैन्य हाफिज रहमतखान आणि त्याचे रिसालदार यांचे. नजीबखानापाशी पंधरा हजार स्वार आणि पायदळ, शुजाउद्दौल्याचे वीस हजार सैन्य आणि अहमदखान बंगश याचे सहा हजार सैन्य.

हे सैन्य घेऊन अहमदशहा यमुनेच्या काठी आला. त्याने हाफिज रहमतखान, अहमदखान बंगश, शुजाउद्दौला आणि नजीबखान यास नदीवर तीन पूल बांधण्याची आज्ञा केली. पूल तयार झाल्यावर सारी फौज विनायास नदी पार झाली. अहमदशहा नदी उतरून आला ही बातमी भाऊ आणि इतर मराठे यांना लागली. त्यांची फौज तीन लाख स्वार आणि पायदळ यांनी युक्त होती. हे सैन्य कुंजपुऱ्याहून निघून पानिपतास आले (गुले रहमत). तारीखे नजीबाबाद याचा कर्ता अकबर शहाखान म्हणतो की, मराठ्यांची फौज चार आणि पाच लाखाच्यामधे असावी. पानीपत येथे दंतकथा रूढ आहे ती अशी की पानिपतावर नऊ लाख मराठी भाले होते. मराठ्यांनी पानीपत पाठीशी घेऊन लढण्याची तयारी सुरू केली. त्याचप्रमाणे मराठ्यांच्या छावणीपासून काही कोसांवर अहमदशहाने आपली छावणी स्थापन केली. पहिल्या दिवसापासून उभय दळाच्या आघाडीच्या पथकाच्या चकमकी झडू लागल्या. त्यात अहमदशहाच्या पथकांना जय मिळू लागला. हे पाहून भाऊला वाटले की असेच चालू राहिले तर आपला पराजय होईल. त्यापेक्षा मोठी लढाई लांबणीवर टाकून प्रथम अहमदशहाची रसद तोडावी. मराठ्यांनी आपल्या छावणी भोवती पन्नास फूट रुंद आणि बारा फूट खोल खंदक खणला, आणि इब्राहिमखानाला त्यांच्या रक्षणावर नेमले. नंतर चार पाच निवडक मराठे सरदार रसद तोडण्याच्या कामावर नेमण्यात आले. मराठ्यांची छावणी पाहून अहमदशहानेही आपल्या छावणीभोवती, जंगलातील झाडे तोडून त्यांचा तट उभारला. अहमदशहाने रोहिले सरदारांना आज्ञा केली की तुम्ही मराठ्यांच्या बरोबर चकमकी चालू ठेवाव्या. त्याने काही अफगाण सरदारांना आपल्या सैन्याला रसदेचा पुरवठा करणे आणि मराठ्यांची रसद तोडणे या कामावर नेमले. याचा परिणाम असा झाला की मराठ्यांच्या लष्करात धान्य पोहोचणे कठीण होऊन बसले. आलासिंह जाट हा पतियाळा भागातून धान्य पाठवीत असे. पण दुराणींनी त्या भागात संचार करून तिकडून येणारी रसद पण बंद केली.

मराठ्यांची खात्री झाली की अहमदशहाच्या छावणीत रोहिलखंडातून रसदेचा पुरवठा होत आहे. भाऊने गोविंदपंत बुंदेले यास लिहिले की तुम्ही रसद बंद करण्याचा प्रयत्न करा. आज्ञेप्रमाणे गोविंदपंत हा पंचवीस हजाराची फौज घेऊन यमुनेच्या काठावर पोहोचला. आणि त्याने रसदेच्या सर्व वाटा रोखून घरल्या. अहमदशहाच्या छावणीत रसदेची इतकी टंचाई झाली की, धान्याची धारण रुपायाला एक शेरावर आली. हे झाल्यानंतर आपण रोहिलखंडावर हल्ला करावा असे गोविंदपंताने ठरविले. (गुले रहमत).

या सुमारास करीमदादखान आणि वजीर शहावलीखानाचा पुतण्या हाजी अताईखान हे अफगाणिस्तानातून ताज्या दमाची सहा हजार फौज घेऊन अहमदशहाला मिळाले होते. त्यांना अहमदशहाने हुकूम केला की गोविंदपंताचे डोके कापून हजर करावे. काही हिंदुस्थानी (रोहिले) त्यांच्या मार्गदर्शनासाठी दिमतीस देण्यात आले. अताईखान आणि करीमदादखान हे तीन प्रहरा छावणीतून तडक निघाले. गाजीनगर छावणीपासून चाळीस कोसावर होते. अताईखानाच्या फौजेने प्रथम शहादरा येथे दिल्लीचा किल्लेदार शंकरराव याचा नायब होता, त्याला ठार मारले. नंतर ते पहाटे जलालाबादेस पोहोचले. गोविंदपंताचा तळ त्याठिकाणी होता.

उभय सरदारांनी मराठ्यांचा धुव्वा उडविला आणि गोविंदपंताचे डोके कापून घेऊन ते अहमदशहाच्या छावणीत परत आले. चोवीस तासात त्यांनी ऐंशी कोसाची मजल मारली.

रसद मोकळी झाल्यावर अहमदशहाने विचार केला की लढाई जितकी लांबणीवर टाकावी तितकी यशाची खात्री अधिक राहील. लढाईला जसजसा विलंब लागू लागला तसतसे मराठ्यांचे हाल होऊ लागले. रसद तर बंद झालीच होती. त्यांच्या छावणीत घाण आणि दुर्गंध होऊन रोगराई होऊ लागली. भाऊने शुजाउद्दौल्याच्या मार्फतीने अहमदशहाबरोबर तडजोड करण्याचे अनेक प्रयत्न केले. प्रत्येक वेळेस नजीबखान आड आला. आणि तहास कबूल झाला नाही. तो म्हणे की अहमदशहा निघून गेल्यावर मराठे आम्हाला नेस्तनाबूद करतील. आता त्यांच्याशी लढून त्यांचा पराजय करणे अगर लढताना आपण मरून जाणे याशिवाय दुसरा मार्ग नाही. (अकबरशहाखानकृत नजीबाबादचा इतिहास.)

अहमदशहाने खंदकासमोर एक तांबडा तंबू उभा केला होता. तो पहाटेची नमाज तेथेच पढे. आणि रात्रीचे जेवणही तेथेच घेई. तो दिवसभर घोड्यावर बसून पाहणी करीत असे. तो रोज पन्नास साठ मैलाची चक्कर मारी.

रात्री शत्रूच्या छावणी भोवती पाच हजार दळ सारखे घिरट्या घालीत असे. अहमदशहाही रात्री लष्कराभोवती फिरत असे.

हाफिज रहमतखानाचा मुलगा इनायतखान हा सोळा वर्षाचा होता. त्याला हाफिज रहमतखानाने बरेलीस ठेविले होते. पानीपत वरील घटना त्याच्या कानी पडू लागल्या तसा तो बेचैन झाला. आपणही त्या युद्धात भाग घ्यावा या उद्देशाने त्याचे कारभारी पहाडसिंग आणि फतेखान खानसामा हे मना करीत असूनही तो दोनशे स्वारासहित बरेलीहून निघून पानीपतला पोहोचला. हाफिज रहमतखानाने वरवर कानउघाडणी केली पण मुलाच्या धडाडीने त्याला आतून आनंद झाला. दुसऱ्या दिवशी हाफिजरहमतने त्याला अहमदशहाकडे नेले. अहमदशहाने विचारले की इनायतखान, तू आपल्या बापाला भेटण्याकरिता आला आहेस का अफगाणांची अब्रू वाचविण्याकरिता. यावर इनायतखानाने उत्तर दिले की बापाला भेटणे हा उद्देश होता तरी माझी मुख्य इच्छा अफगाणांचे मानरक्षण करणे हीच होती. (गुलिस्ताने रहमत).

अहमदशहाला हे ऐकून संतोष वाटला. त्याने इनायतखानाला खिलतीची वस्त्रे, तलवार आणि घोडा ही बहाल केली. आणि रोज दरबारात हजर राहण्याचा हुकूम केला.

या सुमारास अहमदशहा पुढे होऊन लढाई करील अशी मराठ्यांना आशा राहिली नाही. त्याची प्रतीक्षा पाहणे त्यांनी सोडून दिले. त्यांनी २९ नोव्हेंबर आणि २३ डिसेंबर रोजी वजीर शहावलीखान याच्यावर निकराचा हल्ला केला. एका हल्ल्यात तर शहावलीखान मराठ्यांच्या तावडीत सापडण्याचा प्रसंग आला होता. पण त्याच्या आणि नजीबखानाच्या शौर्याने तो प्रसंग टळला. आणि मराठ्यांचा पराजय झाला. एके रात्री इब्राहीमखानाचा भाऊ फत्तेखान याने हाफिज रहमतखानाच्या मोर्च्यावर छापा घातला. पण रोहिले वेळीच सावध झाले. विशेष नुकसान झाले नाही. रात्रभर मारामारी चालू होती. शेवटी मराठ्यांना पराजय पावून परत जावे लागले. मराठ्यांनी इतकी आक्रमणे केली. पण आपण होऊन लढाई न करण्याचे धोरण अहमदशहाने बदलले नाही.

पण तरुण रक्तांना इतका धीर कुठला.

एके दिवशी इनायतखानाने अहमदशहा किंवा हाफिज रहमतखान यांची परवानगी न घेता आणि नजीबखानाचे निवडक सैन्य घेऊन मराठ्यांच्या छावणीवर हल्ला केला. मराठे गाफिल होते. रोहिले खंदक पार करून आले.

कित्येक मराठे मारले गेले. रोहिले तोफखान्यापर्यंत पोहोचले आणि तेथे पोहोचून ते आनंदाने डफ वाजवून गाणी म्हणू लागले. ऐन याच वेळी चाळीस पन्नास हजार मराठे त्यांच्यावर तुटून पडले. निकराची लढाई झाली. प्रत्येक रोहिल्याने दहा दहा माणसे मारली. पण मराठे बहुसंख्य होते. रोहिल्यांचा पराजय झाला. फक्त पाचशे रोहिले जखमांनी भरलेले असे आपल्या छावणीत परत आले. अशा स्थितीतही ते आनंदाने गात येत होते. शुजाउद्दौल्याने त्यांना पाहून त्यांच्या धैर्याची प्रशंसा केली (सुलेमान खानकृत तारीखे अफगाणिस्तान) यानंतर थोड्या दिवसांनी हाफिज रहमतखानाची आई वारल्याचे वृत्त आले.

हाफिज रहमतखान स्वत: भयंकर आजारी पडला. युद्धात तो भाग घेऊ शकला नाही. पण त्याच्या जागी इनायतखान, दूंदेखान आणि फैजुल्लाखान हे लढले. (गुलस्ताने रहमत).

सदाशिवराव भाऊने सैन्याची सगळी तयारी करून दुराणीच्या फौजेच्या दिशेने कूच करण्याची आज्ञा केली. त्याने इब्राहीमखान गार्दीचा तोफखाना समोर ठेविला. त्याबरोबर जवळजवळ सगळे पायदळ ठेविण्यात आले. इतर सरदारांना त्याने उजव्या, डाव्या आणि मध्य भागात ठेविले. इब्राहीमखानाने प्रथम हाफिज रहमतखानाच्या मोर्च्यावर हल्ला केला.

शुजाउद्दौला आणि नजीबखान हे मल्हारराव होळकर आणि शिंद्यांच्या समोर होते. आणि हाफिज रहमतखान आणि अहमदखान बंगश हे इब्राहीमखानाच्या समोर होते. इब्राहीमखानाने सगळ्या तोफांची सरबत्ती हाफिज रहमतखानाच्या सैन्यावर सुरू केली. हाफिज रहमतखानाच्या तर्फे इनायतखान, दूंदेखान आणि फैजुल्लाखान वगैरे रोहिले सरदार प्रतिकार करीत होते. इब्राहीमखानाच्या तोफांच्यापर्यंत पोहोचण्याची त्यांची धडपड होती. म्हणून कित्येक लोक मृत आणि जखमी झाले तरी त्याची पर्वा न करता रोहिले रणावर ठाण मांडून राहिले. इब्राहीमखान हा गोलंदाजीत अद्वितीय होता. तोफांचा भडिमार करून तो चाल करून जात होता. रोहिल्यांना त्याने क्षणाचीही उसंत दिली नाही. त्याच्या तोफांनी रोहिलेखंडाचे हजारो रोहिले मृत अगर जखमी झाले. आणि अशा भयंकर स्थितीत उरलेले मागे हटू लागले. अहमदखान बंगश मागे उभा होता. त्याला ते जाऊन मिळाले. अहमदखानाने त्यांची निर्भत्सना केली आणि त्यांना परत फिरवून तो इनायतखान अघाडीवर लढत होता त्याला जाऊन मिळाला. याच सुमारास इनायतखानाने आपली माणसे घेऊन मराठ्यांच्यावर निकराचा हल्ला केला (गुले रहमत).

या माऱ्यापुढे मराठे मागे हटले. आणि रोहिल्यांनी तोफा ताब्यात घेतल्या आणि त्या शत्रूवर डागण्यास सुरवात केली. भाऊ आणि इतर सरदार इब्राहीमखानाच्या मदतीला धावले. आणि ऐंशी हजार स्वारांनिशी अफगाणांवर तुटून पडले. हा हल्ला अत्यंत निकराचा होता. अफगाणांनी मर्दुमकी गाजविली. हजारो मराठे स्वारांना त्यांनी घोड्यावरून खाली पाडून मारले. तरी पण त्यांना हटावे लागले. अशा परिस्थितीतही इनायतखान, दूंदेखान, फैजुल्लाखान, शेख कबीर, सय्यद मासूमशहा वगैरे सरदार निर्धाराने ठाण मांडून लढू लागले. या प्रसंगी अहमदखान बंगशने इकडून तिकडून पांगलेली माणसे गोळा करून इनायतखानाची मदत केली. यामुळे त्याला धीर येऊन सारेजण निकराने लढू लागले. मैदानावर अल्लाहु अकबर आणि इनायतखान जिंदाबादच्या आरोळ्यांनी वातावरण दणाणून गेले. पण शत्रु बहुसंख्य त्यामुळे रोहिले मोठे पेचात सापडले.

यावेळी अहमदशहा एका उंच टेकडीवर उभा राहून लढाई पाहात होता. रोहिल्यांची दुर्दशा त्याच्या दृष्टीस पडली. त्याने हाजी अताईखानाला ताबडतोब त्यांच्या मदतीस पाठविले.

तो सहा हजार सैन्य घेऊन मराठे आणि रोहिले यांच्यामध्ये आला. त्यांनी प्रथम बंदुकी चालविल्या. त्यामुळे

शत्रु सैन्यात खळबळ उडाली. नंतर तलवारींनी त्यांनी मारामारी करण्यात सुरुवात केली. या हाणामारीत हाजी अताईखान मारला गेला. त्यानंतर अहमदशहाने शहापसंदखानाबरोबर सहा हजार सैन्य देऊन पाठविले. तोही शौर्याने लढत असता मारला गेला.

याच सुमारास मल्हारराव होळकर आणि महादजी शिंदे यांनी शुजाउद्दौला आणि नजीबखान यांच्या मोर्च्यावर हल्ला केला. नजीबखानाने निर्धाराने लढून सुरवातीलाच मल्हाररावास पळवून लाविले. आणि महादजी शिंदे बराच वेळ लढल्यानंतर रणांगणांतून पळून गेला. भाऊ आणि विश्वासराव यांनी ही परिस्थिती पाहताच त्या बाजूने वीस हजार फौज हल्ला करण्यास पाठविली. या वेळी नजीबुद्दौला आणि मराठे यांत फार शर्थीची लढाई झाली. धुळीने सूर्य दिसेनासा झाला. जमिनीवर रक्ताचे पाट वाहात होते. मोठ्या रक्तपातानंतर मराठे मागे हटले. नजीबाबादच्या पठाणांनी दहा कोसापर्यंत त्यांचा पाठलाग केला.

(अकबर शहाखान कृत नजीबाबादचा इतिहास.)

इकडे हाजी अताईखान आणि शहापसंदखानाच्या सैन्याने मराठ्यांचे तंबू आणि इतर सामान जाळून टाकले. भाऊ आणि इतर सरदार या बातमीने चिंतित झाले. याच सुमारास अहमदशहाने आपल्या गुलामांच्या पल्टणीला आज्ञा केली की मराठे सरदार जेथे एकत्र झाले आहेत तेथे जाऊन बंदुकीच्या फैरी कराव्या आणि मग तलवारी उपसून त्यांच्यावर हल्ला करावा. त्याप्रमाणे गुलामांच्या पलटणीने मराठे सरदार जमले होते त्याठिकाणी हल्ला केला. परमेश्वरी कृपेने आणि अहमदशहाच्या सुदैवाने जवळजवळ सगळे सरदार बंदुकीच्या गोळ्यांनी मारले गेले.

हाफिज रहमतखानाचा पणतू सुलेमानखान याने तारीखे अफगाणिस्तान उर्फ नकशे सुलेमानी आणि तारीखे सुलेमानी या नावाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यात तो म्हणतो की भाऊ इनायतखानाच्या हातून मारला गेला. तो म्हणतो –

''लढत लढत इनायतखान भाऊ उभा होता त्याजागी पोहोचला. भाऊने त्याच्यावर भाला फेकला. इनायतखानाने तो चुकविला आणि सगळी शक्ति पणास लावून त्याने भाऊच्या हातातून बरछी इतक्या जोराने ओढली की भाऊ घोड्यावरून खाली आला. इनायतखानाने भाऊचे डोके कापून घेतले.

**अज शमूशेरे इनायतखां दरांजंग**
**अजल गुफ्ता सरे भाऊ तुरा शुद**

''त्या युद्धात इनायतखानाच्या तल्वारीप्रत मृत्यु म्हणाला की भाऊचे डोके तुझे आहे. नंतर इनायतखानाने भाऊचे डोके अहमदशहाला नजर केले.''

एकीकडे अहमदशहाची अफगाण फौज आणि दुसरीकडे रोहिलखंडचे रोहिले यांनी मराठ्यांचा प्रचंड संहार चालविला. प्रेतांच्या असंख्य राशी लागल्या. मराठे पळत आहेत हे पाहून अहमदशहाने हुकूम केला की दिल्लीपर्यंत त्यांचा पाठलाग करावा आणि मराठे सापडतील तेथे मारावे.

हाफिज रहमतखान आजारी होता. तो पालखीत बसून आला आणि फैजुल्लाखान, इनायतखान इत्यादींना सुखरूप पाहून संतुष्ट झाला. इनायतखानाच्या अंगावर जखमा झाल्या होत्या. तलवार मुठीत घट्ट धरली होती. त्यामुळे हाताला सूज आली होती. अफगाणांनी मराठ्यांचा दिल्लीपर्यंत पाठलाग केला. त्या तीन दिवसात दोन लाखापेक्षा जास्त मराठे मारले गेले. या युद्धात एक पाव हिस्सा लोक जीव बचावून गेले असतील. दोन तीन सरदारात मल्हारराव होळकर आणि महादजी शिंदे हे होते. जनकोजीचा शेवट असा झाला की युद्धातून तो निसटला.

एका चपळ घोड्यावर बसून तो चालला होता त्याचा शिरपेच आणि उंची वस्त्रालंकार पाहून इनायतखानाचा एक रोहिला सहकारी त्याच्या मागे लागला. तीस कोस पर्यंत रोहिल्याने जनकोजीचा पाठलाग केला. शेवटी जनकोजी पर्यंत पोहोचून रोहिल्याने तलवारीच्या वाराने त्याचा घोडा जायबंदी केला. जनकोजी घोड्यावरून खाली आला. रोहिल्याने त्याचे डोके कापले. आणि त्याच्या अंगावरची वस्त्रे अलंकार, शिरपेच इत्यादी घेऊन तो परत आला. कर्नालच्या जवळ त्याने शिरपेच एके ठिकाणी शेणात लपवून ठेविला. जनकोजीचे डोके त्याने इनायतखानाला आणून दिले. इनायतखानाने म्हटले –

"खान, जनकोचे डोके तू घेऊन आलास. पण शिरपेच कोण घेऊन गेला." यावर तो म्हणाला की शिरपेच शेणात लपविला आहे. तुम्ही तो घ्याल आणि मला परत देणार नाही. इनायतखानाने म्हटले की नाही. तू शिरपेच (कुला) घेऊन ये. मी तुला त्याच्या मोबदल्यात आश्रफ्या देतो. रोहिल्याने शिरपेच आणून इनायतखानाला दिला. त्याने त्याला पाचशे अश्रफ्या दिल्या. त्यानंतर इनायतखानाने जनकोजीचे डोके अहमदशहाला नजर केले. तेव्हा त्याची पाठ थापटून अहमदशहाने म्हटले.

ई फतह बनामे तू निहादम मुबारक बाद. आफरीन बर तू व रहमते खुदाबर पिद्रे तू.

या जयाबद्दल तुझे अभिनंदन. धन्य आहे तुझी. तुझ्या बापावर परमेश्वराची कृपा राहो. (तारीखे सुलेमानी).

'जामे जहां नुमा' या ग्रंथात नमूद आहे की युद्धांतून पळालेले मराठे इतके नागविले गेले होते की त्यांपैकी वीस हजार माणसे भीक मागत हिंडू लागली. सूरजमलने त्यांना एकेक घोंगडी आणि दोन रुपये देऊन दक्षिणेकडे पाठविले. शुजाउद्दौल्याने बारा हजार मराठ्यांना प्रत्येकी दोन रुपये देऊन काल्पीस पाठविले.

इब्राहीमखान गार्दीच्या संबंधी अहमदशहाला कळले की तो रोहिल्यांच्या छावणीत आहे. विचारपूस करता प्रथम हाफिज रहमतखानाने इन्कार केला. पण शपथ घातल्यावर त्याला कबूल करावे लागले. इब्राहीमखानाला अहमदशहाकडे पाठविण्यात आले. अहमदशहाने अनेक वेळा इब्राहीमखानाला आपल्याला येऊन मिळण्याविषयी निरोप पाठविला होता. पण आपण मराठ्यांशी निमकहरामी करणार नाही असे सांगून त्याने अहमदशहाचा निरोप धुडकावून लाविला होता. त्यामुळे त्याचा वध करण्यात आला. त्याच्या मुलाला हाफिज रहमतखानाने छावणीतून बंधमुक्त करून गुपचुप पाठवून दिले. (गुले रहमत)

## मीर कवीच्या आत्मचरित्रातील 'पानीपत'

(उर्दू कविश्रेष्ठ मीर तकी मीर याचा जन्म १७२२ साली आग्रा येथे झाला. मीरचे घराणे मूळ अरबस्थानातील. त्याचे पूर्वज गुजरातेत अहमदाबाद येथे स्थायिक झाले. त्याचा आजा आग्र्यास गेला. मीरचा बाप हा एक नामांकित सूफी होता. मीरच्या ११ व्या वर्षी तो मरण पावला व मीरला दिल्लीस जाणे भाग पडले. वयाच्या ६० व्या वर्षापर्यंत मीर दिल्लीस राहिला. दिल्ली अनेकदा उध्वस्त झालेली त्याने पाहिली. १७८२ साली तो लखनौच्या नवाबाच्या आश्रयास गेला. मग तो शेवटपर्यंत तेथेच राहिला. १८१० मध्ये तो मृत्यु पावला. मीरचे आत्मचरित्र फारसी भाषेत आहे. त्यातील पानीपतची हकीकत पुढे दिली आहे. मीरने मराठे दिल्लीस आले तेव्हा ते शहर सोडले व विजय संपादून अहमदशहा दिल्लीस पोचल्यावर मीर दिल्लीस आला.)

सूरजमल मराठ्यांना सोडून गेला त्याबद्दल मीर म्हणतो –

"भाऊच्या मनात होते की, वजीर इमादुल्मुल्कपाशी जडजवाहिर आहे, आणि सूरजमल मोठा राजा आहे.

वेळ मिळेल तर त्यांच्याकडून संपत्ती हरण करावी. राजा नागरमल (मीरचा आश्रयदाता) ला ही गोष्ट कळली होती. भाऊने राजा नागरमलला सांगून पाठविले की मी राज्य हवाली करतो. राजाने सांगितले की, मी पुष्कळ दिवसापासून वजीराबरोबर आहे. त्याला अपयश यावे आणि मी आपले साधून घ्यावे हे बरोबर नाही. तुम्ही वजीराला भरतपूरचा बंदोबस्त करण्यास सांगा. मी आणि सूरजमल त्याच्या बरोबर जातो. तेथील काम आटोपल्यावर तुमच्या मनासारखे करू. राजा नागरमलने याप्रमाणे गोड थापा मारल्या. (रोगने काज भला.) दक्षिणी फौज दिल्लीहून कूच करू लागली. त्यादिवशी राजा नागरमल आणि सूरजमल हे आपल्या फौजेसहित निघाले आणि दिल्लीपासून बारा कोसावर वल्लभगडाचा मजबूत किल्ला आहे तेथे येऊन बसले. वजीराचे डेरे तंबू आधीच येऊन दाखल झाले होते. मराठ्यांनी त्यांची खूप समजूत घातली पण त्यांनी त्यांचे काही ऐकले नाही.''

पानीपतबद्दल मीर म्हणतो, ''मराठे आपल्या गनिसी काव्याने लढते तर त्यांना जय मिळणे शक्य होते. भोवती तोफखाना ठेवून ते कोंडून बसले आणि बादशाही (अब्दाली) फौजेने त्यांची रसद बंद करण्याची व्यवस्था केली. कोंडमारा असह्य होऊन मराठ्यांची फौज लढण्याला उद्युक्त झाली... दक्षिणेचा सरदार (भाऊ) हिंमतीने मैदानात उतरला. त्याने बादशाही फौजेची अनेक पथके पिटाळून लाविली. पण यश अब्दालीच्या नशिबी लिहिले होते त्यामुळे त्यांच्या (मराठ्यांच्या) प्रयत्नाचा काही उपयोग झाला नाही. पहिल्याच हल्ल्यात विश्वासरावाला एक तीर लागला. तो राज्याचा युवराज होता. तो मारला गेला (खाको खून मे लौट गया). असे म्हणतात की भाऊ मोठा स्वाभिमानी होता. तो शौर्याची शर्थ करीत होता. जेव्हा त्याने विश्वासरावाचा प्रकार आपल्या डोळ्याने पाहिला तेव्हा तो म्हणाला की, दक्षिणेत जाण्यास आता मला तोंड राहिले नाही आणि मग त्याने जिवावर उदार होऊन अब्दालीच्या फौजेच्या मध्यावर हल्ला केला. म्हणजे त्याने जाणून बुजून आपल्याला मृत्यूच्या दाढेत लोटले. मल्हारराव दोन तीन हजार सैन्यासहित तेथून पळाला. बाकीचे सर्व लष्कर गारद झाले. जे सरदार वाचले ते भिकाऱ्यासारखे भटकू लागले. हजारो शिपायांचे घोडे आणि हत्यारे जवळपासच्या जमीनदारांच्या हाती लागली. या समाजाला (मराठ्यांच्या) किती वाईट दिवस पहावा लागला हे मी कसे वर्णन करू. हजारो उघडे नागडे, आणि रडतखडत रस्त्यावरून जात तेव्हा पाहणाऱ्यांना विलक्षण वाटे. गावचे लोक प्रत्येकाला एक एक मूठभर चणे देत आणि त्याच्या मानाने आपण कितीतरी बरे आहोत हे पाहून परमेश्वराचे आभार मानीत. असा धडा शिकविणारा पराजय क्वचितच कुणाच्या वाटेला आला असेल. अनेकजण उपासमारीने गेले. अनेकांनी थंडीमुळे कांकडून जीव दिला. दिल्लीत फौज होती ती बादशाही फौजेच्या भीतीने रातोरात पळून गेली. कोट्यावधी रुपयांची संपत्ती अब्दाली आणि त्यांच्या सरदारांच्या हाती लागली. ती त्यांनी आपसात वाटून घेतली. नगद रोकड आणि माल याशिवाय तोफखाना, हत्ती, बैल, घोडे, उंट हे शुजाउद्दौल्याने आपल्याकडे घेतले. दुऱ्हाणीचे शिपाई फकीर होते ते संपन्न बनले. प्रत्येक दहबाशीला (दहा शिपायांचा नायक) शंभर उंटाचे सामान हाती लागले. प्रत्येकाचा आनंद गगनात मावत नव्हता. शहा अब्दालीसारखे घवघवीत यश भूतकाळातील कोणत्याच बादशहाला लाभले नाही. तो मोठ्या इतमामाने दिल्लीत दाखल झाला.''

■